# एकावळी

प्रा. श्री. ना. बनहट्टी

यांनी लिहिलेल्या व्यक्तिचरित्रात्मक लेखांचा संग्रह

एकपदरी हाराला 'एकावळी' म्हणतात. या हारात मोत्ये काही फार नाहीत. पण आहेत तीं टपोरीं, पाणीदार व एकप्रकारच्या प्रशांत तेजाने चमकणारीं आहेत. भरतखंडातील अनेक विख्यात व्यक्तींचीं जीवनरहस्यें सोज्वळ परंतु कमावलेल्या भाषेने यात वर्णन केलेलीं आढळतील. लघुचरित्राचा हा एक सुंदर प्रकार प्रा. बनहट्टींनी मराठींत आणला आहे.



आवृत्ति दुसरी (टीपांसह)

किंमत तीन रुपये

संपादक

डॉ. माधव गोपाळ देशमुख

एम्. ए., एल्एल्. बी., पीएच्. डी

प्रा. श्रीनिवास नारायण बनहट्टी यांचे संकलित लेख

१

# एकावळी

संपादक


माधव गोपाळ देशमुख

एम्. ए., एलएल. बी., पीएच. डी.



सुविचार प्रकाशन मंडळ, लि.

शके १८७३ ] नागपूर १. [ इ. स. १९५१

किंमत तीन रुपये

# प्रस्तावना

गुरुवर्य प्रा. श्री. ना. बनहट्टी याच्या कांही प्रमुख माजी विद्यार्थ्यांनी सुमारें दोन वर्षांपूर्वी निरनिराळ्या नियतकालिकातून विखुरलेल्या त्यांच्या लेखाचा एक संग्रह प्रसिद्ध करण्याचे ठरविले. त्या वेळीं मी प्रोफेसरसाहेबाच्या देखरेखीखाली एक प्रबंध लिहीत होतों; त्यामुळे त्यांचा अतेवासी म्हणून लेखसंग्रहाचे संपादन करण्याचे काम साहजिकपणे मींच स्वीकारले. त्याचे दुसरे एक विद्यार्थी श्री. केशव माधव आराध्ये, एम्. ए. याना मदतीस घेऊन लेखांची प्राथमिक यादी तयार केली व मुद्रणाच्या हेतूने त्याचे वर्गीकरण केले.

प्रा. बनहट्टी याचे यच्चयावत लेख धुंडाळून त्याची सूची व निवड करून देण्याच्या कामात आम्हास त्यांचे स्नेही श्री. वेंकटेश शामराव बलकुंदी यानी बहुमोल साहाय्य केले, याबद्दल आम्ही त्याचे अत्यंत आभारी आहों.

हें प्रारंभीचे काम झाल्यानतर प्रा. बनहट्टींच्या सर्व माजी विद्यार्थ्यांची ह्या कामीं समति व सहकार्य मिळविण्यासाठी श्री. आराध्ये यानीच सर्वांना विनतीपत्रकें पाठविलीं व त्यापैकी बहुतेक सर्वांची अनुमति आलीही. त्यानंतर श्री. आराध्ये याना इतर कार्यव्यापृतत्वामुळे इकडे लक्ष घालण्यास फावले नाही; पण जेवढी मदत त्याना करिता आली, तीबद्दल सर्व विद्यार्थ्यांच्या वतीने मी त्याचा ऋणी आहें. 'एकावळी' संपादनाचें हे कार्य माझ्याच हाताने पुरें व्हावें असा पूर्वसंकेतच होता की काय असे वाटते. व आमचा मूळ सकल्प आज सफल झाल्याबद्दल मनाला अतिशय समाधान होत आहे.

प्रा. बनहट्टी हे महाराष्ट्रातील एक प्रथितकीर्ति खंदे लेखक आहेत. त्याच्या नावाने विभूषिलेला एकही ग्रथ किंवा लेख ज्याने पाहिला नाही असा सुशिक्षित मराठी वाचक विरळाच सापडेल. पूर्वी प्रसिद्ध झालेल्या लेखाच्या या सग्रहामुळे टीकाकार म्हणून आधीच पसरलेल्या त्याच्या कीर्तीत काही नवीन भर पडणार आहे, असे नाही.

पण या निमित्ताने त्यांच्या आम्हांवरील व पर्यायाने मराठी वाचकावरील वाङ्मयऋणांतून अल्पांशाने का होईना, उतराई होण्याची ही संधि आम्ही साधून घेतली हा आमचाच लाभ झाला आहे. वस्तुतः त्यांच्या अनेक समकालीनांचे लेखसंग्रह यापूर्वीच प्रकाशांत आले असून त्यांच्या लेखांचा संग्रह देखील यापूर्वीच निघावयास पाहिजे होता. व तो कोणत्याही प्रकाशकाने आनंदाने काढला असता. परंतु त्यांना स्वतःला आपले लेख धुंडाळून, संकलित करून, पुनः वाचून त्यांतून निवड करण्याला लागणारा वेळ कधीतरी मिळेल की नाही, याची आम्हांस शंकाच वाटूं लागली. तेव्हां आपणच हे काम उरकले पाहिजे असें आमच्या मनाने घेतले. गुरुवर्यांनी आपल्या विद्यार्थ्यांवरील प्रेमास जागून आम्हांस आपल्या लेखांचे पुनर्मुद्रण करण्यास संमति दिली याबद्दल आमच्याप्रमाणे 'एकावळी'चे वाचकही त्यांचे अतिशय कृतज्ञ राहतील.

प्रा. बनहट्टींच्या अद्ययावत् लेखांची यादी ह्या ग्रंथाच्या अखेरीस दिली आहे. ही यादी आम्ही प्रयत्नपूर्वक तयार केली आहे; तथापि या यादींत समाविष्ट करावयाचे राहिलेले असे त्यांचे काही लेख आम्हांस कोणी दाखवून दिल्यास त्यांचे आम्ही फार आभारी होऊं. यादींतील * अशी खूण केलेले चरित्रविषयक लेखच तेवढे ह्या पहिल्या खंडांत दिले आहेत. त्यांच्याच 'चरित्रवाङ्मय' ह्या लेखांतील शब्दांत सांगायचे म्हणजे "स्वदेशांतील वा नाना देशांतील व्यक्तींच्या जीवनाविषयी कुतूहल वाटावें, त्यांतील कित्येकांच्या जीवनाशी सहृदयतेने समरस होऊन मानवी जीवनाचे चित्रविचित्र व नवलपूर्ण देखावे पाहिल्याचा आनंद स्वतःच्या मनाने अनुभवावा आणि त्याच आनंदाचे अंशभाक् इतरांस करण्यासाठी स्वतः अनुभविलेला जीवनाचा चित्रपट वाणीने वर्णावा" अशा निर्भेळ कुतूहल बुद्धीने प्रेरित होऊन लिहिलेले हे चरित्रलेख किती नमुनेदार आणि उद्बोधक झाले आहेत याचा ठोकताळा वाचकांना प्रत्यक्षच अनुभविण्यास मिळेल. चरित्रलेखनाच्या बाबतींत सत्यान्वेषण आणि सौन्दर्यदर्शन हे गुण परस्पर विरुद्धत्वाने वास करितांना दिसतात. पण आन्द्रे मोर्वा ह्या विख्यात विवेचकाने रोडिन् आणि तत्पूर्वीचे ग्रीक शिल्पकार यांनी एकमेकांविरुद्ध दिसणाऱ्या ह्या विशेषांचा कलापूर्ण

संयोग घडविल्याचें वर्णिलें आहे,† तसाच अनुभव वाचकांना प्रस्तुत 'एकावळी' वाचतांनाही येईल, असा आमचा विश्वास आहे.

यापुढील लवकरच निघणाऱ्या खंडात जेम्स मॅथ्यू बॅरी, रॉबर्ट् लुई स्टीव्हन्सन् व शेरिडन् (हा अपुरा लेख पुरा करून देण्याचे आश्वासन आम्ही मिळविले आहे) हे राहिलेले चरित्रपर लेख व त्याच सदरात बसणारे आणखी काही लेख द्यावे असे योजिले असून नंतर उर्वरित लेखही यथावकाश प्रसिद्ध करावे असा मनोदय आहे.

प्रस्तुत संग्रहात प्रकाशित करण्यात येत असलेले लेख ज्या ज्या नियतकालिकात पूर्वी प्रसिद्ध झाले होते, त्यांच्या चालकांचे आम्ही आभारी आहो.

—संपादक

## दुसरी आवृत्ति

गुरुवर्य प्रा. श्री. ना. बनहट्टी याच्या 'एकावळी'चे महाराष्ट्राकडून गेलीं दहा वर्षे कसे उत्कृष्ट स्वागत झाले हे याच आवृत्तींत इतरत्र छापलेल्या अभिप्रायाच्या त्रोटक उताऱ्यावरूनहि सहज लक्षात येईल.

या नव्या आवृत्तींत खाडिलकरावरील लेखाचा उत्तरार्ध दोन वेळा लिहिलेला आहे. त्याची खुद्द ग्रंथकारानीच दिलेली हकीकत मोठी कुतूहलजनक वाटेल. गुरुवर्यांनी लिहिलेल्या लेखाची यादीहि अधिक अद्ययावत् करण्याचा प्रयत्न केला आहे.

महाराष्ट्रीय रसिक व विद्यापीठे या नवीन आवृत्तीचा अधिक जागरूकतेने परामर्श घेतील अशी आशा वाटते.

नागपूर
११ ऑगस्ट १९५१

माधव गोपाळ देशमुख

---

† "It is perfectly accurate to say that truth has the solidity of stone and that personality has the lightness of a rainbow, but Rodin and other Greek sculptors before him have at times been able to infuse into marble the elusive curves and the changing lights of human flesh."
Andre Maurois *Aspects of Biography, p. 34.*

# अनुक्रमणिका



मोतियें मेळउनि बहुवें
एकावाळिचा पाडु आहे।
परि शोभे रूप होये
एकाचि तेथ ॥

ज्ञानेश्वरी १८.५६

# १

# ज्योतिपंत महाभागवत

[ 'मनोरंजन' फेब्रुवारी १९३२ ]

उत्तरपेशवाईमधील साधुवर्य व कवि श्रीज्योतीपत महाभागवत याच्या संबंधाने काही लिहावे असे बरेच दिवस मनात वागत होते. 'मनो-रंजना'च्या संपादकानी लेखासाठी केलेल्या मागणीचे निमित्त साधून आज या सस्मरणीय पुरुषाविषयी चार शब्द लिहीत आहे.

अलीकडे युनिव्हर्सिटीच्या पदवीपरीक्षेच्या अभ्यासक्रमात मराठीचा शिरकाव झाल्यापासून एक मोठा फायदा झाला आहे. ज्या ज्या जुन्या ग्रंथकाराचे ग्रंथ परीक्षेसाठी नेमले असतील त्याच्या चरित्राचे व वाङ्मयाचे सूक्ष्म निरीक्षण होण्यास सुरवात होते, बऱ्याचशा कॉलेजीय अध्यापकाचीं डोकीं, व त्यामागून त्याच्या लेखण्याही चालू लागतात. या लेखण्याची धावाधाव अर्थात् मासिकाच्या चवाठ्यावर येते आणि कधी कधी तर या धावांधावीस वादसगराचे स्वरूप येऊन तटस्थ प्रेक्षकास अनेक समर-चमत्कार पाहावयास मिळतात. मराठीस युनिव्हर्सिटीमध्ये प्रवेश मिळाल्या-पासून प्रेक्षकास हे समरचमत्कार पाहावयास मिळतात एवढाच काय तो फायदा झालेला आहे असे मात्र माझे म्हणणे नाही! मासिकाच्या संपादकाची मजकूर मिळविण्याविषयीची चिंता बरीचशी कमी होते हा दुसराही मुद्दा खासगी स्वरूपाचा म्हणून सोडून दिला तरी एकदरीत चर्चा बरीच चागली होते आणि अध्यापक व विद्यार्थी याखेरीज इतर व्यासंगी सद्‌गृहस्थही तिच्यामध्ये भाग घेत असल्यामुळे तिला व्यापक व सर्वजनग्राह्य असे स्वरूप येते असे म्हणण्यास काही हरकत नाही. झालेल्या चर्चेमुळे क्वचित् नवीन माहिती उजेडात येते. पूर्वी उपलब्ध असलेल्या ग्रंथकाराचा दर्जा व त्याचे वाङ्मयेतिहासातील स्थान निश्चित होण्यास मदत होते.

काही वर्षांपूर्वी झालेली सामराज कवीवरील चर्चा व नुकतीच झालेली रघुनाथपंडितावरील चर्चा हीं अशा प्रकारच्या चर्चेचीं उदाहरणें म्हणून देता येतील. उपर्युक्त दोन्ही कवींचे ग्रंथ युनिव्हर्सिटीने परीक्षेला नेमल्यामुळे तिला आमच्या चिंतामग्न संपादकाची लेख मिळविण्या-विषयीची काळजी काही अंशाने दूर करण्याचे श्रेय संपादन करता आले. प्रस्तुत लेखाची गोष्ट मात्र अगदी निराळी आहे. तो जरी एका जुन्या कवीसबंधानेच लिहिला असला तरी त्याचे श्रेय मुंबईच्या किंवा नागपूर-च्या ( किंबहुना जगातील कोणत्याही ) युनिव्हर्सिटीस घेता येणार नाही हे उघड आहे. कारण ज्योतीपंताचे ग्रंथ कोणत्याही युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमात नेमलेले नाहीत व ते सर्व अमुद्रित असल्यामुळे पुढेही नेमले जाण्याचा फारसा संभव नाही. या लेखाचे श्रेय कोणास द्यावयाचेच असेल तर ते प्रस्तुत लेखकास प्रेरणा करणाऱ्या ‘स्वयंज्योती’स व ‘प्रवर्तितो दीप इव प्रदीपात्,’ या न्यायाने त्याचीच ज्योति वंशपरंपरा धारण करणारे प्रेमळ साधुपुरुष श्री. मुकुदबुवा महाभागवत यासच देणे रास्त ठरेल.

युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमात प्रविष्ट होण्याचे भाग्य जरी ज्योतीपंत महाभागवताच्या वाट्यास आलेलें नसले तरी आधुनिक चिकित्सकापैकी व सशोधकापैकी कोणीच अजून त्याच्या वाटेस गेलेला नाही असे मात्र नव्हे. कै. पाडोबा पटवर्धन व गो. का. चादोरकर या निरपेक्ष व चिकाटी-च्या सशोधकानी ज्योतीपताचा तलास लावून त्याच्याविषयीची माहिती प्रथम प्रसिद्ध करण्याचे श्रेय घेतले. या दोघा संशोधकानी दिलेली माहिती भारत इतिहाससशोधक मंडळाच्या शके १८३४ च्या अहवालात व शके १८३५ च्या वार्षिक इतिवृत्तात अनुक्रमे प्रसिद्ध झालेली आहे. त्यानंतर श्री. ज. र. आजगावकर यानीही विशेष माहिती मिळवून आपल्या कवि-चरित्रात प्रस्तुत कवीवर निबंध लिहिला आहे. भाव्याच्या ‘महाराष्ट्र–सार-स्वता’तही प्रस्तुत कवीचे विवेचन आले आहे. मात्र ते पटवर्धन व चादोरकर याच्या टिपणावरून लिहिलेले असून अगदी त्रोटक आहे.

हे प्रयत्न आधुनिक लेखकाचे झाले. जुन्या वळणाच्या भाविक ग्रंथ-कारापैकी राजाराम प्रासादी याने आपल्या भक्तमंजरीमालेत ज्योतीपंताचें चरित्र वर्णिले आहे. ही भक्तमंजरीमाला सध्या ‘रामदास आणि रामदासी’

मासिकात छापली जात असून तिच्या ६२, ६३ अध्यायामध्ये ज्योतीपंताचे चरित्र कोणासही वाचावयास मिळेल. 'श्रीस्वयंज्योतिकथामृत' नावाचे खुद्द ज्योतीपंताचें एक ओवीबद्ध स्वतंत्र चरित्रही त्याच्या शिष्यवर्गापैकी श्री. सखाराम कृष्ण बाकरे नावाच्या गृहस्थानी लिहिले असून ते छापून प्रसिद्धही झालेले आहे. हे सखारामपंत बाकरे ज्योतीपंताचे पणतू रघुनाथ-बुवा याचे शिष्य असून त्यानी 'स्वयंज्योतिकथामृत' ग्रंथ अगदी अलीकडे म्हणजे शके १८२३ मध्ये लिहिला. हा ग्रंथ फार प्रसादयुक्त व सुंदर असून त्यात भाविकपणाच्या समजुतीस अनुसरून चमत्काराची जरी रेलचेल उडविलेली असली तरी एकंदर माहिती प्रत्यक्ष ज्योतीपंताच्या वंशजाकडून मिळविलेली असल्याकारणाने पुष्कळ अंशी सुसंगत व विश्वसनीय आहे. (प्रस्तुत लेखात या ग्रंथाचा उल्लेख नुसत्या 'कथामृत' या नावाने केला आहे.) राजाराम प्रासादीने लिहिलेलें चरित्र त्या मानाने गबाळ व निरुपयोगी आहे.

प्रस्तुत लेख लिहिताना वरील सर्व सामग्रीचा उपयोग केलेला असून त्याशिवाय ज्योतीपंताच्या ग्रंथातून निष्पन्न होणारी व त्याच्या वंशजाकडून तोंडी मिळालेली माहितीही त्यात भरीस घातली आहे. या सर्व आधारा-वरून तयार केलेल्या हकीकतीस स्वतंत्र रीतीने तलास करून शोधून काढलेल्या कागदपत्राचीही जोडगणी दिलेली आहे. तो सर्व प्रकार योग्य स्थलीं वाचकाच्या नजरेस येईलच.

ज्योतीपंताच्या कवित्वाचा विचार सोडून देऊन त्याचे नुसते चरित्र जरी पाहिले तरी तें अत्यंत मनोरंजक असल्याचे आढळून येते. कर्तबगार मनुष्य कोणत्याही क्षेत्रात गेला तरी तेथे सस्मरणीय कामगिरी करून दाखवितो हे सत्य याच्या चरित्रावरून आपणास पटते. ज्योतीपंताचे घराणें मूळचे सातारा जिल्ह्यातील खटाव गावचे राहणारे. त्याच्या घराण्यांत गंगाधर उर्फ गंगभट हा पुरुष विजापूरच्या आदिलशहाच्या कारकीर्दीत प्रख्यातीस आला. तो मोठा शिवभक्त असून शिवाच्या प्रसादाने विजापूरच्या दरबारचे मंत्रिपद त्यास प्राप्त झाले, अशी हकीकत 'स्वयंज्योतिकथामृता'वरून कळते. अनेक वर्षे विजापुरास बादशहाची इमाने इतबारे नोकरी करून त्याने खटाव प्रातातील एकशे पाच गावाची देशपांडेपणाची वृत्ति बादशहापासून संपादन केली. त्यांपैकी वडील मुलास

बुधमलवडी व सभोवतालचीं ६५ गावें आणि धाकट्या मुलास खटावासकट बाकीची चाळीस गावे याप्रमाणे वाटणी करून देऊन गंगभट स्वतः मलवडीस येऊन राहिले. या मलवडीच्या शाखेमध्ये गंगभटापासून सहाव्या पिढीमध्ये गोपाळ नामे पुरुष झाला. आपले मूळ गाव सोडून तो विटे येथे येऊन राहिला होता व तेथे मुलाची शाळा घालून तो आपला चरितार्थ चालवीत असे. या गोपाळपंताचेच चिरंजीव ज्योतीपंत. त्याचा जन्म शके १६३८ (सन १७१६) मध्ये झाला. ज्योतीबा लहानपणीं अगदी निर्बुद्ध व मठ्ठ होता असे त्याचे चरित्रकार म्हणतात. वीस वर्षांचा झाला तरी विद्येचा लवलेशही त्यास प्राप्त झाला नाही. तेव्हा

एके दिवशीं कोपोनि पिता । ताडोनि लोटला गृहापरता
कासया वाचलासी आता । विद्या नये तुजलागी ॥
माझिया उदरीं पाषाण । केवि जन्मलासि तूं जाण
वृद्धपणीं आम्हा दूषण । देती आप्त स्वजनही ॥
माझी विद्या लाधली । सर्व मुले फळासी आली
आपुलाल्या गृहासि गेलीं । पूर्ण जालीं संसारी ॥
मुंजीबंधनापासून देख । शिकवीत होतों गायत्री एक
षण्मास न ये अक्षर एक । या पुत्राकारणे ॥

याप्रमाणे वाक्ताडन करून बापाने हाकून दिल्यावर ज्योतीबा बरोबरीचीं मुले मिळवून गावाबाहेर एक गणपति होता तेथे गेले. आपण देवळामध्ये जाऊन बसून इतर मुलाना देवळाचे दार बुजवून टाकण्यास सांगितले व याप्रमाणे स्वतःस चिणून घेऊन सात दिवस गणपतीपाशीं धरणे धरून बसले. सातव्या दिवशीं गणपति प्रसन्न होऊन इच्छित वर देण्यास सिद्ध झाला. तेव्हा ज्योतीपंतानी पुढीलप्रमाणे मागणें मागितले—

मागणे ते हेचि ऐका । विद्यान्न द्यावे विनायका
ज्ञान आणि निष्कामिका । प्रेमसहित भक्तीतें ॥

यापैकी गणपतीने ज्योतीपंताच्या जिभेवर ॐकार लिहून विद्या तर ताबडतोबच दिली; परंतु भक्ति आणि ज्ञान याच्याविषयी

भक्ति आणि ज्ञानासी । शक्ती आहे मजपासीं
उपाय नाही प्रारब्धासी । योगायोग पुढे आहे ॥

याप्रमाणे बोलून पुढील काळावर हवाला दिला.

असो; याप्रमाणे विद्या प्राप्त झाल्यावर ज्योतीपंत घरीं आले. मुलगा विद्यासंपन्न शहाणा होऊन आलेला पाहून आईबापानी अर्थातच त्याचे कोडकौतुक केले. आईने सांगितल्यावरून लगेच ते पुण्यास आपले मामा महिपतराव म्हणून होते त्याजकडे गेले.

हे महिपतराव श्रीमंत पेशव्याच्या दप्तरखान्यात कोणी तरी कामदार असावेत असे वाटते. त्यानी ज्योतीपंतास श्रीमत पेशव्याच्या लकडखान्यात दरमहा चार रुपयाची असामी मिळवून दिली. याप्रमाणे काही दिवस गेल्यावर महिपतरावाच्या अंगावर एक मोठी बिकट जबाबदारी येऊन पडली. श्रीमंतांच्या दप्तरखान्यात हिशेबाचा काही घोटाळा झाल्यामुळे त्यानी सर्व कामगारास बोलावून दप्तरे पुन: लिहून काढण्यासाठी सर्वास वाटून दिली. त्यातील पाच दप्तरे महिपतराव मामाच्या वाट्यास आली. मुदत तर केवळ तीन दिवसाची होती. तेव्हा मामाच्या तोंडचे पाणीच पळाले! मामाना चिताक्रात पाहून ज्योतीपतानी चौकशी केली व त्याच्या चिंतेचे कारण कळताच तीन दिवस एका खोलीत कोंडून घेऊन अहोरात्र खपून त्यानी पाच दप्तरे लिहून काढलीं. ('स्वयज्योतिकथामृता'त अर्थात् गणपतीने त्याच्याकरिता दप्तरे लिहिली असे वर्णन आहे.) ज्योतीपंताचे अक्षर फारच सुदर होते. मोत्याच्या सराप्रमाणे असलेल्या पाची दप्तरातील नमुनेदार अक्षरपंक्ति जेव्हा पेशव्याच्या नजरेस पडल्या तेव्हा त्याना मोठा अचंबा वाटला. त्यानी "हा लेखक कोण" म्हणून चौकशी केली, तेव्हा महिपतराव मामानी "हे आमच्या चिरजीवानी लिहिलेले आहे" असे सागून थोडीशी चलाखी करण्याचा यत्न केला. परंतु श्रीमतानी प्रत्यक्ष पाचारण करिताच ज्योतीपतरूपी झाकले माणिक बाहेर आले व पेशव्यानी तावडतोब पुरदरच्या फडणिशीवर ज्योतीपंताची नेमणूक केली. बापाने निर्बुद्धपणाबद्दल हाकलून दिले तेव्हा ज्योतीपत वीस वर्षांचे होते हे कथामृतकाराचे विधान खरे मानले तर या सुमारास ज्योतीपत बावीस वर्षांचे असावे असे दिसते. कदाचित् यापेक्षाही त्याचे वय अधिक असेल. व्यापक दृष्टीने पाहता हा काळ बाजीरावाच्या कारकीर्दीच्या अखेरीचा व नानासाहेबांच्या कारकीर्दीच्या प्रारंभाचा असावा असें दिसून येतें.

पुरंदर किल्ल्यासंबंधीचे कागदपत्र पुढे मागे कोठे उपलब्ध झाल्यास त्यात इ. स. १७४० च्या सुमारास व त्यानंतर ज्योतीपंताचे नाव आढळण्याचा संभव आहे.

आतापर्यंतची सर्व हकीकत कथामृतांत वर्णन केल्याप्रमाणे, त्यांतील अद्भुत भाग बहुतेक गाळून, दाखल केली आहे. पुरंदरची फडणिशी ज्योतीपंतास मिळाली हे कथामृतकाराचे म्हणणे खरें असल्यास ज्योतीपंतानी ही फडणिशी बरींच वर्षे केली असली पाहिजे. कारण यापुढें ज्योतीपंताचा संबंध एकदम उत्तरेकडील पानिपतच्या राजकारणात येतो. यासंबंधाने कथामृतकाराचे विधान पुढीलप्रमाणे आहे—

असो; श्रीमतराष्ट्रीं पातला शत्रू। गिलच्या नामे तो अपात्रू
तया शिक्षणार्थ स्वयंज्योती पात्रू। विनायकप्रासादिक म्हणोनिया ॥
सवें दिधले लक्षसैन्यासी। राघोराम पागे समागमेसी
गोविंदपंत बुंदेले सरदारासी। वस्त्रे दिधलीं त्रिवर्गा ॥
समारंभे निघाले तयेवेळा। जाऊनि शत्रूवरी घातला घाला
शिक्षा केली त्या यवनाला। जयी होउनी राहिले ॥

कथामृतकार हे एकदरीने सच्चे व पूर्वपरंपरागत माहितीच्या आधाराने लिहिणारे ग्रंथकार असल्याने त्यानी इतक्या निःसदिग्ध रीतीने केलेले विधान निराधार असेल असे वाटेना. या विधानावर भरवसा ठेवून याला प्रत्यंतर पुरावा कोठे मिळतो की काय हे पाहण्यासाठी प्रस्तुत लेखकाने यत्न सुरू केला. सुदैवाची गोष्ट अशी की तत्कालीन अस्सल कागदपत्रामध्ये अशा तऱ्हेचा थोडासा पण बिनतोड पुरावा उपलब्ध झाला असून त्यावरून सर्वच गोष्टी जरी उलगडत नसल्या तरी ज्योतीपत हे मराठ्याच्या उत्तरेकडील राजकारणी घडामोडीत त्या काली वावरत होते ही गोष्ट शाबीत होऊ शकते. हा बिनतोड पुरावा प्रत्यक्ष ज्योतीपंतानी उत्तरेतून लिहिलेल्या अस्सल पत्राचाच होय. राजवाड्यानी प्रसिद्ध केलेल्या 'मराठ्याच्या इतिहासाचीं साधने, खंड पहिला' यात लेखांक २८५ व २९५ ही पत्रे 'जोती गोपाळ' यानी लिहिलेलीं असून त्यापुढील २९६ व २९७ हीं पुरवणीपत्रेही अर्थात् 'जोती गोपाळ' यांचींच आहेत. पानपतची लढाई झाल्यानंतर अंतर्वेदप्रांतीं, म्हणजे

गंगा यमुना यांच्यामधील दुआबांत, आपला अंमल बसविण्याचे मराठ्यांनी जे प्रयत्न केले त्यांचा काही तपशील या पत्रामध्ये ज्योतीपंतांनी दिला आहे. लेखांक २८५ हा २४ जून १७६१ रोजीं उमरगडाहून लिहिलेला दिसतो व लेखाक २९५ हा रायपुराहून ( कानपूरच्या वायव्येस असलेलें शिवराजपूर ? ) लिहिलेला आहे.

ज्योतीपंतानी हीं पत्रें कोणास लिहिलीं हे ठरविण्यासही साधन उपलब्ध आहे. क्रमाक २९७ च्या पुरवणीपत्राच्या प्रारंभीं 'राजश्री जनार्दनपंत स्वामींचे सेवेशीं' असा उद्दिष्ट व्यक्तीचा स्पष्ट उल्लेख आहे. यावरून ले. २९५, २९६, २९७ हीं पत्रे तरी निदान जनार्दनपंत एरंडे, मुक्काम पुणे, यास उत्तरेतून ज्योतीपंतानी लिहिलीं याविषयी संशय उरत नाही. ले. २८५ हाही त्याचंप्रमाणे जनार्दनपंतांसच उद्देशून लिहिला असावा हे उघड दिसते. तेव्हा ज्योतीपत हे १७६० च्या मुमारास उत्तरेत असून काहीतरी राजकारणी खटाटोपात व्यग्र होते ही गोष्ट वरील पुराव्यावरून बिनतोड सिद्ध होते. आता त्याना उत्तरेंत कोणी, केव्हा व कशाकरिता पाठविले व तेथे त्यानी काय कामगिरी केली या प्रश्नाचा उलगडा व्हावयाचा राहिला. तो करण्याविषयी निश्चित असे साधन अद्याप उपलब्ध झालेले नाही. तथापि धाग्यास धागा जोडून विचार केल्यास काही थोडे तर्कांचे जाळे विणता येते. निश्चित पुराव्याच्या अभावी तो तर्कच मान्य म्हणून समजून चालण्यास कांही हरकत नाही इतका सबळ तो खास आहे.

ज्योतीपंताचें अक्षर सुंदर होते, कारकुनी कामांत त्याचा हातखंडा होता व पुरंदरच्या फडणिशीच्या हुद्द्याचें काम पुष्कळ वर्षे केलेले असल्याकारणानें हिशेबाच्या, वसुलाच्या भानगडी उकलण्यात ते तरबेज झालेले होते, एवढ्या गोष्टी आपणाला त्याच्या पूर्वचरित्रावरून गृहीत धरता येतात. या गोष्टींचा आपल्याला माहीत असलेल्या त्या वेळच्या काही ऐतिहासिक घटनाशीं मेळ घातला म्हणजे ज्योतीपंताच्या कामगिरीसंबंधाचा काहीएक अंदाज आपणास बाधता येतो.

अंतर्वेद व बुंदेलखंड या प्रातातले पेशव्याचे कमाविसदार गोविंद बल्लाळ खेर उर्फ गोविंदपंत बुंदेले याचे नांव इतिहासात प्रख्यात

आहे. इ. स. १७५४, ५५ सालापासून त्याच्या मुलखाचा वसूल पेशव्याकडे नीट पोचेनासा झाला व त्यासंबंधाने बरीचशी घासाघीस होण्यास सुरवात झाली. तेव्हा पेशव्याची भेट घेऊन सर्व भानगडींचा खुलासा करण्यासाठी १७५६ च्या अखेरीस गोविंदपंत पुण्यास आले. दक्षिणेंत पेशव्याशीं त्यानी काय वाटाघाट केली असेल ती असो, परंतु एकमेकाचा पूर्ण दिलखुलासा त्या वेळेसही झाला नाही. कारण १७५८ च्या प्रारंभीं गोविंदपत जेव्हा उत्तरेकडे गेले तेव्हा त्याच्या कामावर देखरेख ठेवण्यासाठी व वसुलाच्या भानगडींचा निकाल लावण्यासाठी पेशव्यानी जनार्दनपत एरंडे व त्रिबकराव कानिटकर या दोघा आपल्या भरवशाच्या हिशेबतपासनिसाची त्याच्याबरोबर रवानगी केली. परतु या दोघा हिशेबतपासनिसाचे व गोविदपंताचे नीटसे जमेना. तेव्हा १७६० च्या मार्चमध्ये पेशव्यानी जनार्दनपत एरडे यास परत बोलावून घेतले.

जनार्दनपत व त्रिबकपत हे उत्तरेकडे ज्याकरिता गेले ती कामगिरी काही सामान्य नव्हती. अदाजे चाळीस लक्ष उत्पन्न असलेल्या मुलखाची तरमबंदी नीट करून त्याचा वसूल बिनबोभाट आदा होत राहील अशी व्यवस्था करावयाची होती व गोविदपताच्या हिशेबाचे जे गुते पडलेले होते ते सोडवावयाचे होते. इतकी कामगिरी केवळ दोन व्यक्तीच्या हातून नीटपणे उरकणे शक्य नव्हते. त्या प्रातात सर्वत्र नाक्याच्या ठिकाणावर माणसे नेमून त्याच्याकरवीं रयतेवर अंमल बसवून वसूल करावयाचा होता. अर्थात् त्या कामावर मुख्य जबाबदार म्हणून त्या दोघाचीच नेमणूक झाली असली तरी त्याना मदतनीस म्हणून बरेचसे अनुभवी कारकून त्याच्याबरोबर उत्तरेत रवाना झाले असले पाहिजेत. अशा अनेक व्यक्तींचा तत्कालीन पत्रव्यहारात उल्लेखही येतो. उदाहरणार्थ, प्रत्यक्ष लेखाक २९५ चे पत्र हेंच जोती गोपाळ, लक्ष्मण अंबाजी, कृष्णाजी भिकाजी व अताजी कृष्ण इतक्या जणानी जनार्दनपंतास लिहिलें आहे. तेव्हा यावरून स्वाभाविक व संभवनीय तर्क हा सुचतो की एरंड्याच्या बरोबर त्याना मदतनीस म्हणून जे बरेचसे लोक गेले त्यापैकी ज्योतीपत हे एक असावे व एरंडे जरी १७६० च्या मार्चांत परत आले तरी ज्योतीपंत व त्याच्याबरोबरची इतर मंडळी ही सर्व मुलखाची व्यवस्था

लावण्याकरिता उत्तरेतच राहिली असावी. जोती गोपाळ यांच्या पत्रांत वसुलासबधाचे उल्लेख मधून मधून येतात, त्यावरूनही वरील तर्कास बळकटी येते. उदाहरणार्थ, लेखाक २९५ मध्ये पुढील मजकूर आहे-—
"किसोरासिंगाने रदबदली केली की, आपल्याकडे गाव आवरिया वगैरे आहेत. त्यापैकी दहा हजार रुपये सालाबाद घेतां, ते माफ करावे. त्यावरून त्यास माफ करून सनद दिली . त्याजकडे, **कारकुनी** दरसाल पाचशे रुपये द्यावेत, असा करार केला आहे. सन १८ चे सालापासून द्यावे असा करार करून चिठी लिहून घेतली आहे. सतराचे त्याने सोडवून घेतले. आम्हास म्हणाले, 'ते माफ करावे; पुढे आपली **कारकुनी** घ्यावी.' मग आम्ही शेपन्नास कमजास्त करून ठीक करून घेतले... आमची कारकुनी अलीकडील एका महिन्याची न अलीपलिकडील अगदी घेतली. परतु त्यानी चिठ्या करून दिल्या आहेत. बारातेराशे वसूल होणे आहेत. होतील तेव्हा खरे. इ. इ."

अशाच तऱ्हेचा मजकूर इतरत्र अनेक ठिकाणीही या पत्रामधून आलेला आहे. यावरून सर्व गोष्टीचा बराच स्पष्ट उलगडा होतो. जोती गोपाळ प्रभृति गृहस्थ हे अंतर्वेदीतील गावोगावचे सरकार देणे वसूल करण्याचा प्रयत्न करीत होते व त्याबरोबरच स्वतःकरिता **कारकुनी** म्हणून एक प्रकारचा मुशाहिराही जमीनदाराकडून घेत होते व ही सर्व हकीकत दक्षिणेत जनार्दनपताना पत्रद्वारे लिहून कळवीत होते, इतक्या गोष्टी वरील मजकुरावरून उघड होतात. आता या वसुलाच्या उल्लेखाबरोबर इतर राजकारणी घडामोडीचे उल्लेखही ज्योतीपताच्या पत्रात पुष्कळ येतात, हे खरें आहे. पण त्या धामधुमीच्या काळात असे होणे साहजिक आहे. शिवाय लष्करी खाते, राजकारणी खाते व मुलकी खाते याची फारकत मराठ्याच्या अंमलात नीटशी झालेलीच नव्हती. त्यामुळे एकच व्यक्ति आपली मुख्य बाजू साभाळून इतर बाजूंकडेही लक्ष पुरवीत असे.

" गोविंदपत बुंदेले, राघोराम पागे व जोती गोपाळ या तिघाना गिलच्याचा समाचार घेण्यासाठी उत्तरेत पाठविले" हे कथामृतकाराचे विधानही तारतम्याने घेतले म्हणजे आपणास अनुकूलच जातें. अहमदशहा अबदालीच्या स्वाऱ्या त्या काळीं एकामागून एक होतच होत्या.

अर्थात् त्याच सुमारास उत्तरेस गेलेल्या ज्योतीपंतास गिलच्याचा पराभव करण्याकरिता उत्तरेस पाठविलें असें त्याच्या चरित्रकारानी वर्णन करावें हें साहजिकच आहे. इतकी अतिशयोक्ति जुन्या वळणाच्या कवीमध्ये क्षम्य आहे. गोविंदपंत हे तर ज्योतीपंताबरोबर उत्तरेकडे जाताना होतेच. राघोराम पागे हे कोण होते व ते उत्तरेकडे कशाकरितां गेले होते याचा मात्र खुलासा होत नाही. पुढेमागे शोध करता ऐतिहासिक कागदपत्रातून त्याचे नाव कदाचित् आढळेलही.

ज्योतीपंतानी लिहिलेला लेखांक २८५ पुढीलप्रमाणे आहे.

" सेवेसी जोती गोपाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना येथील वर्तमान तागाईत ज्येष्ठ वा। ५ मिति हिंदुस्थानी स्वामीचे कृपावलोकनेकरून सेवकाचे यथास्थित असे. विशेष, स्वामींनी आज्ञापत्र पाठविले ते चैत्र शु॥ १४ श्रीकाशींत पावलें. त्याजवरी वैशाख वा॥ (शु॥ ?) ५ पंचमीस निघालो ते अयोध्येकडून ब्रह्मावर्तास आलों, तों तेथे अमल होऊन आठ दिवस झाले होते. तेथून वैशाख शु॥ ११ गुरुवारीं उंबरगडास दाखल झालों. आपले मंडळीची व श्रीमंत राजश्री बाबाची भेट झाली. माणसे श्रींतच ठेविलीं. सडे एक माणूस व एक तट्टू असे आलों. सोबती काशीकर ब्राह्मण पांच सात होते, म्हणून मार्गी निभाव झाला. अंतरवेदींत बहुतकरून अमल बसला आहे. कड्याकडे अद्यापि दंगा आहे. फर्काबादेपलीकडे रोहिल्यांची फौज आली आहे, म्हणून वर्तमान आहे. व जाट व गंगोबातात्या मथुरेजवळ उतरून कौलास ( कोळेस ? ) आले हेही वर्तमान आहे. नवाब सुज्यातदौला काशीस दाखल झाला. शहाजादाही पाटणियाहून दोन मजली आलीकडे आला आहे. सुजातदौले व त्याची भेट होणार. त्यास, त्यांजमध्ये काही विषम पडलें. म्हणून वर्तमान आहे की मिरजाकोचक पूर्वी प्रयागीं होता तो शहाजादा याजकडे गेला होता. त्याजवरी सुज्यातदौला याने तो तिकडे गेलियावर प्रयाग घेऊन त्याचीं माणसे धरलीं, म्हणून तो शहाजाद्यापासून अयोध्येस आला. त्याजलाही धरून बंदीस घातलें. त्यास हल्ली दिल्लीकडून आलियावरी त्यास जिवे मारिला. त्याचीं मुले बायका अशीं सातजण मारून टाकलीं. याकरितां शहाजादा यास विषाद आला आहे. पुढे जें होईल ते

होवो. आजतागाईत राजकीय वर्तमान या प्रांतीं ये रीतीचें आहे. राजश्री मल्हारराव होळकर सुभेदार माघारे फिरले, म्हणून वर्तमान आहे. जानोजी भोंसले सागर प्रातास आले होते, तेहि मल्हारबा देशास गेले असें वर्तमान ऐकून नागपुराकडे गेले. बुंधेले याचा सला मात्र करून देऊन गेला. सल्याचा करार करून हिंदुपतराजे यानी बाळाजीपंतास पत्र लिहून दिलें की तुमचा व आमचा पूर्ववत् प्रमाणे सलुख. कळावे. गुरसराई व कोंच या प्रांतीं गव्हारांनी दगा केला आहे. तूर्त या प्रांतीं गंगाधरतात्या मात्र आहेत. मथुरेजवळ उतरून अंतरवेदींत आले म्हणोन खबर आहे. काय होईल ते पहावें. सेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना."

यांत पुणे दरबारच्या आज्ञेवरून काशीहून अंतर्वेदीमध्ये त्वरेने आल्याचा ज्योतीपंत उल्लेख करितात. यावरून असे दिसते की १७६० च्या प्रारंभीं अबदालीने अंतर्वेदीवर आपला ताबा बसविला त्या वेळीं त्याने मराठ्यांचे सर्व कारकून व अंमलदार हुसकून लावले. पानपतची लढाई होऊन जाईपर्यंत ही मडळी काशी वगैरे दूरच्या ठिकाणीं दबा धरून बसली असावी. पुढे अबदाली गेल्यानंतर पुनः अतर्वेदींत जाऊन अम्मल बसविण्याबद्दल दक्षिणेतून हुकूम सुटले असावे व त्या हुकुमानुसार ज्योतीपंत हे काशीहून अंतर्वेदीत आले असावे.

पहिल्या खंडातील लेखाक ३००, ३०१ व ३०२ हीं पत्रें नोवेंबर १७६३ मधील असून त्यात इतर राजकीय वर्तमान व वसुलाच्या बाबी याशिवाय भाऊसाहेबांच्या तोतयासंबधाची बातमी विशेष प्रामुख्याने वर्णिलेली दिसून येते. या पत्रावर लेखक व उद्दिष्ट व्यक्ति या दोघांचीही नावे नाहीत. तथापि पत्राच्या सरणीवरून तीं ज्योतीपंताचीच असावीं असे वाटते.

उत्तर हिंदुस्थानात पेशव्याच्या नोकरींत ज्योतीपंत किती दिवस होते याचा अंदाज करण्यास काही साधन नाही. उत्तरेत असतानाच त्यांच्या आयुष्यांत मोठे स्थित्यंतर घडून आले. एका रात्रीं त्यांना महापुरुषाचा दृष्टांत झाला व काशीस जाऊन पुरश्चरण करावे अशी त्याची आज्ञा झाली. त्याबरोबर त्यांनी लेखणी व शस्त्र खाली ठेविलें; सरकारात राजीनामा लिहून पाठविला व काशीस जाऊन सहा महिने मनकर्णिकेवर नाभीपर्यंत उदकांत उभे राहून गायत्री पुरश्चरण केलें. पुढे व्यासांनी

त्यांस प्रत्यक्ष दर्शन दिलें व रात्रीं एक भागवताची पोथी त्यांच्यापाशीं आणून देऊन 'ही वाचताच तुला ज्ञान व भक्ति प्राप्त होईल' असा वर दिला. द्वादशाक्षरी मंत्राचा कानामध्ये उपदेश करून व्यास गुप्त झाले. पुढे ज्योतीपंतानी भागवतसंहितेचे पारायण करण्यास प्रारभ केला; एका दिवसात अठरा हजार भागवत सहिता त्यानी वाचून संपविली.

उदयाचलीं आरंभ केला । रवि अस्ताचलीं गेला
अठरा हजार सहितेला । संपविली तयेवेळीं ॥

काशीच्या ब्राह्मणानी हे अद्भुत कृत्य पाहताच त्याना मत्सर उत्पन्न झाला. त्यानी श्रीविश्वेश्वराकडे गाऱ्हाणे नेले; तेव्हा विश्वेश्वराने ज्योतीपंताना प्रत्यक्ष दर्शन दिले व

'आता पुरे अनुष्ठान । कार्य जाले तुझे संपूर्ण
प्राप्त जाले भक्तिज्ञान । आणखी साधन नको आता ॥'

असे सागितले.

प्रत्यक्ष शंकरानी प्रकट होऊन ज्योतीपंताचा इतका गौरव केला हें पाहताच काशीवासी ब्राह्मण थक्क झाले. ज्योतीपंताचा जयजयकार करून त्याना **'महाभागवत'** असे अभिधान त्यानी दिले. पुढे काशीच्या दक्षिणेस गंगेच्या पलीकडच्या तीरावर रामनगर म्हणून एक ठिकाण आहे तेथे ज्योतीपतानी व्यास व शुकाचार्य याच्या प्रतिमाची स्थापना केली व तेथील राजाने केलेला सत्कार ग्रहण करून स्वारी दक्षिणदेशी यावयास निघाली.

ज्योतीपंतासारखे 'महाभागवत' साधुपुरुष हे संतांचें माहेरघर व भागवतधर्मीयांचे परमधाम जे पंढरपूर ते सोडून प्रथम दुसरीकडे कोठे जाणार ? काशीहून ज्योतीपंत थेट पंढरीस आले व तेथे त्यानी भजनकीर्तनाचा गदारोळ सुरू केला. हजारो लोकाचा मेळा त्याच्याभोवती जमू लागला. येथे असताना त्यानी एक विलक्षण हिमतीची अद्भुत गोष्ट केली. प्रत्यक्ष श्रीविठ्ठलाच्या सान्निध्यात भजनकीर्तनाच्या आनंदामध्ये त्याचे मन नेहमी रगून गेलेले असे. अशा प्रेमनिर्भर मनःस्थितीमध्ये त्यानी 'पंधराशे देवळे बांधून त्यात श्रीविठ्ठलाच्या प्रतिमा मी स्थापन करीन' असा सकल्प सोडला. नंतर भानावर येऊन विचार करितां त्यांचा त्यांनाच मोठा अचबा वाटला व या प्रतिज्ञेतून आपण कसे उत्तीर्ण

होऊं याची त्यांना मोठी चिंता लागून राहिली. ज्योतीपंताच्या आयुष्यांतील स्थित्यंतराचा हा आणखी एक मोठा प्रसंग होय. यापुढे त्यांचे आयुष्य सर्व महाराष्ट्रभर संचार करण्यांत गेलें. या संचारात त्यानी भक्तिप्रेमाचा प्रसार तर सर्वत्र केलाच पण ठिकठिकाणीं देवळे बाधून त्यात विठोबाच्या मूर्तीची स्थापना करण्याचा प्रयत्न अगदी आटोकाट केला. त्याच्या हयातींत देवळाची संकल्पित संख्या जरी पूर्ण झाली नाही, तरी एकंदर ७५० देवळें त्यानी बाधलीं असे म्हणतात. ही सख्या देखील काही कमी नव्हे ! इतकीं देवळें बाधण्यास किती अचाट प्रयत्न करावा लागला असेल याची कल्पना ज्यानी एखादे लहानसे घर बाधून बघितले आहे त्यासच येईल !

असो. पंढरपुरास चातुर्मास राहून ज्योतीपत पुढे नीरानरसिंगपुरास, तेथून फलटणास व तेथून पुण्यास आले. फलटणास सगुणाबाई निंबाळकर या राज्य करीत होत्या. त्यानी ज्योतीपंताचा सत्कार करून त्यास महिनाभर राहवून घेतले. पुण्यास येताच त्याचा कसा सत्कार झाला याचे कथामृतकारानी केलेले वर्णन—

पावले शहराबाहेरी । वर्तमान गेले राजद्वारीं
ज्योतीपत आले अवधारी । चला दर्शना म्हणती जन ॥
ऐकोनि निघाली श्रीमताची स्वारी । नाना फडणीसादि बरोबरी
भेट जाली समोरासमोरी । घेऊनि जाती सदनाप्रती ॥
सभा झाली राजवाडिया । भेटावया आले लोक तया
मार्ग नाही जावया । ऐसा समारभ वर्तला ॥

पुण्यास ज्योतीपतानी भागवत स्वाहाकार केला; भजनकीर्तनादि प्रकार तर नित्य सुरू होतेच. पुण्यास देऊळ बाधावयास सुरवात करून ज्योती पंत साताऱ्यास गेले; तेथून वाई, माहुली, कराड, चरेगाव, पाटण, उंब्रज वगैरे गावीं संचार करून व प्रत्येक ठिकाणीं प्रतिमा स्थापन करून करवीरीं गेले. तेथून पटवर्धन सरदाराच्या मुलखामध्ये संचार करून बेळगावावरून घाट उतरून ज्योतीपंत सावंतवाडीस गेले. तेथे देऊळ बाधून रत्नागिरीस, रत्नागिरीहून उरण बंदरास व उरणाहून ते मुंबापुरीस प्राप्त झाले. मुंबईचे काळबादेवी टापूंतील विठ्ठलवाडीचे विठ्ठलमंदिर ज्योतीपंत यांनीच बाधलेले आहे. पुढे ठाणे, वसई व कल्याण या तीन

ठिकाणीं प्रतिमा स्थापन करून घाट चढून ज्योतीपंत तळेगावीं आले. तेथील दाभाडे सेनापति याची पूर्वीचीच ओळख होती. दाभाडयानी सामोरे जाऊन स्वागत केले व ज्योतीपंतास कडकडून भेटून मोठ्या प्रेमभावाने गोष्टी केल्या. तळेगावाहून पुढे ज्योतीपंत पुण्यास आले व तेथे श्रीमंत पेशव्याच्या आसऱ्याने बरेच दिवस वस्ती केली. पुण्यास मदिर बाधून तयार झालेच होतें. त्या मंदिरात प्रतिमा स्थापन करून पुढे पुण्यनगरवासी जनाचा निरोप घेऊन उत्तरदिशेकडे संचारास निघाले. नाशिक, त्रिंबक, येवले हीं स्थाने घेऊन वऱ्हाडात बाळापूर आकोल्यास येऊन पोचले. अकोल्याहून स्वारी नागपुरास आली. नागपुरास एक महिनाभर गावाबाहेरच मुक्काम करून कीर्तन, भजन, ब्राह्मणभोजन वगैरेचा धूमधडाका सुरू केला. नागपूरचे मुधोजीराजे भोसले गुरूच्या सागण्यावरून अभिमान धरून प्रथम उदासीन राहिले होते, ते शेवटीं भेटावयास आले; व येताच

राजा आला जवळी। वाहनातून उतरला तत्काळीं
दर्शन होता ते वेळीं। देहभान गेले तयाचे ॥

अशी त्याची स्थिति झाली. त्याचे अभिमानी गर्वोद्धत गुरु धोंडभट कटके हेही लज्जित होऊन ज्योतीपंताचे पदी लीन झाले. ते अत्यंत विद्वान्, दशग्रंथी ब्राह्मण होते; ते एव्हापासून ज्योतीपंताचे परम शिष्य बनले. नागपुरास विठ्ठलमदिर बाधले, भागवतसप्ताह केला व गोपाळकाला करून सर्व लोकाना प्रेमानंदात तल्लीन करून सोडून ज्योतीपंत बाहेर पडले. पुढे उज्जैनीस जाऊन तेथे विठ्ठलमदिर स्थापन करून मग दक्षिणेस वळले. दक्षिणेस या खेपेस त्यानी निजामाच्या हैद्राबादेवर रोख धरिला. हैद्राबादेस ज्योतीपंतानी येऊन शिष्यासह तळ दिला. तेथील यवनाना पंताच्या शिष्यानी चालविलेला हरिनामाचा गजर सहन झाला नाही. शिष्यानी ज्योतीपताकडे तक्रार नेली. ज्योतीपंतानी पूर्ण निर्भयतेने

मग पत्र लिहिलें नबाबासी। साभाळी आपुले प्रजेसी
स्वधर्म आमुचा आम्हासी। निषेध करणे केवि काज ॥

तेथील यवनाच्या दबकावणीस भीक न घालता एक महिनाभर माणिक चौकात ज्योतीपंतानी कीर्तने केलीं व सर्व हिंदुसमाजास तन्मय करून

सोडलें. तेथील काजीचा व ज्योतीपंतांचा वाद झाला, त्यात पंतांनी काजीला कुंठित करून सोडलें. त्याच्यामधलीं प्रश्नोत्तरे कथामृतकाराने मोठीं गमतीचीं दिलीं आहेत. परंतु स्थलाभावास्तव त्याचा येथे अनुवाद करता येत नाही. दुसऱ्या दिवशीं ह्या यवनांनी ज्योतीपंताच्या कीर्तनात मस्त हत्ती सोडला. परंतु तो जवळ येतांच स्तब्ध होऊन ज्योतीपंताचा उपदेश ऐकत उभा राहिला. काही वेळाने आपला भालप्रदेश त्याने पंताच्या चरणावर टेकला व तो तेथल्या तेथेच विकलाग होऊन पडला. हा विलक्षण प्रकार ऐकून खुद्द नबाबाची स्वारी तेथे आली. त्याने विनंती केल्यावरून ज्योतीपंतानी हत्तीला जिवंत केले. हत्ती उठून उभा राहिला व मालकास मुजरा करून पुनः, त्याचे आयुष्य संपले असल्याकारणाने, गतप्राण होऊन पडला. हा अद्भुत प्रकार पाहून खुद्द नबाबाची देखील पंतावर श्रद्धा बसली व त्याने अत्यंत आदराने त्याची बोळवण केली.

याप्रमाणे निर्याणसमय येईपर्यंत ज्योतीपतानी सर्वत्र सचार करून भक्तिप्रेमाचा प्रसार केला व प्रतिमास्थापनाचे कार्य केले. वर जो हत्तीचा चमत्कार त्रोटक रीतीने सागितला तशा तऱ्हेचे अनेक चमत्कार कथामृतकारानी रसाळ वाणीने व पाल्हाळिकपणाने सागितले आहेत. त्याच्यावर कोणाचा विश्वास बसो वा न बसो, त्यानी १५ वर्षेपर्यंत स्वतःच्या योगक्षेमाची तिळमात्रही काळजी न बाळगता एकसारखे पर्यटन केले व हजारों लोकाना परमेश्वरभक्तीच्या वाटेस लाविले; शेकडो देवळे बाधलीं व त्यापैकी कित्येकाना चागले उत्पन्न मिळवून देऊन त्याच्या पूजनअर्चनाची कायमची व्यवस्था लावून ठेविली; हे देखील त्यानी केलेले लहानसान चमत्कार नव्हेत ! आणि हे चमत्कार मिथ्या म्हणण्याची सोय नाही, कारण त्याच्या सत्यतेची साक्ष देणारीं अशीं त्यानी बाधलेलीं देवळे जागोजाग अस्तित्वात आहेत व त्याचा हजारोनी मोजण्याजोगा शिष्यवर्ग त्याच्या नावाचा गजर अद्याप करीत असून त्यानी केलेल्या अपरिमेय उपकाराची स्मृति जागृत ठेवीत आहे.

ज्योतीपत काशीहून दक्षिणेत केव्हा आले व पुढील संचाराचे कार्य त्यानी केव्हा केले हे ठरविण्यास इतिहासाचा काही आधार मिळतो की काय हे आपण पाहू. संचाराची हकीकत वर्णन करताना पुण्याचे नाना

फडणीस, फलटणच्या सगुणाबाई निंबाळकर व नागपूरचे मुधोजी भोसले याचे कथामृतकारानी केलेले उल्लेख या बाबतींत महत्त्वाचे आहेत. परंपरागत माहितीच्या आधाराने केलेले हे उल्लेख विश्वसनीय मानणेच रास्त होईल. काशीहून पंढरपुरास ज्योतीपत आले व तेथून फलटणास गेले हे मागे सागितलेच आहे. फलटणच्या प्रख्यात सगुणाबाई निंबाळकर या पेशव्याच्या संमतीने सन १७७४ सालापासून राज्यकारभार पाहूं लागल्या असे इतिहास सागतो. पुण्यास देखील बारभाईचा कारभार १७७४ च्या आरंभापासूनच सुरू झाला. त्यात प्रथम सखारामबापू प्रमुख होते पण पुढे लवकरच त्याचा प्रभाव कमी होऊन नाना फडणिसाचें तेज राजकारणात अधिकाधिक पडूं लागले. या सर्व गोष्टींचा विचार केला असता ज्योतीपंताचा, दक्षिणेत येऊन सगुणाबाई व नाना याना भेटण्याचा काल १७७६ च्या सुमाराचा असावा असे मानल्यास फारशी चूक होणार नाही. नागपुरास साबाजी भोसले १७७५ मध्ये वारल्यानंतर मुधोजी भोसल्याचाच अमल १७८०-८१ पर्यंत चालू होता. पुढे जानोजीचा दत्तक मुलगा रघूजी (दुसरा) हा वयात येऊन स्वतः कारभार पाहूं लागला. तेव्हा ज्योतीपत १७८० च्या सुमारास नागपुरास गेले असे अनुमान केल्यास फारसे सत्यास सोडून होणार नाही.

तेव्हा १७५८ च्या सुमारास ज्योतीपंत उत्तरेकडे गेले; १७७२-७३ पर्यंत अर्तर्वेदीत पेशव्याच्या राजकीय व मुलकी खात्यामध्ये नोकरी केली; त्यानतर त्याच्या आयुष्यात स्थित्यंतर होऊन ते परमार्थमार्गास लागले; काही काळ काशीस राहिल्यानंतर १७७५ च्या नतर त्यानी दक्षिणेत आगमन केले व पुढे एकसारखी तेरा वर्षे सर्वत्र भक्तिमार्गाच्या प्रसाराकरिता सचार केला; असा त्याच्या उत्तर आयुष्याचा आराखडा स्थूलमानाने सांगण्यास काही हरकत नाही. शके १७१० (सन १७८८) मध्ये पुण्यास नेहमीप्रमाणे कीर्तन करीत असता आता लवकरच आपण कृष्णातीरीं जाणार असा हेतु ज्योतीपंतानी श्रीमंत पेशव्यास निवेदन केला.

ज्येष्ठ पुत्राचे कुटुब निवर्तले । त्यासी स्थळ कृष्णातीरीं योजिले
आप्तवर्ग तेथे असती भले । कार्य व्हावे तेथेची ॥

यावर श्रीमतानी 'कार्य येथेच करावे, मी सर्व आप्तवर्गाना आणवितो'

असें म्हणून त्यांना परावृत्त करण्याचा प्रयत्न केला, परंतु ज्योतीपंतांचा अंतरींचा हेतु निराळाच होता.

ऐकोन बोलती स्वयंज्योती । दुसरें कारण योजिलें चित्तीं
जीर्णवस्त्र त्यागावें निश्चितीं । ठाव आहे कृष्णातीरीं ॥

या आपल्या निश्चयाप्रमाणे मार्गशीर्षमासीं साताऱ्यानजीक कृष्णातीरीं चिंचणेर म्हणून गाव आहे तेथे ज्योतीपंत गेले. लग्नाचा मुहूर्त वद्य दशमीचा होता. कार्य यथासाग पार पडले. एकादशीचा दिवसही गेला. द्वादशीयुक्त त्रयोदशीच्या दिवशीं प्रदोषकालीं

देखता आसन घालुनी बैसले । ब्रह्माडीं प्राण चढविले
राजयोगे ब्रह्माड भेदिले । ठेविला देह ते काळीं ॥

ज्योतीपताचा जन्म शके १६३८ मध्ये झाला, ही परंपरागत माहिती खरी धरल्यास मृत्युसमयीं त्याचे वय बहात्तर वर्षांचे होते असे दिसते. अर्थात् चादोरकर यानी मरणसमयीं त्याचे आयुर्मान एकशें दोन वर्षांचें असावे असे जे विधान केलें आहे ते बरोबर दिसत नाही. चादोरकराचा तर्क मुळातच चुकीच्या समजुतीवर आधारलेला आहे. 'प्रवृत्तिनिवृत्ति ऐक्यता रत्नावलि' नावाचा ज्योतीपंताचा एक गद्य निबध आहे. पताच्या वंशजाजवळ त्याच्या कविताचे जे बाड आहे, त्यात हा निबंध लिहिलेला असून त्याचा समाप्तिकाल पुढीलप्रमाणे दिला आहे. "समाप्त शके १६१३ खर नाम सवत्सर वैशाख शुद्ध १३ हे लिखित सवत्सर शके १७४८ चैत्र विवाह नाम संवत्सर वैशाख शुद्ध भौमवासरे." शके १६१३ मध्ये खर सवत्सर येत नसून १६३३ मध्ये येतो. तेव्हा हे प्रकरण शके १६३३ मध्ये ज्योतीपतानी लिहिले असावे व त्या वेळेस त्याचे वय निदान पंचवीस वर्षांचे तरी असावे असा तर्क चादोरकरानी केला आहे. हा तर्क खरा मानला तर ज्योतीपंताचा जन्म शके १६०२ मध्ये झाला व पंचविशीच्या आतच गृहस्थाश्रम पूर्ण करून ते काशीस गेले असें मानणें प्राप्त होते व चादोरकरानी तसें प्रत्यक्ष म्हटलेही आहे. परंतु ऐतिहासिक आधारानिशीं त्याचें जे चरित्र वर रेखाटलें आहे त्यावरून हे तर्काने बसविलेले काळ चुकीचे ठरत आहेत. शके १६८३ (पानिपतानंतरचा काळ)

मधील ज्योतीपंतांचीं पत्रे आहेत त्यावरून तोंपर्यंत ते राजकारणी घडामोडीतच पूर्णपणे मग्न होते हे सिद्ध आहे. शिवाय कथामृतकाराने वर्णिलेल्या चरित्राशीं चादोरकराचा तर्क पूर्णपणे विसंगत आहे. हा सारा घोटाळा लेखकप्रमाद कसे होतात याकडे बिलकूल लक्ष न पुरविल्यामुळे झाला आहे. बाडातील अज्ञ लेखकाने शके १६१३ लिहिला तो अर्थात् चूकच आहे, परंतु तेथील खरा आकडा १६१३ नसून १६९३ आहे. एक व नऊ हे आकडे लिहिण्यामध्ये बरेच सारखे दिसत असल्यामुळे कोणा तरी लेखकाच्या हातून प्रमाद होऊन नऊच्या ऐवजी एक हा आकडा तेथे आलेला दिसतो. सध्या ते बाड मजजवळ नसल्यामुळे तो आकडा नीट पारखून पाहता येत नाही. कदाचित् खुद्द बाडातील आकडा एकासारखाच दिसत असला तरी तो खरोखर नवाचाही असू शकेल. तो खरोखर एकाचाच असल्यास नवाच्या एवजी तेथे लेखकाच्या प्रमादामुळे पडला हे तरी निदान निश्चित आहे. शके १६९३ मध्ये खर संवत्सर येतो हे सांगणे नकोच.

ज्योतीपंताच्या ग्रंथरचनेकडे आपण आता थोडेंसे लक्ष पुरवूं. एके ठिकाणी राहून स्वस्थपणाने विचारपूर्वक ग्रंथरचना करण्यास त्यांना फारसा वेळ मिळाला असेल असे त्यांच्या चरित्रक्रमावरून दिसत नाही. ठायीं ठायीं कीर्तनामध्ये भागवतातील कथाभागावर ते स्वयंस्फूर्तीने पुष्कळसे अभंग रचून म्हणत असतील व अशा रीतीने कदाचित् सर्व भागवतावर त्यांच्या हातून रचना झालीही असेल. परंतु त्यांपैकी फारच थोडी उपलब्ध आहे. त्यांच्या वंशजाकडील बाडामध्ये एकंदर १४६६ अभंग आहेत. त्यांत भागवताच्या २, ३, ४, ५, इत्यादि स्कंधांतील विषयाचा अनुवाद आलेला आहे. परंतु यामध्ये सुसंगत व क्रमवार रचना बहुतेक नसून या सर्व अभंगाचा रचनाकाळ सांगता येत नाही. कारण वर सांगितल्याप्रमाणे बहुधा संचारात असतां कीर्तनसमयीं ते रचलेले असावे. याशिवाय शके १६९३ मध्ये लिहिलेला 'प्रवृत्ति निवृत्ति ऐक्यता रत्नावलि' नावाचा गद्य निबंध या बाडातच आहे. त्यामध्ये वेदान्ततत्त्वाचे सुंदर निरूपण केले आहे. आयुष्याच्या शेवटीं शेवटीं थोडीशी स्वस्थता मिळून भागवतावर यथाक्रम रचना करण्याचा उपक्रम

ज्योतीपंतांनी केला होता असें दिसतें. स्कंध १ व २ यावर ओवीबद्ध टीका त्यांनी लिहिली. प्राथमस्कंधची ओवीसंख्या ५४५४ व द्वितीयस्कंधाची ८१०४ आहे. शिवाय याच वर्षी वेदस्तुतीवरील ओवीबद्ध टीकाही त्यानी लिहिली असून तिची संख्या १४७२ आहे. हे ग्रंथ रहिमतपूर येथील मठामध्ये ज्योतीपताच्या शिष्यानी लिहून घेतलेले आजवर शाबूत आहेत. भागवताची ओवीबद्ध टीका याहून जास्त ज्योतीपताच्याकडून रचली गेली असावी असें दिसत नाही. कारण, पुढील भाग उपलब्ध होत नाहीत व पहिले दोन स्कंध रचल्यानंतर एका वर्षात त्याचा कालही झाला. भागवतावरील अभग तर त्रुटित व फुटकळ स्वरूपात रचले व तसेच ते उपलब्ध आहेत हे वर सांगितलेच आहे. तेव्हा 'परंतु समग्र भागवतावर अशी ज्योतीपंतानीच काय ती टीका केलेली आहे, व ती सुद्धा एक अभंगबद्ध व दुसरी ओवीबद्ध' हे कै. पाडोबा पटवर्धनाचे विधान फारच अतिशयोक्तिपूर्ण आहे हे उघड आहे. त्याचप्रमाणे कथामृतकारानी केलेले पुढील विधान समजावयाचे—

स्थापनेकारणे संचार करिता। अठरासहस्र भागवत ग्रंथा
प्रतिश्लोकी अभंग एक तत्वता। केले खडोपंती लेखना॥
दुजी ओव्याबद्ध टीका केली। ठाई ठाई शिष्यापाशी राहिली
उपलब्ध वशा नाही जाहली। दोन स्कध मठी असती देखा॥

यात वर्णिलेली परिस्थिति अंशतः मात्र खरी आहे : प्रतिमास्थापनार्थ संचार करीत असता ज्योतीपंतानी भागवतावरील अभंगाची रचना केली व खंडोपंत नावाचा शिष्य त्याचा लेखक असे या दोन गोष्टी खऱ्या आहेत. असो.

ज्योतीपंताच्या ग्रंथाचे सविस्तर निरीक्षण करण्यास येथे अवकाश नाही व तसा उद्देशही नाही. सविस्तर निरीक्षणाच्या अभावीं वाङ्मयगुणाच्या दृष्टीने त्याची योग्यता ठरविण्याचा प्रयत्न करणे हेही रास्त होणार नाही. वाङ्मयगुणाच्या दृष्टीने त्याची रचना सामान्यतः सरळ सुंदर व प्रसादपूर्ण आहे, एवढे विधान मात्र सहज करता येईल.

अत्यंत रसाळ व गोड वाणीची देणगी ज्योतीपताना लाभली होती. त्याच्या अमोघ व प्रासादिक वाणीमुळेच गणपतीने त्याच्या जिभेवर

ॐकार लिहिला व व्यासानी प्रत्यक्ष प्रगट होऊन त्यांच्या मस्तकावर हस्त ठेविला वगैरे भाविक कथा उत्पन्न झाल्या असाव्या. श्रीमद्भागवत हें तर ज्योतीपंताच्या जिव्हाग्रावर केवळ नाचत होते. प्रेमळ स्वभाव, रसाळ व प्रसादपूर्ण वाणी व भागवताची निरतर उपस्थिति या तीन्ही गोष्टी ज्योतीपंताच्या वंशजानाही वंशपरंपरेने प्राप्त झालेल्या दिसून येतात. त्यामुळे व्यासाचा वरदहस्त सबध जरी नसला तरी त्याच्या एखाद्या अंगुलीचे टोक तरी वंशजाच्या मस्तकावर खास आहे असे वाटू लागते. गोवे, सावंतवाडी वगैरे प्रातात याचे वजन अद्याप बरेच असून तिकडेच याचा संचार मुख्यत्वेकरून होत असतो. भक्तिप्रेमाचा महिमा वाढवून समाजामध्ये सदाचार, समाधान, सुव्यवस्था, शाति प्रस्थापित करण्याकडे ज्योतीपंतासारख्या साधुपुरुषाचा उपयोग होत असतो. ज्योतीपतानी तर एतदर्थ आपल्या आयुष्याचा व्यय केलाच. शिवाय त्याचे वंशजही आजवर हेच कार्य यथाशक्ति करीत आले आहेत. यापुढे सामाजिक स्थित्यंतराच्या झजावातात त्याच्या कुळाची ही पूर्वीचीच भूमिका कायम राहील की नाही हे कोणी सागावे ?

ज्योतीपताच्या कवितापैकी काही निवडक भाग तरी छापून निघणे अवश्य आहे. त्याच्या भक्तमंडळीपैकी कोणी हे श्रेय संपादिल्यास त्याची गुरुभक्ति सार्थकीं लागणार आहे.



# २

## युगप्रवर्तक नाटककार

# अण्णासाहेब किर्लोस्कर

[ 'प्रकाश' ता. २० नोव्हेंबर १९३८ ]



[नागपूर येथील अभिनव नाट्यमंदिर या संस्थेतर्फे ता. २ नोवेंबर १९३८ रोजीं किर्लोस्कराचा स्मृतिदिन साजरा करण्यात आला. त्या प्रसंगीं प्रा. बनहट्टी यानी दिलेल्या व्याख्यानाचा साराश लेखरूपाने मुंबईच्या 'प्रकाश' साप्ताहिकात प्रसिद्ध झाला, तोच येथे उद्धृत केला आहे. परिच्छेदाचे मथळे 'प्रकाश'च्या संपादकानी दिलेले असून त्यात बनहट्टींनी क्वचित् बदल केलेला आहे.]

## युगप्रवर्तक नाटककार

आधुनिक महाराष्ट्रात अव्वल दर्जाचे प्रतिभाशाली व युगप्रवर्तक असे जे पुरुष होऊन गेले त्यामध्ये अण्णा किर्लोस्कर याची अवश्य गणना करावी लागेल. केवळ नाट्याचे व ललितकलाचे अभिमानी अशा लोकानाच अण्णाची ही योग्यता पटते असे नसून अखिल महाराष्ट्रात त्याची नाटके सुशिक्षितापासून अगदी अडाण्यापर्यंत सर्वांच्या तोंडी पन्नास वर्षे एकसारखी खेळत होती, यावरून बहुजनसमाजासही त्याच्या कर्तृत्वाची खूण पटलेली होती असे उघड दिसते.

कै. वि. का. राजवाडे यानी मागे जुन्या लोकशिक्षण मासिकात 'महाराष्ट्रातील बुद्धिमान, प्रतिभावान व कर्त्या लोकाची मोजदाद' म्हणून एक लेख लिहिला होता. त्यानी महाराष्ट्रातील गेल्या शंभर वर्षांतील कर्त्या पुरुषाची सुमारे १५० नावाची एक यादी प्रसिद्ध करून त्यातून गाळता गाळता अखेरीस अव्वल दर्जाचे प्रतिभाशाली व युगप्रवर्तक म्हणून सात पुरुषाची नावे निवडून काढली होती. आधुनिक महाराष्ट्रातील या सर्वश्रेष्ठ सप्तर्षीमध्ये राजवाड्यानी अण्णा किर्लोस्करांना स्थान दिले आहे, यावरून संशोधनासारख्या रुक्ष विषयात गढलेल्या राजवाड्याच्या चिकित्सक बुद्धीसही अण्णाच्या कर्तबगारीचे महत्त्व कसें पटलें होतें हें दिसून येतें.

## पौराणिक नाटकांची परंपरा

अण्णाच्या कर्तबगारीचे रहस्य जाणून घ्यावयाचें असेल तर त्यासाठी त्यांच्या पूर्वीच्या नाट्यकलेच्या इतिहासाचें थोडेसें पर्यालोचन

केलें पाहिजे. कित्येकांची समजूत अशी असलेली आढळते की, मराठींत नाटकें अण्णानीच सुरू केलीं, अर्थात मराठी नाटकाचे आद्याचार्य म्हणून त्यांचें महत्त्व आपण मानलें पाहिजे. परंतु ही समजूत बरोबर नाही. अण्णांच्या पूर्वी नाटके होतीं. त्या नाटकाचे प्रयोग होत असून ते त्या काळाच्या मानाने लोकप्रियही होते. महाराष्ट्रांत नाट्यकलेच्या जोपासनेस सुरुवात सुमारे १०० वर्षांपूर्वी म्हणजे १८४३ सालीं झाली. या साली सागलीचे विष्णु अमृत ऊर्फ विष्णुदास भावे यानी सागलीच्या संस्थानिकाच्या आज्ञेवरून कानडी नाट्यप्रयोगाच्या धर्तीवर मराठींत पौराणिक आख्यानावर नाटके रचून त्याचे प्रयोग करून दाखविण्यास सुरुवात केली. भाव्याच्या नाटकांची तऱ्हा इतर पुष्कळ जणानी उचलली व लवकरच अशी पौराणिक नाटके करणाऱ्या कंपन्या महाराष्ट्रात गावोगाव हिंडू लागल्या. पुढे लवकरच विष्णुदास भावे हे या नाट्यव्यवसायातून निवृत्त झाले, तरी पौराणिक नाटकाची परंपरा तशीच पुढे चालू राहिली आणि किर्लोस्कराची सगीत नाटके निघाल्यानंतर देखील १९ व्या शतकाच्या अखेरपर्यंत, ही परंपरा जीव धरून होती.

तथापि भाव्याचीं पौराणिक नाटके (यानाच ‘अललडुर’ नाटके अगर दशावतारी खेळ असे म्हणण्याचा प्रघात आहे) सुशिक्षिताच्या अभिरुचीच्या अपेक्षा फार दिवस पूर्ण करूं शकली नाहीत. त्याच्या नाटकात धागडधिंगा फार. ललितकलाच्या कोमल अगास अवसर फारच कमी. त्याचप्रमाणे प्रत्येक नाटकात तोच गणपती, तीच सरस्वती, त्याच देवराक्षसाच्या कचेऱ्या, यामुळे विविधता फारच कमी असे; बहुतेक सर्व पौराणिक आख्यानावर भावे व त्याचे अनुकरण करणारे इतर लोक यानी नाटके रचलेलीं होतीं. तथापि त्याच्या नाटकांना वाङ्मयात्मक स्वरूप नव्हते. आख्यानाचा कथाभाग पदामध्ये गोविलेला असून हीं पदे सूत्रधार म्हणून दाखवीत असे. सर्व कंपनीमध्ये सूत्रधार हा एकटाच काय तो गाणारा असून तो नाटकाच्या प्रारंभापासून अखेरपर्यंत रंगभूमीवर हजर राहून योग्य समयीं पदें म्हणून दाखवून कथानक कोठपर्यंत आलें आहे याची प्रेक्षकांस जाणीव करून देत असे. तिकडे रंगभूमीवर देवांची कचेरी, राक्षसाची कचेरी, स्त्रियांची कचेरी वगैरे क्रमाक्रमाने येऊन

कथानकाशीं कांहीशीं सबद्ध व कांहीशीं असंबद्ध अशीं आपलीं कामें करीत. पात्रांचीं संभाषणें बहुतकरून स्वयंस्फूर्तच असत. देवराक्षसांचें युद्ध, आरडाओरड, दणकेबाजपणा, यांनी सर्व प्रयोग भरलेला असे.

**नाट्यवाङ्मयास प्रारंभ**

इंग्रजी अमलामध्ये शिक्षणाचें प्रमाण व क्षेत्र जसजसें वाढू लागलें, तसतशी या पौराणिक नाटकानी समाजातील वरच्या थराची करमणुकीची भूक भागेनाशी झाली. १८५७–५८ सालाच्या सुमारास मुंबई युनिव्ह-र्सिटीची स्थापना होऊन इंग्रजी व संस्कृत वाङ्मयाच्या अध्ययनास मोठी चालना मिळाली. कालिदास-भवभूत्यादि संस्कृत नाटककार व शेक्सपि-यरसारखे आंग्ल नाटककार याची नाटके सुशिक्षित वर्गाच्या डोळ्यासमोर खेळू लागली. त्याच्या धर्तीवर नाटके रचावी व प्रयोगात आणावी अशी स्फूर्ति आमच्या सुशिक्षितास होण्यास काही फारसा काळ जावा लागला नाही. संस्कृत नाटकाचे प्रयोग कॉलेजातील विद्यार्थी मोठ्या उत्साहाने करूं लागले आणि त्याची तत्कालीन नेत्याकडून वाहवा होऊ लागली.

नाटके लिहिण्यास सुरुवात साधारणपणे याच सुमारास झाली. १८६०–६१ च्या सुमारास महादेव गोविंद रानडे याचे सहाध्यायी विना-यक जनार्दन कीर्तने यानी 'थोरले माधवराव पेशवे' हे नाटक लिहिले. हे नाटक आणि त्यानतर थोडयाच वर्षांत लिहिलेले 'जयपाळ' नाटक हीं कोणत्याही इंग्रजी अगर संस्कृत नाटकाची भाषातरे नाहीत, तथापि इंग्रजी व संस्कृत वाङ्मयाच्या अभिजात अध्ययनामुळे उद्भवलेल्या स्फूर्तीचीं तीं निदर्शक आहेत, यात काही शंका नाही. प्रत्यक्ष शेक्सपिय-रचीं व कालिदासादिकाचीं रूपातरे होऊं लागण्याचा काळ फारसा दूर नव्हता. इतकेंच नव्हे तर त्याचे प्रयोग करण्याचे यशस्वी प्रयत्नही थोडयाच अवकाशात सुरू झाले. बजाबा रामचंद्र प्रधानकृत 'भ्रातिकृत चमत्कार,' विष्णु मोरेश्वर महाजनीकृत 'तारा' हीं शेक्सपियरच्या नाटकाचीं रूपांतरे रंगभूमीवर आणून तीं लोकप्रिय करणारी इचलकरंजीकर मंडळी ही १८७५च्या पूर्वीपासून आपले प्रयोग करूं लागली होती. त्याच्याही पूर्वी कीर्तने यांच्या नाटकाचे प्रयोग झालेले असल्याचा दाखला सापडतो.

## अनुकरण निर्जीव ठरलें

तथापि आंग्ल वाङ्मयाच्या अनुकरणाने रचलीं गेलेलीं हीं नाटकें व त्यांचे प्रयोग हे एकंदरीने अल्पजीवीच ठरले. या नाटकांना वाङ्मय-स्वरूप होतें. त्यांचीं कथानकें चित्ताकर्षक होतीं, त्यांतील भूमिकांचीं स्वभावचित्रें उच्च दर्जाचीं होतीं व बाकीचे अनेक नाट्यगुणही त्यांत होते. परंतु एक सामाजिक करमणुकीचा प्रकार या नात्याने तीं फारशीं यशस्वी झालीं नाहीत. त्यात रेखाटलेला सामाजिक जीवनाचा चित्रपट परकीय होता, त्यातील दृश्यें व प्रसंग आपल्या समाजातील जीवनातून उद्भूत झालेले नव्हते. त्यामुळे बहुजनसमाजाच्या अंतःकरणास जाऊन भिडण्याचें सामर्थ्य या नाटकास कधीच आले नाही. रूपांतरकार कुशल असेल तर नाटकात थोडीबहुत चमक निर्माण होई, त्यामुळे फार तर सुशिक्षिताचे रंजन होऊं शके. नाटकात गाणे नाही, अभिनयकौशल्यही बेताचेच, अशा स्थितीत हीं 'बुकिश' नाटकें प्रयोगदृष्ट्या विशेष उजागरीस आलीं नाहीत तर त्यात काहीच नवल नाही.

करमणुकीचे व ख्यालीखुशालीचे सर्वसामान्य असे कोणतेही संभावित साधन समाजास त्या वेळी उपलब्ध नसल्यामुळे करमणुकीची भूक असलेला समाज वाममार्गाकडे वळून आपली भूक शांत करून घेत असे. पौराणिक नाटकाचा खेळ म्हणजे बेताल धागडधिंगा तर 'बुकिश' नाटकें म्हणजे निर्जीव व कृत्रिम पुतळ्याची हालचाल ! अशा स्थितींत यापैकी कोणत्याही प्रकाराने अखिल समाजाच्या मनाची पकड घेतली नाही, यात आश्चर्य नाही. गाणे बजावणे ऐकायचे असेल तर नायकिणीं-च्या मजलसीकडे वळावे, नाहीपेक्षा तमाशे लावण्याचा आश्रय करावा, याखेरीज दुसरी गति नव्हती. अशी स्थिति असल्यामुळे सध्या आपणास कल्पनाही येणार नाही इतक्या प्रमाणात नायकिणीचें प्रस्थ माजून त्यांचा संचार त्या काळीं सर्वत्र होत होता. हरएक कार्यप्रसंगीं नायकिणीचें गाणें करणें ही त्या वेळीं सर्वसाधारण गोष्ट होऊन बसली होती.

## किर्लोस्करांची करामत

अशी सर्वत्र स्थिति असतां अण्णा किर्लोस्करांनी आपल्या प्रति बलाने संगीत नाटकाचा नवीन प्रकार शोधून काढला व समाजातील वर्गांना, सर्व दर्जाच्या, पेशाच्या व अभिरुचींच्या लोकाना आवडेल करमणुकीचे साधन उपलब्ध करून दिले. लोकांच्या भावनाची प घेणाऱ्या अशा सर्व गोष्टींचा अण्णानी आपल्या नाट्यप्रका समावेश केला ही त्याच्या प्रतिभानिर्मित चातुर्याची पहिली खूण हे त्यानी आपल्या नाटकात गाणे आणले, परंतु ते सूत्रधारासारख्या एक आणि पुरुष पात्राच्या तोंडीं न घालता, सर्व पात्रामध्ये, विशेषतः पात्रामध्ये वाटून दिले. वाङ्मयप्रेमी सुशिक्षिताना पसंत पडेल वाङ्मयात्मक स्वरूप नाटकाला असणे, हा जो 'बुकिश' नाटकाचा मु गुण तो त्यानी आपल्या नाटकात आणला. नाट्यदृष्टि त्याच्या अं मूळचीच होती; त्यामुळे लहानपणापासूनच त्याचे वय नाटकें, तमा गाणेबजावणे, इत्यादि छंदामध्येच व्यतीत झालेले होते. पौराणिक ना करणाऱ्या कंपन्या काढण्याचाही त्यानी दोनतीनदा प्रयत्न केला होता 'शांकरदिग्विजया'सारखी वाङ्मयात्मक गद्य नाटकेंही लिहिलीं होतीं. सगळा पूर्ववयात मिळविलेला नाट्यक्षेत्रातील बहुरंगी अनुभव प्रथम संगीत शाकुन्तल आणि पुढे सौभद्र व रामराज्यवियोग या अजरा नाट्यकृति त्याच्या हातून निर्माण करण्यास कारणीभूत झाला.

## नाट्य-रचना-कौशल्य

अण्णा किर्लोस्कर हे अभिजात नाट्यदृष्टि असलेले कुशल नाट कार होते. कथानकाचा उपन्यास वाचकाच्या मनात कुतूहल निम होईल अशा रीतीने करून पुढे आणीबाणीच्या घटने ( crisis ) प कथानकाची वेगाने प्रगति करीत नेणे, मध्यंतरीच्या अवकाश कुतूहलाची तार एकसारखी ताणलेली राहील अशा तऱ्हेने घटनाची संभाषणाची रचना करणे, आणि निकराच्या प्रसंगा- ( crisis ) न झपाट्याने उतार साधून केंद्रीभूत विषयाचा समाधानकारक निक

लावणें हे नाट्यरचनाकौशल्याचें खरें स्वरूप होय. नाट्यरचनेचें हें रहस्य अण्णाना पूर्णपणें अवगत होतें, असें त्यांचें सौभद्र नाटक वाचून आपल्या प्रत्ययास येते. रामराज्यवियोगातील उपन्यासावरून तें नाटक सौभद्रापेक्षाही परिणामकारक वठले असते अशी कल्पना होते. परंतु दुर्दैवाने ते अण्णाच्या हातून पुरे झाले नाही.

नाटकाचा विषय व त्याचे कथानक आपल्या समाजाच्या पूर्ण परिचयाचे, त्याच्या संस्कृतींत मुरलेले असेच निवडण्याची अण्णानी खबरदारी घेतली ही त्याच्या चातुर्याची मोठीच खूण होय. परकीय समाजातील कथानक, आपल्या समाजातील सर्वसाधारण व्यक्तींच्या मनाची भावनात्मक पकड कधीच घेऊ शकणार नाही, त्याविषयी समाजमनास जिव्हाळा कधीच वाटणार नाही. परपरेने परिचित व लोकप्रिय असलेले कथानक आणि त्यात योजिलेले प्रसग समाजमनास आपलेसे व जिव्हाळ्याचे वाटणारे, अशी सर्व योजना केल्यामुळे त्याची नाट्यकृति समाजास जणू काही पूर्वार्जित ठेव्याप्रमाणेच वाटली तर त्यात काही नवल नाही.

## करामतीचें वैशिष्ट्य

आपल्या कल्पनेसाठी वेडे होणारे मन असूनही ती कल्पना अमलात आणण्यास लागणारे चातुर्य, कर्तृत्व व समयज्ञत्व अगीं असणे हें प्रतिभाशालित्वाचे जे मुख्य लक्षण ते अण्णाच्या अंगी पूर्णपणे होते. उत्कृष्ट नाट्यरचनेची बौद्धिक कामगिरी अण्णानी करून दाखविली, यापेक्षाही त्या नाट्याचा प्रयोग अत्यंत सुदर व परिणामकारक वठेल अशी योजना त्यानी घडवून आणली, यात त्याच्या करामतीचे खरें वैशिष्ट्य आहे. अण्णानी आपल्या कंपनींत वैशिष्ट्य आणिले. त्यांनी आपल्या कंपनींत पहिल्या सपाट्यास जितके एकजात उत्कृष्ट गायक व नट जमा केले तितके एका कंपनींत एकत्र जमा करण्याचे संघटन-चातुर्य गेल्या साठ वर्षांत दुसरा कोणीही दाखवूं शकला नाही. यावरून अण्णाची अलौकिक योग्यता आपल्या प्रत्ययास येते. अण्णा स्वतः अभिनयकुशल नट व गाण्याचे मर्मज्ञ होते. आपल्या कंपनींतलीं सर्व

पात्रें त्यांनी गाणें व अभिनय या बाबतींत, त्या काळच्या मानाने नमुनेदार बनविलीं होतीं, असें त्यावेळच्या अनेक लोकांच्या प्रकट झालेल्या अभिप्रायावरून दिसून येईल. रंगभूमीच्या सजावटीकडे देखील त्यांनी दुर्लक्ष केलें नाही. या बाबतींत मुंबईच्या पारशी कंपन्या फार पुढे असतात हें जाणून त्यांनी, पडदे सीनसीनरी व इतर सजावट जरूर व योग्य तेथे त्या कंपन्यांच्या धर्तीवर करून, आपल्या नाट्यप्रयोगांचा दिखाऊपणा व परिणामकारकता वाढविली.

## अलौकिक लोकप्रियता

अशा रीतीने सर्व गुणाचा समवाय घडवून आणून, समाजास आवडणाऱ्या अनेक कलाची अंगे एकत्र करून त्यानी समाजासाठी ही एक करमणूक निर्माण केली आणि 'नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येक समाराधनम्' हे अभियुक्त वचन पूर्णतया सार्थ करून दाखविलें. अण्णाच्या पूर्वी नाटके होतीं व तीं आपआपल्या मानाने लोकप्रियही होती, परंतु अण्णाच्या नाटकानी ते पूर्वीचें लोकप्रियतेचे मापच बदलून टाकले. कितीही भारी दराचीं तिकिटे लावलीं तरी नाटकगृह चिकार भरून जाऊन बाहेर रस्त्यावर दूरपर्यंत माणसाचा थवा उभा राहिलेला असायचाच ही गोष्ट अण्णाच्या नाटकाच्या बाबतींत अगदी सामान्य होऊन बसली होती. समाजातील उच्चतम विद्वान व्यक्तींपासून तों म्हाताऱ्या स्वयपाकीणबाईपर्यंत आणि न्हाव्या धोब्यापर्यंत सर्व जणाना त्याच्या सौभद्राने जणू वेडे करून सोडले. इतकी अलौकिक लोकप्रियता त्याच वेळेस क्षितिजावर उदय पावत असलेले बळवंतराव टिळक यानी राजकीय चळवळीच्या क्षेत्रात पुढे मिळवून दाखविली.

## करमणुकीचा दर्जा वाढविला

किंबहुना टिळकांमध्ये आणि किर्लोस्करामध्ये आणखीही पुढे जाऊन थोडेसे साम्य शोधता येईल. अण्णाप्रमाणे टिळकाच्या बाबतींतही अशी समजूत आढळते की राजकीय चळवळ महाराष्ट्रात त्यानीच प्रथम सुरू केली. परंतु अण्णानी प्रथम नाटके सुरू केली हा समज जसा खरा

नाही तसाच टिळकांनी राजकीय चळवळ सुरू केली हा समज खरा नाही. विद्वत्ता, निर्भयता, धडाडी, स्वार्थनिरपेक्षता, लोकानुरंजकता इत्यादि गुणाचा समवाय घडवून आणून त्यांच्या जोरावर टिळकानी राजकीय चळवळ अत्यत लोकप्रिय व प्रभावशाली केली. त्याचप्रमाणे अण्णांनी अनेक नाट्यानुकूल गुणाचा समवाय निर्माण करून त्याच्या योगाने बायाबापड्यापर्यंत सर्वांना वेडे करून सोडले. त्याच्या नाटकामुळे खरोखरीच नायकिणींचा भाव उतरला, अशुद्ध समजल्या गेलेल्या अशा करमणुकीच्या प्रकारापासून त्यानी लोकांना परावृत्त केलें, हें वर्णन काल्पनिक नाही; तत्कालीन उल्लेखावरून त्याची यथार्थता सहज सिद्ध करिता येईल. अण्णाच्या विषयी तात्या पुणेकर आपल्या पोवाड्यात म्हणतोः—

नवीन चाल केली संगीताची ।
झाली राळ इतर नाटकाची ॥
गेली किंमत नायकिणींची ।
गाती मुस्वर पदे अण्णाचीं ! ॥

विष्णुशास्त्री चिपळूणकरानीही आपल्या केसरींतील लेखात अण्णाच्या संगीत नाटकाची प्रशंसा करिताना त्याजविषयी अशाच आशयाचे उद्गार काढले आहेत. दुर्दैवाने अण्णा पुढे फार दिवस जगले नाहीत. नाही तर टिळकांप्रमाणे त्याच्या कर्तृत्वाचा वृक्षही पुढे फोफावला असता. नाटक हे त्याच्या रोमरोमात भिनले होते. म्हणून त्या बाबतींत त्यांना इतके अलौकिक यश मिळाले.

किर्लोस्कराच्या उदयापूर्वी नाटकाच्या बाबतींत जशी स्थिति होती तशीच काही अंशांनी आज आहे. आज नाट्यकला जीर्ण अवस्थेत आहे. सिनेमासारखा प्रतिस्पर्धी नाटकाला भेटल्यामुळे नाटक बुडालें असे म्हणण्यात येतें. परंतु नाटक खरोखरी सिनेमामुळे बुडाले की नाट्यव्यवसायी लोकाच्या अंगभूत दोषामुळे बुडालें हा प्रश्नच आहे. अंगभूत दोषामुळे कमकुवत झालेल्या नाट्यव्यवसायाला सिनेमा

मारूं शकला, असें म्हणणें अधिक योग्य होईल. सिनेमामुळेच नाटक बुडाले असें म्हणावे तर पाश्चात्त्य देशांत तसें झालेलें दिसत नाही. त्यांनी बदलत्या काळास अनुसरून नाट्यकलेमध्ये व नाट्यतंत्रामध्ये बदल करून नाट्यकला जिवंत ठेवली आहे, किंबहुना तिची लोकप्रियता व समाजजीवनातील तिचें स्थान बऱ्याच अंशानी कायम राखिले आहे. आपल्याकडेही योग्य दिशेने प्रयत्न करणारा अण्णासारखा प्रतिभाशाली पुरुष निर्माण झाल्यास नाट्यकलेस पूर्वीचे स्थान का मिळूं नये, हे समजत नाही. यापुढे होणारे प्रयत्न चित्रपटाचे अस्तित्व व त्याची लोकप्रियता जमेस धरूनच केले पाहिजेत, तरच ते यशस्वी होतील. सध्या आपल्यापुढे जो प्रश्न आहे तो अशा स्वरूपाचा आहे, आणि तो सोडविण्याकडे सर्वांचे लक्ष लागलें पाहिजे. अण्णासारख्या युगप्रवर्तक नाटकाराच्या स्मृतिदिनावरून आपल्यास जर काही धडा घेण्याजोगा असेल तर तो हाच आहे.

# ३

# अनंत वामन वरवे

[ 'रंगचर्चा' डिसेंबर १९३८ ]



श्रुतेन यत्नेन च वागुपासिता ध्रुवं करोत्येव कमप्यनुग्रहम् ॥
—दण्डी, काव्यादर्श.

कृतोपकाराचें स्मरण न ठेवणे हें भर्तृहरीने जरी सप्त शल्यामध्ये गणलें नसले तरी ते त्यांमध्ये गणण्याजोगे आहे यात शंका नाही. जेव्हा केवळ व्यक्तीच्या हातून हा प्रमाद घडत असेल, तेव्हा फार तर त्यापासून उपकारकर्त्या व्यक्तीला विषाद वाटेल, ती कृतघ्नता शल्याप्रमाणे आजू-बाजूच्या लोकाच्या मनामध्ये खुपेल, एवढेंच. परंतु जेव्हा समाज आपल्या उपकारकर्त्याना, निष्ठावंत सेवकाना विसरतो, तेव्हा त्याची ही विस्मृति नुसती शल्यवत् होऊन न राहता प्रत्यक्ष नुकसानीसही कारणीभूत होते. उपकारकर्त्याने केलेले कार्य विसरणें म्हणजे तेवढया बाबतींत समाजाची झालेली प्रगति पुसून टाकून त्याची पीछेहाट घडवून आणणे होय. एखाद्या कार्यकर्त्याने जन्मभर नानातऱ्हेचे कष्ट व हालअपेष्टा सोसून कोणतेही कार्य नावारूपास आणावे, समाजाची त्या बाबतींत प्रगति होईल अशी योजना करावी, आणि त्याच्या मृत्यूनंतर त्या कार्याची परपरा पुढे चालविण्यास कोणी न मिळाल्यामुळे सर्व काही थंडगार व्हावे, त्याने निर्मिलेल्या योजनाची, सस्थाची वाताहत व्हावी, इतकेंच नव्हे तर त्याचे नावही विस्मृतीच्या गर्तेत लुप्त व्हावे, यापरती हानिकारक गोष्ट दुसरी कोणतीही नसेल. यामुळे त्या कार्यकर्त्याने घडवून आणलेल्या प्रगतीस तर समाज मुकतोच, परंतु त्याशिवाय दुसरा मोठा तोटा हा होतो की समाजामध्ये अशा निरपेक्ष कार्यकर्त्याची निपज होण्याचेही बंद होते. अत्यंत उपयुक्त कार्य निरपेक्ष रीतीने करणाऱ्या कार्यकर्त्याच्या कपाळीं जिवंतपणीं हालअपेष्टा व उपहास आणि मेल्यानतर उपेक्षा व विस्मृति, हेच जर ठेवलेलें असेल, तर असल्या फंदात पडण्याची किती जणास प्रवृत्ति होत राहील? लोकात ज्याच्यामुळे आपल्या नावाचा गाजावजा होईल अशा कार्यक्षेत्रात, आपल्या स्वार्थाला बिलकूल धक्का पोचणार नाही अशा बेताने, थोडेंफार मिरवावे, साधल्यास त्यातही कोठे आपला लाग साधण्याजोगा असल्यास साधावा, अशी प्रवृत्ति यामुळे समाजांत बळावत जाते. ज्याची समाजास खरोखरी

जरूरी अशा कष्टाच्या कामामध्ये रमणाऱ्या व्यक्ति दुर्मिळ होत जातात. समाजाच्या उपेक्षाबुद्धीचें व विस्मरणशालितेचें फळ अशा रीतीने त्यास पुरेपूर चाखावयास मिळते. कार्यकर्त्यांचा गौरव राहो, परंतु कार्याचें काही तरी चीज होईल व समाजाच्या जीवनावर त्याचा काही चिरस्थायी ठसा उमटेल अशी आशा बाळगण्याजोगी जर समाजाची वृत्ति असेल, तरच आपआपल्या आवडीच्या कार्यक्षेत्रात धिमेपणाने कष्ट करण्यास लोकहितबुद्धीने प्रेरित झालेल्या व्यक्ति पुढे येतील. नाही तर अधार हा ठेवलेलाच आहे.

कै. अनत वामन बरवे याचे उदाहरण पाहून वरील विचार मनात आल्याखेरीज राहत नाहीत. विभूतिपूजेचे एक मोठे चमत्कारिक व्यसन आमच्या समाजास लागले आहे. ज्या त्या बाबतींत टिळकाचे नाव घेऊन त्याचे विष्णुसहस्रनामासही लाजवील इतके स्तुतिस्तोत्र गाण्यात आमच्या जिभेला कधीच कटाळा येत नाही. परतु त्यागबुद्धीत व कार्यतत्परतेत त्याच्याहून काकणभरही कमी नसलेल्या भिकाजीपत हर्डीकराचे नाव आज किती जणास माहीत असेल? पागारकरासारख्या काही व्यक्ति सोडल्या तर जिनसीवाल्याचे स्मरण आज किती जण राखीत असताल? कुटयाची स्मृति त्याच्या नातवानेच उकरून काढली तेव्हा कोठे पुण्यातले लोक थोडे बहुत जागे झाले, नाहीतर ते व त्याचे कार्य समाजास पारखे झाल्यासारखेच होते. 'महाराष्ट्रीय' म्हणविणाऱ्या ज्ञानकोशात या महाराष्ट्राच्या हितकर्त्या पुरुषाची नावे तुम्हास सापडतील काय? नाव कशाला! आम्ही स्वतः आठवणीचे इतके खंदक आणि कृतज्ञतेचे एवढे मोठे पुतळे असताना इतर प्रातातील लोक महाराष्ट्रातील कार्यकर्त्याची बूज राखीत नाहीत म्हणून आमची तक्रार आहेच.

यातील तात्पर्य असे आहे की व्यक्तीकडे तिच्या कार्याच्या उपयुक्ततेच्या दृष्टीने आम्ही पाहत नाही. भाविकपणाच्या, अधश्रद्धेच्या दृष्टीने पाहतों. त्यामुळे असाधारण प्रतिभाशाली पुरुषास देवकोटीतील मानून आम्ही त्याच्या भजनीं लागतों आणि मर्यादित बुद्धीच्या व शक्तीच्या कार्यकर्त्याची उपेक्षा करितों. श्रेष्ठ व्यक्तींना अवतारी पुरुष

मानल्याने त्यांच्या गुणांचें अनुकरण आमच्या हातून होत नाही आणि दुय्यम दर्जाच्या कार्यकर्त्यांना विस्मृतिगर्तेत लोटून दिल्यामुळे त्यांच्या गुणाचे चीज करण्याचा प्रश्नच आमच्यासमोर उपस्थित होत नाही. कार्यकर्त्यांनी घडवून आणलेल्या सामाजिक प्रगतीचा आढावा घेण्यास लागणारी त्रयस्थ व शास्त्रशुद्ध ऐतिहासिक दृष्टि आमच्यात वसत नाही. तेव्हा सामाजिक प्रगतीस व जीवनविकासास सहायभूत होणाऱ्या व्यक्तींचें स्मरण आम्हास राहावे कसे ?

कालरूपी मागावर समाजजीवनाचे जे हे महावस्त्र विणलें जात आहे त्याचे धागे म्हणजे सामान्य व्यक्तींनी संपादिलेली कार्ये हेच होत. प्रतिभाशाली व्यक्तींची उज्ज्वल कामगिरी ही मधून मधून घातलेल्या जरीच्या काड्याप्रमाणे, अगर काठातील वेलबुट्टीप्रमाणे शोभादायक व मूल्यवर्धक होत असेल; परंतु सामान्य योग्यतेच्या कार्यकर्त्यांनी आपल्या जीवनाचा कापूस पिंजून निर्मिलेले धागे हेच या वस्त्राचे मूलाधार होत यात शंका नाही. समाजजीवनरूपी महावस्त्राची निर्मिति याच्यामुळेच होते; त्याच्यामुळेच त्यास बळकटी व ठाशीवपणा प्राप्त होतो. समाजजीवनाचा आढावा घेताना अशा कार्यकर्त्यांची उपेक्षा करणे अगर त्यास कमी लेखणे हे वस्त्राला साध्या सुताची जरूरीच नाही असे म्हणण्याइतके अप्रयोजकपणाचें होय. आमच्या समाजाच्या जीवनरूपी वस्त्रामध्ये कै. बरवे यानी अगदी बळकट व चिवट असा धागा पुरविलेला आहे. 'कथमपि भुवनेऽस्मिंस्तादृशाः सभवन्ति' अशा कोटीत गणण्याजोग्या महापुरुषाची प्रतिभा त्याच्या अंगीं नसेल (अशी खरोखर किती जणाच्या ठिकाणी असते ?); परंतु जे जे नैतिक गुण व ज्या ज्या श्रेष्ठ मनोवृत्ति मनुष्याला स्वतःच्या इच्छाशक्तीच्या जोरावर सपादन करता येण्याजोग्या असतात त्या सर्व एखाद्या महापुरुषाइतक्याच त्याच्या अंगींही बाणल्या होत्या, असे त्याच्या चरित्रावरून दिसून येते. असे म्हणता येणे ही गोष्ट काही सामान्य नाही. प्रतिभा ही दैवाधीन असते; तर चारित्र्यसंपदा ही स्वप्रयत्नाधीन असते.

चरित्रनायकाचे गुण फुगवून वर्णन करावयाची चरित्रलेखकाना खोडच असते. तदनुसार कै. बरवे याजविषयीं काही तरी अतिशयोक्तिपूर्ण विधाने मी करीत आहे, असे वाचकास वाटेल. विशेषतः बरवे हे

ाजन्म नाटकें लिहिणारे, नाटकी लोकांच्या संगतींत नेहमी वावरणारे हस्थ; त्यांच्या चारित्र्यसंपदेचें गौरव करणें हे, मामुली प्रतारणेचे एक दाहरण आहे असे कोणासही वाटणे स्वाभाविक आहे. नित्य दारू, ायका किंवा इतर हीन व्यसने याच्या खातेऱ्यात लोळणाऱ्या नटाचीं व ाटककाराचीं चरित्रे जीं मराठींत झालीं आहेत, त्यात चरित्रनायकाचे ारित्र्य कसे परीटघडीसारखें स्वच्छ दाखविलेले असतें! चरित्रलेखनाची ामुली पद्धतच आपल्याकडे अशी होऊन बसली आहे. परतु प्रस्तुत खकाला अशी प्रतारणा करून चरित्रलेख सजवावयाचा नाही. उच्च-म मनोवृत्तींचे निधान बरवे याच्या चरित्रात त्यास आढळले म्हणूनच ाने त्याचे कार्य वर्णावयास लेखणी हातीं घेतली आहे.

बरव्याच्या चरित्रसपदेचे कारणही उघड आहे. ते मुळापासून नट ागर नाटककार नव्हते; तर देशभक्त होते, लोकसेवक होते. वाङ्मयद्वारा ोकसेवा करण्याची त्याना स्फूर्ति मिळालेली होती; आणि ती कोणापासून —तर आधुनिक महाराष्ट्रातील तो अपरिशोष्य स्फूर्तीचा झरा विष्णुशास्त्री वपळूणकर, याजपासून. विष्णुशास्त्र्यापासून देशसेवेची स्फूर्ति घेतलेल्या ा पिढींतल्या इतर अनेक कार्यकर्त्याप्रमाणे बरवे यानीही पुढे आपले ार्यक्षेत्र आखून घेऊन त्या क्षेत्राच्या द्वारा आमरण जनसेवा केली.

हा सर्व प्रकार मोठा उद्‌बोधक आहे. कुणीकडे बरवे आणि कुणी-ाडे विष्णुशास्त्री! परंतु अशा अनाकलनीय सबधास चद्र–चंद्रकान्त वगैरे ोडप्याच्या उपमा आमचे जुने कवि देत असतातच ना! बरव्याचा जन्म ावण वद्य ३ शके १७७८, ता. २८ आगष्ट १८५६ या दिवशी झाला. टळकाच्या जन्माचे साल हेच. टिळकापेक्षा बरवे हे सुमारे एका महिन्याने हान ठरतात. टिळक–आगरकर या त्यागी देशसेवकाचा जन्म ज्या सालीं ाला त्याच सालीं बरव्याचा जन्म व्हावा हा केवळ योगायोग. तथापि ज्या रल कल्पनानी व उज्ज्वल आकाक्षानी टिळक–आगरकराना व त्याच्या किंचित् पुढे हरिभाऊ आपटे, राजवाडे प्रभृतींना स्फूर्ति दिली त्याच ल्पनानी व आकाक्षानी भारलेल्या वातावरणात बरवे याचाही तारुण्यकाल ोला. त्या वातावरणाचा परिणाम अर्थात् याच्याही मनावर झाला असला ाहिजे, हे त्यांच्या चरित्रातील घटनाकडे पाहता उघड दिसते.

बरवे याचे घराणें पूर्वीचे खानदानीचे असले तरी अनंतरावाच्या जन्माच्या सुमारास त्याच्या वडिलाना नोकरी पतकरणे जरूर वाटण्याइतपत त्याच्या घराण्याला उतरती कळा आलेली असावी असे दिसते. वामनरावाना (वडिलाना) अनताच्या जन्माच्या सुमारासच रेलवेत नोकरी लागली आणि छोटया अनंताचे बालपण मनमाड येथे गेले. त्या सुमाराची एक मजेदार आठवण खुद्द अनतरावानी पुढीलप्रमाणे लिहून ठेवली आहे.

"आम्ही होतो मनमाड येथे. पूर्वी म्हणजे मनमाड हे ५-२५ घराचे खेडे. तरी तेथे १, २ सावकार भले गबर असत. आम्ही ज्याच्या वाडयात राहत असू त्याचे आडनाव वैद्य असे. त्या वेळी मी ६-७ वर्षाचा असेन. एकदा एका रात्री ३०० भिल्लाच्या दरवडयाची हूल उठली. आसपास ते आल्याचेही समजले. आमच्या वडलानी घरात जे काही दागदागिने होते ते घेऊन स्टेशनवर मुक्काम केला. इकडे घरात पुरुष मडळी धाब्यावर बसून बदुकीचे बार मधून मधून काढीत होती व बायकामडळी पोरेबाळे पोटाशी धरून मोठया चितेत असून एकेक दरवडयाच्या गोष्टी सागत बसली होती. पुढे दुसरे दिवशी सोल्जराची एक पलटण शेजारी येऊन उतरली तेव्हा सर्वाचा जीव खाली झाला. त्या भागात नेहमी दरवडे पडत असत."

इ. स. १८६२ च्या सुमारच्या लोकस्थितीचे हे चित्र आहे. सत्तावनच्या बडाच्या धामधुर्माची पुसट छाया, त्या भागात भासमान होत होती; हत्याराचा कायदा जरी झाला असला, तरी लोकाजवळ स्वसरक्षणापुरत्या बदुका वगैरे होत्या आणि सर्व मुलखात अद्याप पूर्ण शातता नादूं लागली नसल्याने सोल्जराच्या पलटणी दगेखोराना धाक बसवण्याकरिता मुलखातून फिरत असत, या गोष्टी या आठवणीवरून आपणास दिसून येतात.

पुढे वामनराव हे वऱ्हाडात स्टेशनमास्तर म्हणून बदलून गेले. तेथून अनताची रवानगी पुण्यास करण्यात आली. पुण्यास आजा आजी ही दोघे होती. त्यानीच अनताची मुज मोठया थाटाने केली. वडिलास वेळेवर रजा न मिळाल्याकारणाने ते मागाहून आले. याच सुमारास अनताची आजी वारली व आजोबानी पुण्यास नवीन घर खरेदी केले. अर्थात् घराण्याची स्थिति या वेळेस थोडी सुधारली होती, असे दिसते.

पुढे अनंतराव वडिलांबरोबर नादगावास गेले. तेथे त्याचें मराठी ५–६ इयत्ताचे शिक्षण पूर्ण व चागले झाले. नंतर अनतरावास पुढील शिक्षणाकरिता मुद्दाम पुण्यास पाठविण्यात आले. आजोबा (वडिलाचे वडील) वारले असल्यामुळे त्याना आजोळी मामाकडे ठेवण्यात आले. मामा भिक्षुक होते व ते अनंताला भिक्षुकी वळण लावण्याचा प्रयत्न करीत. परतु ते अनंतास मुळीच खपत नसे. त्याचा स्वभाव लहानपणापासून स्वातंत्र्यप्रिय होता. आपल्या भिक्षुकी पेशास अनुसरून मामाने भाच्याकरिता जेवणाचे आमंत्रण घेऊन ठेवावे, परतु भाच्याने तेथे जेवावयास जाऊच नये–असे परस्परामध्ये खटका उघडण्याचे प्रसग नेहमी येत.

याच स्वातंत्र्यप्रियतेचे पोषण करून तिला व्यापक वळण लावील असे वातावरण त्या वेळेस पुण्यात होते. साधारणपणे चौदा ते वीस–बावीस वर्षे वयापर्यंतचा काळ अनतरावानी विद्यार्जनार्थ पुण्यास मामाच्या देखरेखीखाली काढला असे म्हणण्यास हरकत नाही. हा काळ म्हणजे साधारणपणे इ. स. १८७० ते १८७८ ही वर्षे होत. या काळात सार्वजनिक काकासारखे कट्टे देशाभिमानी, रावबहादूर रानड्यासारखे कुशल धुरीण व सचालक, कुंट्यासारखे दणकेबाज व कल्पनाप्रचुर वक्ते आणि विष्णुशास्त्री चिपळूणकरासारखे नवोदित प्रतिभासूर्य–अशा धुरधर व्यक्तींचे पुणे हे कार्यक्षेत्र बनलेले होते. लिटनच्या कारकीर्दीतील दडपशाहीस सुरवात अद्याप झालेली नव्हती. मनातील तेजस्वी विचार निरकुश रीतीने वातावरणात सोडण्यात येत होते. अशा काळात बरव्यासारखा सस्कारक्षम स्वतत्र वृत्तीचा तरुण आईबापापासून वेगळा राहून विद्यार्जन करीत होता. त्याच्या मनात कसली बीजे या वातावरणात रुजली असतील याचा तर्क करणे अवघड नाही.

अशा रीतीने पुण्याच्या हायस्कुलात अनताचे मॅट्रिकपर्यंत शिक्षण झाले. नोकरी, त्यातून सरकारी नोकरी करायची नाही, असा तर या तरुणाचा निश्चय होता. परतु परिस्थितीने कौल उलट दिला. याच सुमारास वामनरावाच्या रेलवेच्या नोकरीत काही भानगड उपस्थित होऊन त्यानी आपल्या नोकरीचा राजीनामा दिला. घरची स्थिति ओढघस्तीची झाली. त्या वेळच्या लोकरूढीप्रमाणे अनंतरावाचे लग्न तर

अगोदरच झालें होतें. नोकरी पतकरण्याद्दबल वडिलांचा लकडा मागे सुरू झाला. आलिया भोगासी सादर होऊन अनंतरावांस नोकरी शोधणे भाग पडले. घोडनदी येथे इंग्रजी शाळामास्तरची नोकरी त्यानी सुमारें तीन वर्षें केली आणि त्यानंतर पुणें येथे चिपळूणकर प्रभृतींनी नवीनच सुरू केलेल्या आर्यभूषण छापखान्यांत केसरी पत्राच्या कचेरींत प्रूफरीडरचे काम पतकरलें.

अनंतरावांच्या आयुष्यास कलाटणी मिळण्याचा क्षण हाच होय. ह्या एका घटनेमुळे त्याच्या आयुष्यास निराळी दिशा मिळाली आणि त्याचें आयुष्य हें लेखकाचे, सार्वजनिक कार्यकर्त्याचें, लोकहितार्थ झटणाऱ्याचे आयुष्य बनले. त्या काळामध्ये त्याना इतरत्र कोठे याच्यापेक्षा चागली नोकरी मिळाली नसती असे नाही. असे असता त्याना नोकरीसाठी 'केसरी'कचेरींत खेचले ते त्याच्या देशाभिमानी वृत्तीनेच, यात शंका नाही. तेथे विष्णुशास्त्री, टिळक, आगरकर प्रभृतींच्या सहवासात आल्यावर ती अधिकच प्रबळ झाली असली पाहिजे, असे अनुमान कोणासही करिता येईल.

बरव्यानी काढलेल्या 'राजहंस' मासिकाच्या २५ नवंबर १८८२ ही तारीख धारण करणाऱ्या अकाला जोडलेल्या एका चिटोऱ्यावर 'स्वागतम्' या मथळयाखाली त्यानी आपली एक कविता छापली आहे. कवितेखाली 'अ० वा० ब०' अशी सही असून त्याखाली 'रिव्हायजर, आ. भू. प्रेस' असा लेखकाने आपला हुद्दा दिलेला आहे. यावरून नोवेंबर १८८२ मध्ये अनंतराव आर्यभूषण छापखान्यात पक्कीं मुद्रिते तपासण्याच्या कामावर होते असे दिसते. यानतर दोनतीन महिन्यातच स्वतःचा स्वतत्र छापखाना काढण्याचा त्यानी हिय्या केला, यावरून छापखान्याच्या कामाची चांगली माहिती होईल इतका काळ ते नोवेंबर १८८२च्या अगोदर आर्यभूषणमध्ये नोकर असावेत असे अनुमान होते. आर्यभूषण छापखाना १८८१ च्या सुरवातीस निघाला. तेव्हा छापखान्याच्या सुरवातीपासूनच बरवे तेथे रीडर म्हणून राहिले असावे असे वरील हकीकतीवरून मानता येते. त्याच्या पूर्वी तीन वर्षे (१८७८–८०) घोडनदी येथील मास्तरकीचीं धरल्यास १८७७ च्या अखेरीपर्यंत अंनतरावानी मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण पुरे केले असले पाहिजे.

इ. स. १८८१-८२ पर्यंत अनंतरावांच्या आयुष्याचा एक कालखंड पूर्ण होऊन येथून पुढे निराळा कालखंड सुरू झाला. आतापर्यंत तयारी झाली, यापुढे त्यांच्या जीवनकार्यास हळूहळू सुरवात होऊं लागली. त्याच्या तयारीमध्ये युनिवर्सिटीचें उच्च शिक्षण व त्यामुळे मिळणाऱ्या पदव्या याचा समावेश नव्हता. किंवा जुन्या पद्धतीने एखाद्या शास्त्र्याच्या हाताखाली संस्कृत विद्येचें शिक्षणही त्यांनी घेतलें नव्हते. असे असूनही जी विद्वत्ता व बहुश्रुतता त्यानी संपादिली होती ती खरोखर आश्चर्यकारक होय. संस्कृत वाङ्मयाचें वाचन त्यानी बऱ्याच विस्ताराने केले होते. काव्य, नाटक, पुराणें, रामायण आणि महाभारत याचे सर्वसामान्य आलोडन त्यानी केलें असले पाहिजे असें त्याच्या ग्रंथावरूनच दिसून येतें. त्याची भाषाशैली फार संस्कृतप्रचुर म्हणण्याजोगी नसली तरी पद्यरूपात ती अवतीर्ण होताना अर्थवाहक असे संस्कृत शब्द सहजतेने व विपुलतेने तिच्यात येतात यावरून संस्कृत ग्रंथाचे वाचन त्याचे चागलेंच गाढ व नित्याचें होते, असे दिसते. आणि हे वाचन त्यानी आपल्या तारुण्यावस्थेतच केले असले पाहिजे याची साक्ष त्याच्या 'राजहस' मासिकातील लेखात आढळून येणारी प्रौढता, संस्कृत सुभाषिताचा, वचनाचा, न्यायदृष्टान्तादिकाचा केलेला उपयोग इत्यादि गोष्टींवरून पटते. त्यातही 'ईश्वराज्ञोल्लंघनीय (ईश्वराज्ञेचे उल्लंघन करणारे!) वर्तन' यासारखा अशुद्ध प्रयोग क्वचित एखादा डोकावतो, यावरून व्याकरणाचे अध्ययन शास्त्रोक्त रीतीने त्यानी केलेले नसावे इतकेंच फार तर म्हणता येईल. अशी स्थिति असताही संस्कृत प्रयोगात त्यानी सामान्यतः दाखविलेली प्रभुता कौतुकास्पद होय असेंच कोणासही वाटेल यात शंका नाही.

संस्कृत वाङ्मयाइतकें जुन्या मराठी वाङ्मयाचें त्याचें वाचन गाढ व विस्तीर्ण नसावे. आग्ल वाङ्मयाशीं त्याचा परिचय प्रारभी बेताचाच असावा. प्रारंभीच्या त्याच्या लिखाणात सस्कृताचें वातावरण सर्वत्र भरून राहिलेले दिसते. कथानकें, विचार, कल्पना, दृष्टांत इत्यादि सर्व अभिजात संस्कृत वाङ्मयातून घेतलेले आणि या सर्वांस निबंधमाला प्रभृति गद्य ग्रंथाच्या तऱ्हेवर आधुनिक वळण देऊन त्यात चुरचुरीतपणा

आणलेरा, असें त्यांच्या प्रारंभींच्या लिखाणाचे स्थूल मानाने वर्णन केल्यास ते चुकीचे होणार नाही.

पढीक व पदवीपूत विद्वत्तेपेक्षा त्यांच्या अंगीं बहुश्रुतपणा व व्यासगी वृत्ति ही जास्त होती. आणि त्यापेक्षाही उच्च भावनांची व उदात्त प्रवृत्तींची वाढ त्याच्या ठायीं अधिक प्रमाणात झालेली होती. त्याच्या 'राजहंस' मासिकात पहिल्याच अंकात आपल्या उद्देशाचे स्पष्टीकरण करताना राजहंसाच्या तोंडी त्यानी घातलेले 'जनसमाजात आजपासून परहितार्थ देह झिजवावा असा मी निश्चय केला,' हे उद्गार त्याच्या मनोवृत्तीचे निदर्शक आहेत असें मानण्यास काहीच चिता नाही. त्या तरुण वयात देखील पैशापेक्षा त्याना कीर्ति अधिक वाटे आणि कीर्तीपेक्षाही लोकसेवा प्रियतर वाटे. त्याच्याच कचेरीचे मालक विष्णुशास्त्री, टिळक इत्यादिकाच्या ओजस्वी त्यागवृत्तीचे उदाहरण त्याच्या डोळ्यासमोर होते. त्याचा परिणाम होऊन त्यानी लेखनद्वारा आमरण जनसेवा करण्याचा निश्चय केला.

जे कृती असतात ते आपला सकल्प कृतींत उतरविण्यास विलंब लावीत नाहीत. शके १८०४ च्या दसऱ्यास, म्हणजे ता. २१ आक्टोबर १८८२ रोजी त्यानी आपल्या राजहस मासिकाचा पहिला अक प्रसिद्ध केला. साध्या दोऱ्याने एकत्र शिवलेले, अत्यत जीर्णावस्थेत असलेले या मासिकाचे पहिले तेरा अक येथे प्रस्तुत लेखकाच्या दृष्टीसमोर आहेत. त्यावरून तत्कालीन तरुणाच्या मनात जनसेवेची व स्वभाषेत लेखन करण्याची प्रबळ ऊर्मि कशी उत्पन्न झाली होती, विष्णुशास्त्र्याच्या निबध-मालेचा केवढा दाडगा परिणाम या तरुणाच्या मनोवृत्तीवर व लेखनावर झाला होता, हे स्पष्ट दिसून येते. आणि त्याबरोबरच हेही प्रत्ययास येते की या सर्व लोकानी भाषाशैलींत, लेखाच्या माडणीत व इतर बाह्य योजनामध्ये शास्त्रीबोवाचे अनुकरण करण्याचा प्रयत्न, जाणून वा नेणून जरी चालविला होता, तरी त्याची खरी ऐट, ओजस्विता व भेदकता यापासून ही सर्व मंडळी फार दूर होती. ते सर्व प्रामाणिक अनुचर होते, शास्त्रीबोवांसारख्या नेत्याची प्रतिभा व स्वयंप्रज्ञता त्याच्या ठायीं नव्हती.

'राजहंस' मासिकात ज्ञानदान, मनोरंजन व नीतिबोध याचें ाmभाग मिश्रण केलेले दिसून येते. अंकाच्या प्रारंभीं गभीर, तात्त्विक त्रषयावर निबंध असावयाचा, ही पद्धत निबधमालेपासून उचललेली द्सते. परंतु यापेक्षाही निबन्धमालेच्या प्रत्यक्ष अनुकरणाने सुरू केलेलीं उत्कृष्ट उतारे', 'अर्थसादृश्य' आणि 'भाषापरिज्ञान' हीं सदरे मधून ाधून डोकावतात हे विशेष लक्षात घेण्याजोगे आहे. 'उत्कृष्ट उतारे' सदर सुरू करिताना 'राजहंस' कर्ते म्हणतात, "माजी लोकप्रिय निबंध-ालेत हे एक सदर होते हे सर्वांस महशूर आहेच. त्याचप्रमाणें आमच्याही ानात कवीश्वरमनःपयोनिधिसुता कविताबधूस जनमनःप्रागणी नटीप्रमाणे मवतीर्ण करवून तिचा कर्णमधुर नूपुररव मधून मधून वाचकास ऐकवावा मसे आहे." असाच निबन्धमालेचा उल्लेख 'अर्थसादृश्य' हे सदर ुरू करितानाही त्यानी केला आहे.

पुढे १२ व्या अंकात सालअखेरचा आढावा घेण्याकरिता लेहिलेल्या लेखात, मासिकास सुरवात कोणच्या परिस्थितीत केली हे ागत असताना ते लिहितातः—

"आम्ही या प्रदेशात आपल्या कामगिरीवर ज्या वेळेस हजर झालों ती वेळ मोठ्या गडबडीची होती. आम्ही आपले जाहीरपत्रक प्रसिद्ध केले त्या वेळेस तसा प्रकार जर आम्हास कळता तर त्या रामरगाड्यात आम्ही कधीही हे कृत्य आरभिले नसते. आमची जाहिरात प्रसिद्ध झाल्यापासून आठ पधरा दिवसाच्या अवसरातच एकदम जिकडे तिकडे मासिक पुस्तकाच्या जाहिरातीची गर्दी उसळली. त्यातून प्रख्यात 'मालाकार' नुकतेच कैलासवासी झाले होते, त्यामुळे लोकाना असे वाटले की, ज्याप्रमाणे दिनमणि अस्तगत झाल्यावर असंख्यात काजवे चमकूं लागतात, त्याप्रमाणे ही भाराभर पुस्तके निबंधमालेच्या मागे भराभर बाहेर पडूं लागलीं आहेत. आता इतर पुस्तकाविषयी काहीही असो; पण आम्ही मात्र खऱ्या मनोभावाने सागतों की, क्षीरधितीर सोडून ह्या लोकात जे आम्ही वावरू लागलो त्याचा सबंध 'मालाकारा'च्या स्वर्गारोहणाशीं बिलकूल नाही. मात्र त्यांनी जो कित्ता घालून ठेवला आहे त्यातील आपल्या हातात

बसतीलशीं वळणें मात्र उचलण्याचा आमचा इरादा होता व अजून आहे."

निबन्धमालेचा कित्ता वळविण्याचा आपला उद्देश येथे त्यांनी अगदी स्पष्ट शब्दात प्रगट केला आहे.

'राजहंस' हे मासिक सुमारें दोन वर्षांपेक्षा अधिक काळ चालले असावे असे वाटत नाही. दुसऱ्याच अंकाच्या मुखपृष्ठावर मासिकाच्या चालकाचे नाव 'अनंत वामन बरवे आणि मित्रमंडळ' असें छापले आहे. पहिले तीन अंक दुसऱ्या छापखान्यात छापले. पुढे या तरुण मंडळींच्या मनात स्वतःचा छापखाना घालण्याचें येऊन त्यानी 'राजहंस छापखाना' सुरू केला व मासिकाचा चौथा अंक याच छापखान्यात छापून काढला. पुरेशी सामग्री नाही, नीटसा अनुभव नाही व पैशाचे पाठबळ नाही, अशा अवस्थेत हें छापखान्याचें साहस या तरुण मंडळींनी केलेले दिसते. पहिलाच अंक जो छापखान्यातून निघाला, त्यात ओळी तुटलेल्या, ठसे वेडेवाकडे झालेले व शाई न लागल्या-कारणाने मजकूर न उमटलेला--असे दृश्य दृष्टीस पडतें. पुढे थोडीशी सुधारणा झाली. परतु तेराव्या अंकापर्यंत तरी म्हणण्यासारखी बरी अशी छपाई करण्याचे सामर्थ्य छापखान्यास आलेले दिसत नाही. मासिकाचे अंकही मागे रेंगाळत चालले, यावरून छापखाना व मासिक हीं दोन्ही या मित्रमंडळीस झेपत नव्हतीं असे अनुमान होते. छापखान्याप्रमाणेच या बरवे आणि मंडळीने एक पुस्तकाचे दुकानही चालविले होतें आणि थोडाबहुत अडत्याचा धंदा करण्याचाही उपक्रम केला होता, असे मासिकातील जाहिरातीवरून दिसते. त्याचप्रमाणे या सुमारास अनंतराव हे वूडकट ब्लॉक करण्याची कलाही शिकत होते, असे दिसते. वूडकट वरून छापलेली काही चित्रे 'राजहंसा'च्या अंकात दिसून येतात.

अनेक शाखानी विस्तार पावणाऱ्या या अनंतरावाच्या उद्योगात नाटयाला अद्याप विशेष असे स्थान प्राप्त झालें नव्हते. 'राजहंसा'तील नमुन्यावरून पाहिले तर वाङ्मयाच्या सर्वच शाखा त्यानी हाताळलेल्या दिसतात. त्यात 'बंधुप्रेमदर्शक भरतभेट नाटक' नांवाचे नाटकही क्रमशः चालू असलेले दिसतें. हें नाटक जुन्या पौराणिक धर्तीवर लिहिलेले असून

अण्णाच्या सुप्रसिद्ध रामराज्यवियोगाप्रमाणे अपुरेंच राहिलेलें दिसतें. यांतील कथाभाग रामराज्यवियोगाच्या पुढचा आहे. म्हणजे रामाला वनवासाला धाडल्यानंतर भरत मातुलगृहाहून परत येतो, येथपासून नाटकास सुरवात झाली आहे. यात अर्थात् अण्णाच्या नाटकातील चमक दृष्टीस पडत नाही. मूळ रामायणकथाच प्रवेशाच्या रूपाने वर्णिलेली दिसते. जिवंत वैशिष्ट्यपूर्ण व्यक्ति निर्माण करण्याचे कौशल्य दृग्गोचर होत नाही.

थोड्याच कालानंतर, म्हणजे जून १८८४ मध्ये, 'पंडितंमन्यजनसमूह अथवा पत्रकाराची सभा' या नावाचे एक छोटेंसें प्रहसन अनतरावानी स्वतंत्रपणें प्रकाशित केले. त्याच्या प्रतीवर त्यानी स्वहस्ताने मोडींत 'अगदी पहिले नाटक. शुकरंभा १८९१ साली लिहिले' असा मजकूर लिहिला आहे. वस्तुतः या प्रहसनाला नाट्याचे स्वरूप नाही. जवळ जवळ गोष्टीच्या स्वरूपात ते लिहिले आहे. अर्ध्या हळकुंडाने पिवळे होऊन वाटेल तें लिहिणारे व एकमेकाचे वाभाडे काढणारे असे जे वर्तमानपत्रकार त्या वेळेस बोकाळले होते त्यांची यात हजेरी घेतली आहे. शेवटीं एका पात्राच्या मुखाने वर्तमानपत्रकारास पुढील बोध केला आहे.

> "पत्रावर कोणी आपले उपजीवन होत असल्यास खुशाल करावें; पण केवळ उपजीवनासाठीच पत्र चालवू नये...आश्रय मिळण्यासाठी किंवा अन्य कशाही रीतीने पोट जाळण्यासाठी कोणालाही निंदू वंदू नये...इतरत्र आपले विचार व वर्तन कसेही असो, पण निबंध लिहावयास बसताना राग, द्वेष, वैर, कुत्सितपणा, दुराग्रह, आपमतलब इत्यादि कोणत्याही विकारानी मनास आवृत करूं नये." इ० इ०

अशा रीतीने 'राजहंस' मासिकाच्या द्वारा बरव्याच्या लेखनसंसारास सुरवात झाली. 'राजहंसा'मधल्या लिखाणावरून किंबहुना ज्याला त्यानी प्रहसन म्हटले आहे त्या 'पंडितंमन्यजनसमूह' या चुटक्यावरूनही अद्याप त्याची नाटकाकडे विशेष प्रवृत्ति झाली होती असे दिसत नाही. 'भरतभेट' हे एक नाटक 'राजहंसा'त क्रमशः येत होते खरें. परंतु तें यथातथाच. मासिकात आलेले त्याचे दोन अंक पाहता परशुरामपंत तात्या गोडबोल्यानी केलेल्या संस्कृत नाटकाच्या रूपातरांच्या धर्तीवर ते बऱ्याच अंशीं

गेलेलें दिसतें. नाटकांकडे त्याची प्रवृत्ति कशी वळली हें त्याच्या चिरंजीवांनी लिहिलेल्या त्याच्या चरित्रात पुढीलप्रमाणे वर्णिले आहे:—

"पहिल्यादा नाटकाविषयीं त्याच्या मनात विशेष आदरबुद्धि वसत नव्हती. एकदा सहज त्याच्या वाचनात कै. विष्णुशास्त्र्याचा नाटकाच्या विषयावरील निबंध आला. तो वाचून त्याना उपरति झाली. व या धंद्यात काही तरी आहे पण ते आच्छादन पडल्यामुळे झाकले आहे असे वाटून ते नाट्यशास्त्र लगेच आणवून त्याचा यथाशास्त्र अभ्यास करूं लागले. त्याचे मन इकडे जास्त जास्तच वळू लागले. केसरीच्या लायब्ररींत त्याना वाचावयाची मोकळीक होतीच. पुढेही लोकमान्याच्या कृपेने त्याना ती कायमच मिळाल्यासारखी होती. तेव्हा त्यानी ती पार वाचून काढली. नाट्यवाङ्मय जेथे जेथे जसजसे मिळे ततसे ते त्यानी वाचून टाकले."

विष्णुशास्त्र्याचा 'नाटकें करावीं कीं करूं नयेत' हा लेख 'केसरी'-च्या १८८१ सालच्या २९ नोव्हेंबर व ६, १३, २०, २७ डिसेंबर या तारखांच्या ५ अंकामध्ये प्रसिद्ध झाला. आणि प्रथम भरतनाट्यशास्त्र 'काव्यमाले'मध्ये १८९४ सालीं प्रसिद्ध झाले. तेव्हा कालदृष्ट्या वरील हकीकतीची संगति नीटशी जुळत नाही. कदाचित् वरील हकीकतीतील नाट्यशास्त्र म्हणजे भरताचेंच नसून दशरूपकादि त्या शास्त्रावरील इतर ग्रंथ असतील. कसेंही असले तरी विष्णुशास्त्र्याच्या नाटकावरील लेखाच्या योगाने बरव्याचें मन नाटकाकडे वळले, एवढी हकीकत खरी असावयास हरकत नाही आणि ती खरी असेल तर बरव्याच्या स्फूर्तीच्या उगमासंबधाने या लेखात पूर्वी जे विधान केले आहे, त्यास या हकीकतीच्या योगाने बळकटीच येते हे कोणाच्याही लक्षात येईल.

तथापि चिपळूणकराच्या लेखामुळे अनंतरावाच्या मनात एकदम क्रांति होऊन, नाटक पापाचें माहेरघर, या त्याच्या समजुतीच्या जागीं नाटक हे सर्व गुणाचे व कलाचे अधिष्ठान अशी दृढ समजूत येऊन बसली, असे मानण्याचे कारण नाही. वाङ्मयाच्या सर्वच प्रकाराकडे ओढ घेत असलेले त्याचे मन चिपळूणकराच्या लेखामुळे नाट्याच्याकडे अधिक प्रमाणात वळले, इतके म्हणता येईल. नाटकें लिहिण्याकडे

त्याची प्रवृत्ति होण्यास द्रव्याच्या बाबतींतली त्याची ओढघस्तीची स्थिति हेच प्रत्यक्ष कारण बहुधा झाले असावे. आणि अशा रीतीने नाट्य-कलेकडे वळलेले त्याचे मन तिने आपल्या लीलालालित्याने पुरतेच आकृष्ट करून घेतलें असावे. असे होण्यास त्याचा नाट्यकलेचा व नाट्यशास्त्राचा अभ्यास हाही उपोद्बलक झाला असावा. १८८३–८४ सालातील बरव्याचा वाङ्मयव्यवसाय 'राजहस' मासिकाच्या रूपाने प्रकट झालेला आपण पाहिला. त्यानंतरच्या सुमारे ७ वर्षात त्यानी केलेल्या वाङ्मयसेवेचा नीटसा पत्ता लागत नाही. वर उल्लेखिलेल्या लिखाणाखेरीज बाकीचा जो त्याचा लेखनसभार आहे तो सर्व १८९१ च्या पुढचा आहे. या मधील ६।७ वर्षात कुटुबपोषणाचा भार त्याजवरच होता. प्रत्यक्ष नाट्यरचनेखेरीज इतर उपायानी पैसे मिळविण्यात त्याच्या सर्व शक्तीचा व्यय होत असावा असे दिसते. पुढे त्याचे कनिष्ठ बंधु गंगाधरपत हे मोठे होऊन त्यानी निर्माण केलेले उद्योग थोडेबहुत सभाळू लागले, तशी त्याना थोडीबहुत फुरसत मिळू लागली असावी आणि त्या फुरसतीमुळेच त्याचा नाटके लिहिण्याचा व्यवसाय जोरात सुरू करणे त्यास शक्य झाले असावे.

इ. स. १८९१ पासून १८९६ पर्यंतच्या पाचसहा वर्षात बरव्यानी निदान पाच तरी नाटके लिहिली असल्याचा पुरावा मिळतो. सं. शुक्रंभा हे १८९१ साली लिहिल्याचा त्यानी स्वतःच एके ठिकाणी उल्लेख केला आहे त्यानंतर १८९२–९३ च्या सुमारास सगीत गोपीचद हे नाटक लिहिले असावे. स० महाराणा प्रतापसिह हे १८९५ मध्ये लिहिले असल्याचा स्पष्ट उल्लेखच आहे. त्यानतर सं० ध्रुवचरित्र हे लिहिले असून त्यानतर सं० मातृशिक्षाप्रभाव हे लिहिले. या शेवटच्या नाटकाच्या प्रस्तावनेवर ४ नोव्हेंबर १८९६ ही तारीख आहे; व त्याच्या मुखपृष्ठावर 'ध्रुवचरित्र' व 'प्रतापसिह' या नाटकाचा उल्लेख आहे.

नाटकाचे विस्तृत परीक्षण प्रस्तुत लेखाच्या कक्षेच्या बाहेर आहे. महत्त्वाच्या विशेषाचा फक्त येथे उल्लेख करणे शक्य आहे. नाटककार या नात्याने बरव्याच्या योग्यतेविषयी अतिशयोक्त विधाने करण्यात मतलब नाही. किर्लोस्कर, खाडिलकर, कोल्हटकर, गडकरी याचे स्थान

वेगळें आणि बरव्यांसारख्यांचें वेगळें. हे महारथी झाले नसते तर महाराष्ट्राचा नाटयसंसार जसा झाला तसा झालाच नसता. बरव्याच्या विषयीं तसें म्हणतां येण्याजोगें नाही. तथापि त्याचीं नाटकें दुसऱ्या श्रेणींत वरच्या दर्जाचीं खास ठरतील. बरव्याची नाटयरचना मुख्यत्वे पौराणिक व अल्पाशाने ऐतिहासिक आहे. कथानक पौराणिक वा ऐतिहासिक कसेहि असो, खाडिलकरासारखा प्रतिभाशाली नाटककार त्या कथानकाला सहज झेपेल व शोभेल असे एखादें प्रमेय स्वकल्पनेने निर्माण करतो. त्या प्रमेयाचा ध्वन्यात्मक रीतीने सुंदर आविष्कार कथानकामधून होईल अशी कथानकाची गुफण तो करितो. त्या प्रमेयाची सिद्धि परिणामकारक रीतीने होण्यासाठी त्यात संघर्षांचीं बीजे प्रारंभापासून निर्माण करून, तो संघर्ष, प्रपाताकडे वेगाने वाहत जाणाऱ्या सरिदोघाप्रमाणे, निकराच्या बिंदूपर्यंत वाढत जाईल अशी तो योजना करितो. नाटककाराचे हे प्रमेय सामाजिक, कौटुंबिक अथवा वैयक्तिक असूं शकते आणि त्याने चित्रित केलेला संघर्ष बाह्य वा आतर, शारीरिक अथवा मानसिक, अथवा अंशतः दोन्ही प्रकारचा असूं शकतो. हा सघर्ष ज्या भूमिकाच्या द्वारा तो चित्रित करतो त्या भूमिका सजीव व्यक्तीप्रमाणे वाचकप्रेक्षकाच्या मनात अत्यत जिव्हाळा उत्पन्न करणाऱ्या व भावोत्कट असाव्या लागतात.

प्रतिभाशाली नाटककाराच्या कृतीत आढळणारे हे गुणविशेष बरवे याच्या नाटकामध्ये फार मोठया प्रमाणात जरी आढळले नाहीत तरी त्यामुळे त्याच्या विशिष्ट योग्यतेस बाध येतो असे कोणी समजण्याचे कारण नाही. बरव्याच्या नाटकात कथानकाची माडणी सरळ परंतु विस्कळीत रीतीने केलेली आढळते. कथानकाच्या रचनेत सघटितपणा व बाधेसूदपणा कमी. वाचकाच्या मनाची पकड घेणाऱ्या जिवंत व भावोत्कट भूमिका त्याच्या नाटकात एकदरीने थोडयाच आढळतात. नाटक पौराणिक असेल तर त्यावरून मामुली स्वरूपाचा नीतिबोध किंवा ऐतिहासिक असेल तर त्यापासून स्वदेशाभिमान, स्वधर्माभिमान, विभूतिगौरव इत्यादिकाचा ठसा मनावर उमटतो. परंतु जीवनविषयक एखादे प्रमेय किवा एखादा विशिष्ट दृष्टिकोण कथानकामध्ये अनुस्यूत

करून त्याचा आविष्कार चढत्या उत्कटतेने करावयाचा ही करामत साधण्याचा प्रयत्न बरव्यानी फारसा कोठे केलेला दिसत नाही. पौराणिक किंवा ऐतिहासिक कथानकामध्ये काही फरक न करिता तें मुळात असेल तसेच, निरनिराळया निवडक घटनाच्या द्वारा, नाटकात चित्रित करावयाचे आणि मुख्य कथानकाच्या गाभीर्याला व्यंजन म्हणून काही गौण पात्रें निर्माण करून त्याच्या तऱ्हेवाईकपणामुळे साधेल तशी विनोद-निर्मिति करावयाची हे त्याच्या नाटकाच्या माडणीचें साधारणतः सर्वत्र स्वरूप दिसून येते. त्याचीं सर्व नाटके–इंग्रजी नाटकाचीं भाषातरे खेरीज-करून–संगीत आहेत. त्यातील सगीत किर्लोस्कर–देवल याच्या धर्तीवर आहे. म्हणजे पदे विपुल असून पदामध्ये कथाभाग पुष्कळ वेळा गुंफलेला आढळतो. बरव्याची पदे काव्याच्या दृष्टीने पुष्कळ ठिकाणीं फार सुदर वठलीं असून तीं किर्लोस्कर–देवल याच्या पदास या बाबतींत सहज मागे टाकूं शकतील असे वाटते. त्याच्या भाषेत प्रौढपणा असूनही प्रसाद आहे, वर्णनशैलीत कल्पनाचमत्कृति असूनही रसाळपणा आहे. कोटया, श्लेष इत्यादि कृत्रिम प्रकार बेताबाताचे आहेत. संभाषणातील चटकदारपणा, उत्तरप्रत्युत्तरातील पाचपेच, इत्यादि गोष्टी साधण्याचा त्यानी बऱ्याच ठिकाणीं प्रयत्न केला आहे व तो बऱ्याच अशाने यशस्वीही झाला आहे.

'सं० शुकरंभा' हा बरव्याचा प्रारंभींचा प्रयत्न असावा हे त्या नाटकाच्या स्वरूपावरूनही आपणास ताडता येते. मूळ पौराणिक कथानक आहे तसेच येथे माडले आहे. काल्पनिक गौण पात्राचा यात समावेश नाही. कथावस्तूमधील दोन पक्षामध्ये उत्कट संघर्ष थोडयाबहुत फेरफाराने निर्माण करता येण्याजोगा असूनही तो तसा केलेला नाही. त्यामुळे संभाषणरूपाने सागितलेली कथा यापेक्षा या रचनेला नाटयकलेच्या दृष्टीने अधिक उच्च असे स्वरूप आलेले नाही. बऱ्याच ठिकाणचीं पदे मात्र सुंदर व काव्यात्मक आहेत. गंगेच्या वर्णनातील पुढे दिलेल्या दोन पदामधील कल्पनाचमत्कृति मोठी सुंदर व लक्षात ठेवण्याजोगी आहे—

१

स्वच्छ स्फटिका परी येत हा प्रवाह गगनातुनी ॥ पाहुनी वाटतसे मन्मनीं ॥ ध्रु० ॥ भूलोकींचा जन बुडतो हा भवार्णवीं पाहुनी ॥ तयांचा

आर्त स्वर ऐकुनी ॥ वाटे त्याच्या रक्षण–कार्मी सिद्धचि मग होउनी ॥ असे जणु करी काय स्वर्धुनी ॥ उत्तरीय निजवस्त्राचा को पदर काय सोडुनी ॥ दिला हा दिसतो मज लागुनी ॥

२

गंगातीरीं धर्म काम जणु युद्ध खेळती गमते ॥
तरंग चंचल, नवयुवतीचे कटाक्ष, शस्त्रासम ते ॥
होती दोघाला ॥ साधुनी विचित्र युद्धाला ॥

'स० गोपीचंद' नाटकामध्ये रचनाकौशल्य अधिक प्रमाणात प्रकट झाले आहे. जालधरनाथ आणि मच्छिद्रनाथ हे दोघे नाथपंथाचे प्रवर्तक एकमेकाचे गुरुबधु. जालंधरनाथाची शिष्यीण मैनावती हिने पाचारण केल्यावरून जालधरनाथ तिजकडे गेले असता मैनावतीचा मुलगा भोगासक्त राजा गोपीचद याने त्याना खाईत टाकून दिले. इकडे मच्छिद्रनाथ परिमळा राणीच्या स्त्रीराज्यात जाऊन तिच्याशीं विवाहबद्ध होऊन तेथील प्रेमपाशातन्न गुतून राहिले. तेव्हा जालंधराचा शिष्य कानीफनाथ व मच्छिद्राचा शिष्य गोरखनाथ हे दोघेही आपआपल्या गुरूना सोडवून आणण्याच्या प्रतिज्ञा करून आपल्या कामास लागतात. इकडे गोपीचंदाला माता मैनावतीच्या शोकविव्हल स्थितीमुळे पश्चात्ताप होतो. तिकडे गोरख हा युक्तिप्रयुक्तीने परिमळा राणीच्या राज्यात प्रवेश करून मृदंगातून खुणेचे बोल काढतो, तेव्हा मच्छिद्रनाथ सावध होऊन प्रपचाचा मायामय पसारा टाकून तेथून गोरखनाथासह बाहेर पडतात. मच्छिद्रनाथ गोपीचंदाच्या राजधानीत येऊन गोपीचदाची वासनात्मक प्रकृति सर्व जाळून खाक करून त्याला अंतर्बाह्य शुद्ध व निःसंग करितात आणि जालधरनाथाना हाक देऊन खाईतून बाहेर काढतात. गोपीचद विरक्त होऊन जोग घेतो, परंतु गुरूच्या आज्ञेवरून पुनः राज्याचा स्वीकार करतो. याप्रमाणे नाटकाचे एकंदर कथानक आहे.

प्रस्तुत कथानक दोन पृथक शाखामध्ये विभागले आहे. गोपीचंद, मैनावती, जालधरनाथ याच्याकडील व मच्छिद्रनाथ, परिमळा, गोरखनाथ याच्याकडील असे दोन विभाग उघड आहेत. गोपीचंदाचा उद्धार करून जालंधरनाथाला खाईतून काढण्यासाठी मच्छिद्राची

जरूर असते म्हणून त्याच्या द्वारें दोन्ही कथाविभागाचा संबंध साधला जातो, हे खरें. तथापि हा संबंध आतरिक व अपरिहार्य असा नाही. मच्छिंद्रनाथ नसते तरी गोपीचंदाच्या पुतळयाच्या रूपाने वासनात्मक शरीरें भस्म करणे इत्यादि कामगिरी कानीफनाथाकडूनही सहज घडण्याजोगी होती. तेव्हा दोन कथाशाचा विलगपणा हा दोप या नाटकामध्ये भासमान होतोच. तथापि अनेक चमत्कृतिजनक देखावे, चटकदार संवाद व विविध प्रकारच्या गौण पात्राकडून निर्माण होणारा विनोद, इत्यादिकाच्या योगाने हें नाटक बरेंच आकर्षक झालें आहे. प्रयोगात तर तें उत्कृष्ट वठत असले पाहिजे. आणि खरोखरी रगभूमीवर तें कित्येक वर्षे लोकप्रिय होतेंही. या नाटकात 'रूपक्या' व अतिशयोक्ति' अशीं दोन गमतीदार पात्रे नाटककाराने घातलीं आहेत. रूपक्या हा अर्थात् बोलताना रूपकाचा, दाखल्याचा पाऊस पाडतो व अतिशयोक्ति ही कोणतीही गोष्ट पराकोटीला नेऊन सागते.

"जशी रसिकाला कविकृति, नाविकाला समुद्राची भरती, सुधारसाच्या जोडीला ऊन ऊन चपाती—(नव्हे या व्यतिपाताच्या जोडीला ती वैधृति, या दगडाला ती चिखलमाती)–तशीच मला ही अतिशयोक्ति."

याप्रमाणे विनोदप्रचुर किंवा चमत्कृतिजनक दाखले या रूपक्याच्या भाषणांत अनेक आढळतील. त्याच्या तोंडीं मार्मिक विधानेंही पुष्कळ घातलीं आहेत. एकंदरीने ही विनोदी पात्राची जोडी सबंध मराठी वाङ्मयात अलौकिक आहे. गडकऱ्याचीं नाटके होण्याच्या पूर्वी वीस वर्षे अशा तऱ्हेचीं पात्रें निर्माण करण्याचे कौशल्य बरव्यानी दाखविले होते ही गोष्ट विशेष कौतुकास्पद आहे.

'सं० ध्रुवचरित्र' हे पुराणातील प्रख्यात ध्रुवकथेवर सरळ रीतीने रचलेलें नाटक आहे. 'महाराणा प्रतापसिंह' व 'मातृशिक्षाप्रभाव' हीं दोन्ही नाटकें बरव्याच्या एकंदर नाटकांमध्ये विशेष महत्त्वाचीं आहेत. राणा प्रतापच्या कारकीर्दीतील अत्यंत निकराचा व रोमांचकारी असा जो हळदीघाटचा युद्धप्रसंग त्याला मध्यवर्ती कल्पून, त्याच्या मागच्या

व पुढच्या प्रसंगाची योग्य गुंफण करून पूर्वोक्त नाटक रचले आहे. यात स्वदेश, स्वधर्म याकरिता जिवावर उदार होऊन समर करणारा प्रताप व त्याच्यावर आक्रमण करणारा मोगल सम्राट, याच्यामधील संघर्ष तर चित्रित केलाच आहे, आणि तो चित्रित करताना प्रतापच्या तोंडीं जळजळीत देशाभिमानाची दर्शक अशीं भाषणे घातलीच आहेत, परंतु त्याखेरीज आपल्या कोमल रम्यतेने मन वेधून घेणारे असे एक उपकथानकही या नाटकात गोवल्यामुळे त्याच्या सौंदर्यात भर पडली आहे. प्रतापसिहाची मुलगी रामकुवर ही आपल्या पतीचा काही अपमान करिते. त्यामुळे तिचा पति रत्नसिह तिचे तोंड पाहायचे नाही अशी प्रतिज्ञा करितो. परतु पुढे रामकुवर ही अनेक अद्भुत वीरतेचीं कृत्ये करते व पुरुषवेषाने रत्नसिहाजवळ राहून त्याच्याबरोबर पराक्रम करून त्याचे मन आकृष्ट करून घेते व सरतेशेवटी त्या दोघाची दिलजमाई होते. हे उपकथानक मुख्य कथानकात कुशलतेने गोवून दिले आहे. सहाव्या अकात सम्राट अकबराच्या अध्यक्षतेखाली एक सर्वधर्मपरिषद भरविली आहे. काजी, मुल्ला व नास्तिक पडित वाद करीत असता बादशहा येतो. हिंदु पडिताचे म्हणणे इतर सर्व धर्मपंडिताहून अधिक खोल, समजस, सयुक्तिक व उदार असे दाखविले आहे. या नाटकात खुद्द प्रतापसिह, त्याचप्रमाणे रामकुवर, प्रतापचे भाऊ शक्तिसिह व सागरसिह–याच्या भूमिका जिवंत व लक्षणीय वटल्या आहेत.

हे नाटक रगभूमीवर पुष्कळच लोकप्रिय होते. परंतु त्यातील देशाभिमानाच्या धगीने रसरसणाऱ्या भाषणाचे तेज सरकारला असह्य होऊन ते १९१० सालीं प्रेस आक्ट खाली जप्त करण्यात आले. ते 'अभिनव नाट्यमदिरा'च्या विनतीवरून मुंबई सरकारने नुकतेच जप्तीतून मुक्त केले आहे.

सगीत 'मातृशिक्षाप्रभाव' हे नाटक शिवाजीच्या चरित्रावर लिहिले आहे. बालपणीं विजापुरास असता शिवाजी आपल्या स्वातंत्र्यप्रेमामुळे व यवनाविषयीच्या तिटकाऱ्यामुळे बादशहाच्या दरबारात जाऊन त्याची ताबेदारी पत्करण्याचे नाकारतो. त्याची आई जिजाबाई हिला त्याचे कृत्य पसंत पडतें पण शहाजीला मात्र ते पसंत पडत नाही. तो रागाऊन

जिजाबाई व शिवाजी याना पुण्याच्या जहागिरीवर पाठवितो. या प्रसंगापासून नाटकास सुरवात झाली असून पुढे शिवाजीने केलेले अनेक पराक्रम व त्याची कौटुंबिक स्थिति अनेक प्रवेशातून वर्णिली आहे. अनेक मोठमोठे पराक्रम करून दाखविल्यानंतर शिवबाची व शहाजीची जेजुरीच्या खंडोबाच्या देवळात भेट होते या प्रसगाने नाटकाची समाप्ति केली आहे. बरव्याच्या इतर नाटकाप्रमाणे ह्या नाटकाचे कथानकही विस्कळीत व परस्पर विलग असलेल्या प्रसगानी बनलेले असेच आहे. संभाषणे साधारणपणे मनोरंजक व सद्विचारानी भरलेली अशी आहेत. प्रस्तुत नाटकात जावळीचा सरदार चंद्रराव मोरे ह्याच्याशी शिवाजीचे हस्तक रघुनाथपंत कोरडे व संभाजी कावजी याच्या झालेल्या झटापटीचा प्रसग एका प्रवेशामध्ये फार चटकदार रीतीने वर्णन केला आहे. हा प्रवेश नाट्यदृष्ट्या उत्तमातील गणता येईल. प्रस्तुत नाटकात गागाभट्ट, वामन पंडित, रामदास, कल्याण, त्याचप्रमाणे विजापूर दरबारातील मुरारपत, तानाजी, त्र्यबकपंत, सभाजी इत्यादि अनेक पात्रे निरनिराळ्या प्रसगाच्या अनुरोधाने आणली आहेत. 'महाराणा प्रतापसिहा'तही असेच केले आहे. अर्थात त्यामुळे नाटकाच्या एकसूत्रतेस बाध आला आहे.

इसवी सन १८९६ मध्ये बरव्याच्या जीवनात एक मोठाच परिवर्त घडून आला. केसरी कचेरीतील अनतरावाची नोकरी किती वर्षे टिकून होती याची नक्की माहिती मिळत नाही. कसेही असले तरी ही लहानशी नोकरी आणि पुस्तकाचे दुकान चालविणे, नाटके व इतर लेख लिहिणे, यासारखे अर्थप्राप्तीच्या दृष्टीने निष्फळ उद्योग याच्या आधारावर सर्व कुटुबाचा कायमचा योगक्षेम चालू राहणे शक्य नव्हते. दिवसेदिवस अधिकच अडचणीची परिस्थिति येत चालली. आई, वडील, बहिणी याची नोकरी पत्करा म्हणून अनंतरावास सारखी जाचणी सुरू झाली. तेव्हा ग्रामत्याग करून दुसरीकडे कोठेतरी आपले नशीब काढावे या विचाराने त्यानी नाशिक येथे छापखाना काढण्याचा विचार सुरू केला. उधारीने, उसनवारीने काही रक्कम जमवून व पतीवर काही यंत्रसामग्री घेऊन ५ जून १८९६ रोजीं नाशिक येथे त्यानी 'विद्याभूषण' या नावाने आपला छापखाना सुरू केला. छाप-

खाना काढताना एका लबाड इसमाने त्यांस फसवून गोत्यांत आणण्याचा प्रयत्न केलाच. इकडे खर्चास पाठविण्यासाठी पुण्याहून वडिलाचा लकडा एकसारखा चालूच होता. इतकेच करून न थाबता वडील वामनराव हे सर्व कुटुम्ब घेऊन अनंतरावाच्याकडे त्याच्या छापखान्याची स्थिरस्थावर होण्याच्या पूर्वी येऊन उभे ठाकले. हातात एक दिडकी नाही व चोहोंकडून असे काहूर उठलेले अशा स्थितींत त्यानी हे दिवस कसे काढले असतील याची कल्पनाच केलेली बरी. असाधारण धैर्य व सत्त्वशीलता अंगीं असल्याशिवाय मनुष्य अशा परिस्थितींतून पार पडूं शकत नाही.

अशाही परिस्थितीस तोड देऊन अनंतरावानी हळूहळू सर्व स्थिरस्थावर केलें. पुण्यास असता 'बालमित्र' नावाचे मासिक १८९३ पासून त्यानी सुरू केलें होते. तें आता बंद करून नाशकास 'लोकसेवा' नावाचे साप्ताहिक वर्तमानपत्र त्यानी सुरू केले. पहिला अंक ६-१-१८९७ रोजीं निघाला. अनंतरावाची सचोटी, कार्यक्षमता आणि कष्टाळूपणा याचा प्रभाव पडून हळूहळू छापखान्यास व वर्तमानपत्रास बरे दिवस येऊ लागले. लौकरच त्याचे धाकटे बंधु गंगाधरपंत पुण्याहून त्याच्या मदतीस आले. दोघाच्या मेहनतीने छापखाना व वर्तमानपत्र बरेच भरभराटीस आलें. तेथून पुढे आठदहा वर्षे बरवे याचीं आनदात व भरभराटीत गेली. पुढे पुनः त्याच्या आयुष्यात क्राति होण्याचा एक प्रसग आला. अनंतरावानी आपल्या कर्तबगारीने छापखाना उजागरास आणला होता व तो प्रथमपासून त्याच्याच नावावर चालत होता. त्यामुळे घरातील मंडळीच्या मनात विकल्प येण्यास सुरवात झाली. खेदाची गोष्ट ही की गृहकलहाचें बीज पेरणारी व्यक्ति खुद्द अनतरावाची मातुःश्रीच होती. अनंतराव पहिल्यापासूनच आपल्या आईचे नावडते होते. काही क्षुल्लक कारणावरून बोलाचाली होऊन घरातील धुमसत असलेल्या असूयाग्नीने पेट घेतला. छापखाना व वर्तमानपत्र गंगाधरपंताच्या नावे करून द्यावे असे आईच्या मनांत आहे हे कळताच अनंतरावानी त्यावर ताबडतोब तुळशीपत्र ठेवलें. ताबडतोब बंधूच्या नावाचा कागद करून तो सरकारांत नोंदून आपण घरातून अलग झाले व नाशकासच निराळें बिऱ्हाड करून राहिले. हा

प्रसंग केव्हा घडला असावा हें नक्की समजत नाही. बहुतकरून १९०८ च्या सुमारास ही फारखत झाली असावी. या कौटुम्बिक घडामोडीमध्ये अनंतरावाचा धीरोदात्त सात्त्विक स्वभाव आणखी एकवार प्रगट झाला.

इ. स. १८९६ पासून १९०८ पर्यंतच्या बारा वर्षांत अनतरावानी पुढील नाटकें लिहिलीं असल्याचे निश्चयेंकरून सांगता येतें. 'लोकमत-विजय' (१८९८), 'सुदाम' व 'प्रल्हाद' (अंदाजें १९०३–४), 'शारदा-मंडन' (१९०५), 'वेणीसंहार' व 'उत्तरामचरित' या नाटकाच्या रंगावृत्ति (१९०८–०९), 'समजुतीचा घोटाळा' (१९०६). याखेरीज आणखी काही नाटकें या काळात त्यानी लिहिली असल्यास त्याबाबत निश्चित विधान करण्यास साधन नाही.

'लोकमतविजय' हे नाटक मोठ्या कल्पकतेचे द्योतक असून मराठी वाङ्मयात काही दृष्टींनी अपूर्व आहे. आध्यात्मिक क्षेत्रात जसे 'प्रबोधचंद्रोदय' तसे राजकीय क्षेत्रात 'लोकमतविजय' हे आहे असे मानण्यास चिंता नाही. राजकीय क्षेत्रातील परस्परविरोधी गुण व तत्त्वे याच्या भूमिका कल्पून त्याच्या परस्पर संघर्षावर हे नाटक आधारले आहे. १८९८ हे साल लक्षात घेतले म्हणजे अशा तऱ्हेचा राजकीय तत्त्वोपन्यास करण्याची बुद्धि बरवे यास का झाली, हे सहज लक्षात येते. राजकीय जागृति व तदुद्भूत असंतोष, तो दडप-ण्यासाठी सरकारचे प्रयत्न, त्यामुळे प्रजेकडून सरकारी अधिकाऱ्याच्या खुना-च्या रूपाने घडलेला अतिप्रसंग, त्यावर सरकारने केलेली द्विगुणित दडप-शाही, इत्यादि सर्व इतिहास १८९८ च्या पूर्वी नुकताच घडलेला बरव्याच्या डोळ्यासमोर ताजा होता. 'लोकमतविजय' नाटकात, एकीकडून एकतंत्री नोकरशाहीने चालविलेली दडपशाही व दुसरीकडून प्रजेमध्ये उद्भवलेल्या असंतोष, विक्षोभ इत्यादि अनिष्ट वृत्ति याच्या कचाट्यात सापडून विचार-स्वातंत्र्य इत्यादि राष्ट्रोन्नतिकारक तत्त्वें कशी संकटाकुल झाली आहेत हे दाखविले आहे. श्वेतपुरी येथे महाराणी विजयिनी ही राज्य करीत होती. तिला ईशप्रसाद नामक सत्पुरुषाच्या अनुग्रहाने आर्यमंडळ देशाचे साम्राज्य प्राप्त झाले. ईशप्रसाद स्वामीचा एक शिष्य विचारस्वातंत्र्य आपली बहीण राष्ट्रजागृति व पत्नी मुद्रणकला ह्याच्यासह आर्यमंडळ देशात राहून तेथील जनतेच्या उद्धारार्थ प्रयत्न करीत होता. आर्यमंडळात पूर्वी धुमाकूळ

घालणाऱ्या राजद्रोह नामक बंडखोरास या लोकांनी हद्दपार करविलें होतें. हा राजद्रोह विचारस्वातंत्र्याचा सूड उगवण्यास टपलेला होता. त्याने असतोष व विक्षोभ या आपल्या हस्तकास आर्यमंडळात पाठवून तेथे धुमाकूळ माजविला. महाराणीने राज्यधारण केल्याचा शतवार्षिक महोत्सव चालला असता असतोष, विक्षोभ यानी विचारस्वातत्र्याची मुलगी राजनिष्ठा हिला तिच्यावर हल्ला करून पळवून नेले व दुसरी मुलगी शाति हिला ठार केले. इकडे महाराणी विजयिनीच्या दरबारात एकतंत्र नावाच्या राजकुलोत्पन्न सरदाराचा वरचष्मा होऊन त्याने आपल्या उन्माद, उत्पात इत्यादि हस्तकाच्या करवी विचारस्वातत्र्याला पकडून त्याच्यावर भलभलते आरोप करून त्याला कैदेत टाकलें. त्याबरोबर त्याची बहीण राष्ट्रजागृति, स्त्री मुद्रणकला व मुलगा लोकमत यानाही बदीत टाकण्यात आले. सर्व देशभर एका बाजूने एकतत्राचे उन्माद वगैरे हस्तक व दुसऱ्या बाजूने राजद्रोहाचे असंतोष, विक्षोभ इत्यादि अनुयायी याचा धूमाकूळ सुरू झाला महाराणी विजयिनी हिची मुलगी राजसत्ता हिचे मन विचार-स्वातत्र्याचा मुलगा लोकमत याच्यावर बसले होते. अखेरीस विचारस्वा-तत्र्याची मुलगी व लोकमताची बहीण जी राजनिष्ठा तिजवर असतोष हा बलात्कार करण्याच्या प्रयत्नात असता राजसत्ता आपल्या परिवारासह तेथे येते. आणि असंतोषाचा दुष्ट हेतु सिद्धीस न जाता तो पकडला जातो. पुढे राजसत्तकडून सर्व हकीकत राणी विजयिनी व ईशप्रसाद यास कळून एकतत्राची कारस्थाने उघडीं पडतात; विचारस्वातत्र्य, मुद्रणकला, राष्ट्रजागृति व लोकमत याना मुक्त केले जाऊन राजसत्ता व लोकमत याचा राणी विजयिनीच्या अनुमतीने विवाह होतो. ईशप्रसाद स्वामीच्या कृपेने सर्वत्र आनदीआनंद होतो.

याप्रमाणे प्रस्तुत नाटकाचे कथानक आहे. तत्कालीन लोकस्थि-तीवर हे रूपक कसे केले आहे हे विचक्षण वाचकाच्या सहज लक्षात येण्याजोगे आहे. हे रूपक मोठ्या कौशल्याने रचले असून नाटकामधून एकदर प्रसगाचा आविर्भावही परिणामकारक रीतीने केला आहे. सभाषणा-मधून राजकीय तत्त्वाचे प्रतिपादनही साधले असून शिवाय मनुष्यव्यक्ति या नात्याने त्या त्या भूमिकाचे स्वभाववैशिष्ट्यही बऱ्याच प्रमाणात सूचित

केलें आहे. बरव्यांच्या सर्व नाटकामध्ये प्रस्तुत नाटक उत्कृष्टात गणण्या-जोगे आहे हे वरील वर्णनावरून वाचकाच्या लक्षात येईल.

'संगीत सुदाम' हे मोठे गोड नाटक आहे. वैशिष्टयपूर्ण जिवत भूमिकाची निर्मिति करण्याचे कसब बरवे यास या नाटकामध्ये चागल्या रीतीने साधले आहे. पुराणातरींची सुदामदेवाची कथा सर्वास माहीतच आहे. खुद्द सुदामदेव, त्याची पत्नी सत्यवती व त्याचा मुलगा चक्रपाणी याच्या भूमिका सुंदर वठल्या असून त्याशिवाय सुदामनगरींतील धनाढ्य, उद्दाम व अधिकारलोभी ब्राह्मण कुबेर आणि त्याची जहाबाज पत्नी जग-दंबा या भूमिका तर फारच खुबीदार व मनोहर वठल्या आहेत. 'सगीत प्रल्हाद' या नाटकात ईश्वराचा वैरिश्रेष्ठ हिरण्यकशिपु व भक्तशिरोमणि प्रल्हाद याच्या पुराणातील कथेचा थोडयाबहुत फरकाने अनुवाद केला आहे. 'सुदाम' व 'प्रल्हाद' ही दोन्ही नाटके प्रयोगाच्या दृष्टीने चागली आहेत. विशेषतः सुदाम नाटक तर एकेकाळीं रगभूमीवर चागले लोकप्रिय झाले होते असे दिसते. या नाटकाच्या प्रस्तावनेत श्री. बरवे म्हणतात — "प्रस्तुत नाटक 'कोल्हापूरकर नाटक मडळी'करिता मुद्दाम लिहून तयार केले, व त्याप्रमाणे त्या मंडळीने आज एक वर्षपर्यंत पुष्कळ प्रमुख शहरीं त्याचे सुंदर प्रयोग करून ते विद्वान व सामान्य अशा सर्व जनसमूहाला चागले आवडते करून सोडले, याबद्दल मी त्याचा आभारी आहे."

'स० शारदामण्डन' हें नाटक शाकरदिग्विजयातील मडनमिश्र व शंकराचार्य याच्यामधील सुप्रसिद्ध वादविवादावर रचले आहे. मडनमिश्राची पत्नी शारदा हिची वादाचे प्रसगी पच म्हणून नेमणूक, तिने दोघाच्याही गळयात माळा घालून ज्याची माळ सुकेल तो पराभूत झाला असे मान-ण्याची केलेली योजना, पुढे शंकराचार्यास कामशास्त्रातील प्रश्न विचार-ल्यामुळे त्यानी अमरुक राजाच्या शरीरात केलेला परकायाप्रवेश, इत्यादि सर्व गोष्टी मुळातल्याप्रमाणे यात आल्या आहेत. कथानकाच्या स्वरूपास अनुसरून भाषा प्रौढ, सस्कृतप्रचुर व वाचकाच्या मनावर विद्वत्तेची छाप पाडणारी अशी आहे. प्रस्तत नाटक तत्कालीन शकराचार्याना अनत-रावानी वाचून दाखविले. ते त्याना पसत पडून त्यानी त्याबद्दल प्रशसा-पत्र बरवे यास पाठविले, ते नाटकाच्या मुद्रित प्रतींत छापले आहे. बरवे

याची ही सेवा श्रींच्या चरणीं रुजू होऊन श्रींनी त्यास 'नाटयकाव्या-लंकारभूषण' ही पदवी दिली. हे पदवीदानपत्रक मात्र फार पुढे, म्हणजे १५ व्या नाटयसंमेलनाच्या वेळीं ( १९१९ सालीं) पुणे येथे श्रींच्याकडील एका गृहस्थानी आणून बरवे याना अर्पण केलें.

'समजुतीचा घोटाळा' हे नाटक गोल्डस्मिथच्या *She Stoops to Conquer* या नाटकाचे रूपातर आहे. आंग्ल नाटयवाङ्मयाकडे बरव्याचे लक्ष या काळात वळलें असल्याचें हें प्रत्यतर होय. मूळ नाटकातील विनोद व भिन्नभिन्न भूमिकाच्या खाब्याखुब्या रूपातरामध्ये वठविण्यात बरव्यानी चागलेच यश मिळविले आहे. या नाटकाचा प्रयोगही चागलाच लोकप्रिय होत असे.

या कालावधींत लिहिलेल्या नाटकाचें समालोचन एथवर केलें. परंतु त्याची नाटयसेवा नाटके लिहून तीं मडळयाकडून प्रयोगात आणणें एवढया-पुरतीच आता राहिली नव्हती. भिन्नभिन्न दिशानी रंगभूमीची सेवा करण्या-कडे त्यानी आपलें लक्ष वळविले होते व आपलें तनमनधन अधिकाधिक प्रमाणात नाटयकलेच्या उन्नतिप्रीत्यर्थ वाहण्याची त्याची तयारी होत चालली होती. आपल्याकडील भरत नाटयशास्त्राचा व पाश्चात्त्य देशातील नाटके व नाटय याचा दृढ अभ्यास त्यानी याच काळात केला. या अभ्या-साचे फलही अनेक रूपानी जनतेला देण्यास त्यानी याच काळात सुरवात केली. नाटयकलेची सागोपाग व सोपपत्तिक चर्चा व्हावी व आपल्या इक-डील नाटयव्यवसायाला शुद्ध, शास्त्रोक्त व भरदार स्वरूप प्राप्त व्हावे या उद्देशाने त्यानी १९०४च्या आक्टोबरात (दसऱ्याच्या मुहूर्तावर?) 'नाटय-कला' नावाचे मासिक सुरू केले. मासिकाची वर्गणी वर्षाची रु. १–३–० होती व पाने लहान आकाराचीं दरमहा सुमारे वीस असत. मासिकाच्या स्वरूपात हें दोन वर्षे चालल्यानतर १९०७ च्या मार्च महिन्यापासून बरव्यानी त्याला पाक्षिकाचे स्वरूप दिले व ते पूर्वी मुबईस छापून घेत असत त्याऐवजी आपल्या विद्याभूषण छापखान्यात छापण्यास सुरवात केली. पाक्षिक स्वरूपात ही 'नाटयकला' आणखी फार तर दीड दोन वर्षे चालली असावी. पुढे विद्याभूषण छापखान्याशीं स्वतःचा असलेला सबंध सोडून बरवे पुण्यास निघून आले तेव्हा हे पाक्षिक बंद पडले असे दिसते.

नाटयकला व नाटयवाङ्मय यास वाहिलेलीं अशीं मराठींत जीं नियत-कालिकें निघालीं त्यात कै. शंकर बापूजी मुजुमदार याच्या 'रंगभूमि' मासि-काच्या खालोखाल नाव घेण्याजोगें असें बरवे याचें 'नाटयकला' हेंच होय. नाटयक्षेत्रात रंगभूमि मासिकाची कामगिरी निर्विवादपणे सर्वश्रेष्ठ होय. 'नाटयकले'नेही मराठी रगभूमीची आपल्या परीने उच्च दर्जाची सेवा केली आहे. 'रंगभूमि' मासिकाचा सर्व भर मराठी नाटककार, त्याचीं नाटकें, नाटयशास्त्राचीं व नाटयवाङ्मयाचीं तत्त्वें, यावर असे. अर्थात त्याचें स्वरूप प्राधान्येकरून वाङ्मयात्मक होतें. बरव्याच्या 'नाटयकले'चे स्वरूप अभिनयकला व नटाचा व्यवसाय यास अधिक धरून होतें. तीत विलायती नट, नाटककार प्रभृतीच्या गोष्टी अधिक प्रमाणात येत असत.

परंतु 'नाटयकले'पेक्षाही अधिक भरीव आणि उपयुक्त असें कार्य त्यानी याच सुमारास सुरू केलें. एका मोठ्या संस्थेचा पाया घालून नाटयव्यवसायाचें आणि त्यात गुंतलेल्या लोकाचे संघटन व नट्यविद्येची सर्वांगीण प्रगति करून घेण्याचे साधन निर्माण करून त्यानी महाराष्ट्रीयाच्या हातीं दिलें. आपल्या हितकर्त्याच्या कामगिरीचे चीज करून त्याच्या कार्याचा अंकुर सहानुभूतीच्या व साहाय्याच्या ओलाव्याने संवर्धित करण्यास आमचा समाज अद्याप शिकलेला नाही. त्यामुळे झाडाचीं काडे करून बरवे यानी जोपासलेली संस्था त्याच्याबरोबर किंब-हुना त्याच्याही अगोदर क्षीणसत्त्व झाली आणि तिजपासून समाजाचा व्हावा तसा लाभ होऊ शकला नाही.

बरवे याच्या खटपटीने मुंबई येथे ता. २८ आगष्ट १९०५ रोजीं महाराष्ट्रातील 'नाटक मंडळयाचें संमेलन' कै. गणेश श्रीकृष्ण उर्फ दादासाहेब खापर्डे याच्या अध्यक्षतेखाली भरले. याच समेलनात 'भरत-नाटयसमाज' नावाच्या संस्थेची स्थापना करण्यात येऊन शंकर बापूजी मुजुमदार यास संस्थेचे मुख्य चिटणीस व अनंत वामन बरवे यास त्याचे मदतनीस नेमण्यात आले. या सस्थेच्या द्वारे सर्व नाटक मंडळयाचें संघटन करावे, नटाचा दर्जा व योग्यता वाढवावी व नाटयकलेस अधिक प्रतिष्ठित व उन्नत असे रूप प्राप्त करून द्यावे, हा संस्थापकाचा प्रारंभी हेतु होता. परंतु अशा तऱ्हेच्या प्रयत्नापासून फायदा करून घेण्याचा वकूब आमच्या

नाटकी मंडळयांत नव्हता. आळशावर गंगा यावी त्याप्रमाणे त्यांची स्थिति झाली. सघटनेऐवजी त्याच्यात विघटना मात्र झाली व लवकरच कित्येक प्रमुख कंपन्यामध्ये फाटाफुटी होऊन त्याच्या चिरफळया झाल्या. अभिनयाच्या कलेत प्रगति होण्याचें दूरच राहो, नटाचा दर्जा उत्तरोत्तर खालावत चालला व एक आख्यैचा नट गेला म्हणजे त्याची जागा भरून काढणारा त्याच्या तोडीचा नट कोणी नाही, अशी स्थिति हमखास येऊ लागली. आपल्या चालत्या काळात धुंद होऊन कशाची दरकार नाही असे जे वर्तन नाटकवाल्या मंडळींनी केले त्याचे प्रायश्चित्त त्यास पुढे भोगावे लागले. दुसऱ्या बाजीरावाचा खाक्या चालू ठेवणाऱ्या सरक्षणरहित व बेसावध नाटक मंडळयाचा गळा जेव्हा सिनेमाने (विशेषतः बोलपटानी) धरला तेव्हा ती पकड त्यास सोडविता आली नाही. नाटक मंडळयाबरोबरच आमची नाटयकलाही जवळ जवळ गारद झाली.

बरवे यानी प्रयत्न करण्यात मात्र कसुरी केली नाही. भारतनाटय-समाजातर्फे दरवर्षी कोणा तरी एका नाटककपनीच्या विद्यमाने नाटय-संमेलन भरविण्याचा परिपाठ त्यानी कायम ठेवला. पहिल्या आठ नाटयसमेलनातील अध्यक्षाची भाषणे व इतर काही महत्त्वाची भाषणे व चर्चा एकत्र करून १९१३ साली 'नाटयविषयाची सुशिक्षित चर्चा' या नावाचे एक पुस्तक त्यानी छापले. आपल्या 'समाजा'च्या विद्यमाने सर्व नाटक मडळयाना एकत्र आणून त्याच्यात बधुभाव व सहकार्य निर्माण करण्याचा त्यानी काही थोडा थोडका प्रयत्न केला नाही. परतु....

पहिल्या समेलनाची हकीकत तत्कालीन पत्रात जी दिलेली आढळते त्यात संस्थेचे नाव 'भरत' नाटयसमाज असे दिले आहे. परतु पुढे या संस्थेचा निर्देश 'भारत' नाटयसमाज असा होऊ लागला. 'भरत'चे 'भारत' असे कोणी व का केले याचा पत्ता लागत नाही.

भारत नाटयसमाजाच्या स्थापनेच्या सुमारासच आणखी एकदोन उद्योग या कलेच्या उन्नतीसाठी बरवे यानी सुरू केले. नाटयकलेचे शिक्षण देण्याची एक योजना करून ती त्यानी जाहीर केली. या योजनेची परिणति पुढे १० वर्षानंतर प्रत्यक्ष नाटयशाळा स्थापन करण्यात झाली. ही योजना प्रारभी जाहीर करताना बरवे म्हणतातः—

"शिल्प, चित्र, गायन इत्यादि अनेक कलांच्या संमिश्रणाने तयार झालेली, 'नाट्य' हीही एक उत्तम कलाच आहे; परंतु त्या सर्व कला शिकता येण्यासाठी जशा स्वतंत्र सोयी असतात, तसे या नाट्यकले-संबंधाने नाही. या कारणाने इतर कलात जशी सुसस्कृत माणसे तयार होऊ शकतात तसे या कलेत होत नाही आणि म्हणूनच ही कला एका तऱ्हेने अत्यंत लोकप्रिय असताही लोकदृष्ट्याच अप्रतिष्ठेचा विषय होऊन राहिली आहे. तेव्हा याही कलेचे सशास्त्र व पद्धतशीर शिक्षण मिळून सुविद्य नट व्हावेत या उद्देशाने आम्ही नाट्यकलेच्या शिक्षणाची स्वतत्र सोय केली आहे......"

दुसरा उद्योग म्हणजे 'विविध नाट्यविषय संग्रह' (Actor's Studio) हा होय. नाट्यकलेशी जेवढ्या म्हणून गोष्टींचा सबध येतो, त्या सर्व वस्तूंचा एकत्र संग्रह करून तो सार्वजनिक उपयोगासाठी खुला ठेवावयाचा असा त्याचा हेतु होता. तदनुसार त्यानी अनेक वर्षे प्रयत्न करून कसोशीने मोठा सग्रह जमविलाही होता. परतु त्याच्या शेवटच्या आजारात व त्याच्या मृत्यूनंतर त्या संग्रहाची वाताहत झाली, असे कळते. आपल्या लोकाच्या सचोटीचा हा नमुनाच अत्यत शोचनीय रीतीने प्रत्ययास आला असे म्हणण्यास हरकत नाही.

भारत नाट्यसमाजाप्रमाणेच हे दोन्ही उद्योग त्यानी नाशकास असतानाच १९०५–६ च्या सुमारास सुरू केले होते. परंतु मागे सांगितल्याप्रमाणे मातुःश्रीच्या आज्ञेनुसार छापखाना कनिष्ठ बंधु गगाधरपत याच्या मालकीचा करून देऊन अनतराव हे १९०८–०९ च्या सुमारास पुण्यास आले, तेव्हा त्याजबरोबर त्याचे उद्योगही तेथे येऊन दाखल झाले. 'नाट्यकला' पाक्षिक मात्र नाशकाहून निघण्याच्या पूर्वीच त्यानी बद केले होते. ते बंधूचा संबंध सोडून पुण्यास आले तरी घरगुती सबंधाच्या कटकटी त्याच्या मागच्या सुटल्या असे नाही. गगाधरपत १९११ साली प्लेगने वारले, तेव्हा तेथील प्रेसची वाताहत झाली. वडील वामनराव हे पुढील वर्षी प्रेस पुनः चालू करावा या उद्देशाने नाशकास गेले ते तेथेच पटकीने वारले. तेव्हा अनंतरावास स्वतः तेथे जाऊन प्रेसची वारासार करून तेथील देणी वगैरे वारावी लागली. त्या भानगडीत सुमारे ३०० रु

रक्कम अर्थाअर्थी काही संबंध नसतांना अनंतरावांच्या अंगावर शेकली, ती त्यांनी हप्तेबंदीने फेडून टाकली. पुण्यातील मालकीचें घर वामनरावानी अनतरावांस दिलें होतें. परंतु व्यवहार तोंडीं होता. गंगाधरपंतांच्या पत्नीने घरातील हिश्शाबद्दल भांडण उपस्थित करण्यास कमी केलें नाही. तेव्हा आपल्या नेहमीच्या सात्त्विक व सहनशील स्वभावानुसार अनतरावानी घराच्या हिश्शावरील आपला हक्क सोडून दिला. १९१६ च्या आक्टोबर महिन्यात त्याना दुर्दैवाने फारच मोठा तडाखा दिला. त्याचा दुसरा मुलगा भास्कर व प्रियपत्नी सौ. रुक्मिणीबाई या दोहोंचा प्लेगने तडकाफडकी अंत झाला. "येथून पुढे अनंतरावाचा संसार उघडा पडला. जीवनांतील जिव्हाळा व स्वारस्य नाहीसें झाले.

हे सर्व आघात धीराने सहन करून नाटयकलेची सेवा अनंतरावानी आपल्या सर्व शक्ति एकवटून चालविली होती. नाशकाहून पुण्यास आल्यानंतर त्यास दुसरा कसलाच व्यवसाय उरला नव्हता. नित्य नवीं नाटकें लिहावीं, तीं कंपन्याकडून बसवून घ्यावीं, नाटयकलेचें शिक्षण घेऊं इच्छिणारास शिक्षण द्यावे, भारत नाटयसमाजामार्फत नाटयसंमेलनें भरवावीं, नटाच्या व नाटकमंडळयांच्या अडचणीच्या प्रसगीं त्याना शक्य ती मदत करावी, नाटयवस्तुसंग्रहालय जमविण्याचा प्रयत्न करावा, यातच त्याचा सर्व काळ जाऊ लागला. या काळात, म्हणजे सुमारे १३–१४ वर्षे आपल्या नाटकापासून होणाऱ्या उत्पन्नावरच त्याचा निर्वाह होत असावा. दुसरे कोणतेही निर्वाहाचे साधन त्यास उपलब्ध होते असे दिसत नाही. अर्थात या सर्व काळात त्याची स्थिति किती जिगजिगीची व कष्टाची असेल याची कल्पनाच केलेली बरी. आणि ही सर्व आपत्ति त्यानी आपल्या धीरोदात्त वृत्तीमुळे, दुसऱ्याचे आपण सहन करावयाचें, पण दुसऱ्याला आपली तोशीस लागूं द्यावयाची नाही, अशा स्वभावामुळे स्वतःवर ओढवून घेतलेली होती.

इ. स. १९०९ पासून पुढचा काळ म्हणजे बरव्याच्या नाटयलेखनाचा अखेरचा कालखड होय. बारा तेरा वर्षात त्यानी किती तरी नाटकें लिहिली. त्या सर्वांच्या हस्तलिखित वा मुद्रित प्रतीही उपलब्ध होणे आता मुष्किलीचे झाले आहे. इंग्रजी वाङ्मयातील नाटकाचीं रूपातरें

करण्याची मागील कालखंडात दिसून आलेली प्रवृत्ति या काळांत वाढलेली दिसते. १९१० सालीं शेक्सपियरच्या Antony and Cleopatra या विख्यात शोकान्तिकेचे त्यानी केलेलें रूपातर 'शृंगारमंजरी' हे रंगभूमीवर आले. हे नाटक छापलें गेलें होतें अशी माहिती मिळते; परंतु त्याची मुद्रित प्रत उपलब्ध होत नाही. 'पिशाचविवाह' हे एक लहानसे प्रहसन व 'अण्णासाहेबाची धादल' हे हास्यरसात्मक विनोदी नाटक ही इग्रजीचींच रूपांतरें आहेत. मारी कारेली या कादंबरीलेखिकेच्या The Sorrows of Satan या कादंबरीच्या आधाराने बरवे यानी एका शेटजींच्या आग्रहावरून 'सैतान' नामक नाटक लिहिलें (१९१८). या नाटकात अलीकडील शिष्ट म्हणविणाऱ्या फॅशनेबल लोकाचा दाभिकपणा व त्याच्या चैनबाजीचे व नकली राहणीचे अनीतिमय अंतरंग, याची जागोजाग हजेरी घेतली आहे. हे नाटक ज्यानी लिहावयास सागितले त्या शेटजींनी अनंतरावास या व्यवहारात सफाई बुडविले. नाटक लिहिल्याबद्दल त्यास छदाम देखील दिला नाही; उलट छापखान्याचे १५० रु. बिल देखील न चुकवतां शेटजी तसेच पसार झाले. ही रकम लहान असली तरी अनतरावाच्या स्थितीच्या मानाने भारीच होती. तिच्या बोजाने अनंतरावाची छाती खचून गेली आणि वृद्धापकाळीं हे देणे देण्याचा त्यास मोठा हृद्रोग लागला.

या काळातील बाकीचीं त्याचीं बहुतेक नाटकें पौराणिक आहेत. त्याचीं 'भीष्मशरशय्या' आणि 'कर्णवध' हीं नाटकें केव्हा रचलीं गेलीं हें निश्चित सागता येत नाही. तीं वसईकर नाटकमंडळीकडून १९१६ पूर्वी रंगभूमीवर आलीं होतीं असे दिसतें. या दोन्ही नाटकात महाभारतातील कथाभागच कवीने संभाषणरूपाने वर्णिले असून त्यात मध्येमध्ये स्वतःचा खमंग मसाला घातला आहे. 'भीष्मशरशय्या' नाटकात अलीकडील धीटपाठ, आचरट व ढिल्या माथ्याच्या कवींची खरपूस चेष्टा केली आहे. १९१६ सालीं वसईकर मंडळीनेच त्यांचें 'कृष्णसखी मिराबाई' हें नाटक बसविलें. त्याच सुमारास, म्हणजे १९१५ सालच्या शेवटच्या दोन महिन्यात 'महासती अनसूया' हें राजापूरकर संगीत नाटक मंडळीने बसविण्यास घेतलें. निरुपद्रवी व सत्त्वशील वृत्तीच्या अनंतरावांना

आजवर नाटककंपन्यानी सररहा बुडविलेच होतें. परंतु त्याच्या नाट्यक्षेत्रातील कारकीर्दीच्या उत्तरार्धात राजापूरकर मंडळी ही एक त्याना अशी भेटली की जिने त्याच्याशीं पैशाचा व्यवहार चोख ठेवला. अनतरावाच्या पडत्या काळात ही एक मोठीच मदत त्याना झाली यात सशय नाही.

अनंतरावाचा जीवनभानु अशा रीतीने उतरणीस लागला असता नाट्यसृष्टीच्या हितार्थ प्रकाशण्याचा त्याचा क्रम सुरूच होता. भारत नाट्यसमाजाचे ते स्वतः सेक्रेटरी होते त्या काळात, म्हणजे १९०५ ते १९१९ पर्यंत, एकंदर १५ नाट्यसमेलने त्यानी घडवून आणलीं. म्हणजे संमेलनाला एकाही वर्षाचा खड त्यानी पडू दिला नाही. इतक्या सर्व अधिवेशनातून विधायक व सघटनात्मक असे काही कार्य निष्पन्न होऊ शकलें नाही, याचा दोष सेक्रेटरी बरवे याच्याकडे येत नाही. आमच्यातल्या नाट्यव्यवसायी लोकामध्ये वकूब कमी, दानत त्याहून कमी आणि दूरदर्शिता जवळजवळ शून्य. तेव्हा आयत्या निर्माण करून ठेवलेल्या या सस्थारूपी साधनाचा ते काही उपयोग करून घेऊं शकले नाहीत, याचा दोष बरवे याच्यासारख्या योजकाकडे येत नाही.

नाट्यशिक्षणाची जी योजना त्यानी नाशिक येथे असताना आखली होती तिलाच अधिक पद्धतशीर व रेखीव स्वरूप देऊन पुण्यास त्यानी 'नाट्यशाळा' या नावाने नाट्यशिक्षणाची सस्थाच स्थापन केली. 'नाट्यशाळे'त कित्येक विद्यार्थी चागले शिकून तयार झाले. श्री. गणपतराव बोडस (धाकटे), श्री. माधवराव टिपणीस, श्री. द. पा. पाठारे या नटाचा बरव्याचे यशस्वी विद्यार्थी या नात्याने उल्लेख करता येईल. यापैकी श्री. पाठारे यानी कृतज्ञताबुद्धीने बरव्याच्या पडत्या काळात गुरुदक्षिणा म्हणून ४०० रु. पाठवून मोठीच मदत केली. नाट्यशाळेचा पद्धतशीर अभ्यासक्रम त्यानी तयार केला असून त्याकरिता क्रमिक पुस्तकेही रचिलीं होतीं. पहिले पुस्तक 'सुलभ व्यायाम' म्हणून असून दुसरे 'स्वरसाधन' हे आहे. ही दोन्ही छापून प्रसिद्ध झालेलीं असून 'वक्तृत्वाचीं साधनें,' 'नेपथ्य' आणि 'रगसूचना अथवा सामान्य नाट्यशिक्षा' हीं तीन लिहून तयार आहेत. नटाच्या प्रत्यक्ष प्रायोगिक शिक्षणाला आधारभूत व्हावींत या उद्देशाने ही छोट्या पत्रकाच्या स्वरूपात काढलेलीं

आहेत; शिक्षणाच्या दृष्टीने त्याची योग्यता कोणच्याही रीतीने कमी नाही. नाट्यशाळेचा हा उद्योग बऱ्याच वर्षांपासून कमी अधिक प्रमाणात चालू असला तरी त्याला सार्वजनिक स्वरूप देऊन त्याची विशेष प्रसिद्धि करून त्यासाठी फंड जमविण्याचा प्रयत्न त्यानी १९१९ सालीं सुरू केला. त्याच साली त्यानी तीन चार प्रसिद्धिपत्रके काढिलीं व इतर रीतीनीही–वार्षिकोत्सव वगैरे करून–शाळेचे कार्य लोकांच्या डोळ्यासमोर आणण्याचा प्रयत्न चालविला. १९२० सालच्या दसऱ्याच्या दिवशी श्री. कृ. प्र. खाडिलकर याच्या अध्यक्षतेखाली उत्सव केला त्या वेळी खाडिलकरानी नाट्यशाळेला 'राष्ट्रीय' असे उपपद जोडले.

नाटके लिहिण्याचा त्याचा उद्योग तर अगदी अखेरपर्यंत सुरू होता. 'शिवसूर्यग्रहण' अथवा 'राष्ट्रसिंह' हे नाटक १९२१साली लोकमान्य नाटक कंपनीने बसविले. कित्येक नाटकें अर्धवट लिहून झाली असून ती पुरीं होण्याची वाट पाहत होती. स० परशुराम, स० शर्मिष्ठा इ० दोनतीन अपूर्ण नाटकाच्या वह्या त्याच्या हस्तलिखिताच्या बाडात अद्याप विद्यमान आहेत.

परंतु ही सर्व अखेरची धडपड होती. अनेक आघातानी जर्जर झालेल्या त्याच्या देहात आता त्राण उरले नव्हते. कौटुंबिक दुःखाचा पहिला धक्का त्यास १९०४ सालीच त्याची अल्पवयी मुलगी मनुताई इचा नवरा वारला तेव्हा बसला. त्यानतर ४–५ वर्षांनी स्वतः स्थापलेला व उजागरीस आणलेला छापखाना सोडण्याचा प्रसग आला तेव्हाही त्याचे अतःकरण तिळतिळ तुटले. परतु हे दोन्ही प्रसग सहन करण्याची त्याच्या अंगात ताकद होती. पुढे १९१६ साली पत्नी व पुत्र याच्या वियोगाचा भयंकर प्रसंग कोसळला. तो तडाखा मात्र त्यास सहन झाला नाही. पुढे सैतान नाटकाच्या बाबतीत फसगत होण्याचा प्रसंग आला, त्याने त्याची प्रकृति आणखी ढासळली. आपल्या हातून पुढे काम होणार नाही असे जाणून त्यानी भारत नाट्यसमाजाच्या सेक्रेटरीशिपचा राजीनामा चिंतामणराव वैद्य याच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या पधराव्या नाट्यसंमेलनात देऊन टाकला (१९१९) आणि स्वतः अत्यंत प्रेमाने वाढविलेल्या त्या संस्थेचा निरोप घेतला. पुढे नाट्यशाळा हेच आपले प्रमुख जीवनकार्य समजून तिच्यासाठी ते झटत होते, परतु त्याच्या

शरीरयष्टीने फार काळ दम धरला नाही. १९२० सालीं ते बरेच आजारी होते. परंतु त्यातून थोडेबहुत सावरले. पुढे १९२३ साल त्याचे बहुतेक आजारीपणातच गेले. हळूहळू अशक्त होत जात त्यांचा प्राणदीप आश्विन वद्य २ शके १८४५, २६ आक्टोबर १९२३ रोजीं मालवला.

जन्मापासून अखेरपर्यंत अत्यंत जिगजिर्गीत, कष्टात व आपत्तींत दिवस गेले असूनही त्यांनी करून ठेवलेले कार्य पाहून मन स्तिमित होते. छापखाने काढले, वर्तमानपत्रें काढलीं, मासिकें चालविलीं, कादंबऱ्या, गोष्टी, निबंध व काव्ये लिहिलीं. इतकेंच एखाद्याने केले असतें तर त्यास अलौकिक उद्योगी म्हणून कोणीही म्हटलें असते. परंतु याशिवाय त्यानी एका विशिष्ट क्षेत्रांत एवढा प्रचंड उद्योग केला की त्याच्यापुढे हें बाकीचे कार्य अवातर व चिल्लर स्वरूपाचे ठरले ! आपल्या आयुष्याकरिता ठरवून घेतलेल्या ह्या विशिष्ट क्षेत्रात, म्हणजे नाटयाच्या क्षेत्रात, त्यानी जी कामगिरी केली ती निरुपम आहे. त्यातही, त्यानी खूपशीं नाटकें लिहिलीं यात त्याच्या कामगिरीचें अलौकिकत्व नाही. यापेक्षा संख्येनें किंवा गुणानी अधिक नाटकें लिहिणारे नाटककार मराठींत कित्येक झाले आहेत. बरव्याची मुख्य कामगिरी ती नव्हे. तर नाट्यकलेचे संघटन करून तिला उन्नतीला नेऊ शकतील अशा संस्था स्थापून तिला वर खेचण्याचा त्यानी प्रयत्न केला, हे त्याचे खरें महत्त्वाचे व अलौकिक असे जीवितकार्य आहे. त्यांनी दर्शविलेल्या मार्गाने जर आमची नाट्यकला गेली असती तर बोलपटापुढे तिला आज असें गर्भगळीत होऊन बसण्याची पाळी कदापि आली नसती. आम्ही आमच्या कमकुवतपणामुळे त्याचा प्रयत्न यशस्वी होऊं दिला नाही. त्यामुळे, जी परिस्थिति उद्भवेल तिच्या आहारीं जाण्याइतकी आमची नाट्यकला असहाय होऊन बसली. बरव्याच्या जीवितकार्याची जरुरी खरोखरी आजही भासमान होते आहे, इतके ते मूल्यवान होते. पण लक्षांत कोण घेतो !

# ४

# खाडिलकरांची साहित्यक्षेत्रांतील तपश्चर्या

[ 'विहंगम' जानेवारी १९३४ ]



१

नागपुरास भरणाऱ्या साहित्यसंमेलनाच्या पूर्वतयारीमध्ये कोणती एक गोष्ट समुचित झाली असेल तर ती श्री. खाडिलकराची अध्यक्षपदीं निवडणूक ही होय. खरोखर पाहिले असतां पाच सात वर्षांपूर्वीच त्यांची निवडणूक अध्यक्षपदी करून संमेलनाने आपली गुणग्राहकता व औचित्यबुद्धि प्रकट करावयास पाहिजे होती. असे करण्यात खाडिलकराचा बहुमान होणारा नसून समेलनासच आपले अवश्य कर्तव्य केल्याचे समाधान वाटावे अशीच खरोखर स्थिति होती व आहे. परतु समेलन भरविण्याची आमची कार्यपद्धति, तत्संबधींचे नियम अगर नियमाचे अभाव इतके बहारीचे आहेत की त्यात वाटेल तीं माणसें वाटेल त्या पदीं वाटेल त्या उपायानी जाऊन बसावीं ! खऱ्या लोकमताला किंवा योग्यतेला त्यात वाव मिळावयाचा म्हणजे कपिलाषष्ठीचाच योग ! कारण हे साहित्यसमेलनाचे कार्य ! यात साहित्यसेवक म्हणविणारे वऱ्हाडयासारखे पुढे येऊन मिरविण्याची हौस फेडून घेणार ! अर्थात् जो पुढे येईल तो साहित्य-सेवक; आणि जो साहित्यसेवक म्हटला गेला तो शहाणपणाचा गड्डाच ! असे तीन शहाणे मिळाले आणि त्यानी 'त्रयाणाम् धूर्तानाम्' या आर्यसंस्कृतीने पुनीत केलेल्या प्राचीन गोष्टीचे अनुकरण केले की झालेच साहित्यसमेलन सिद्ध ! त्यातून प्राचीन आर्यसंस्कृतीचा पाठपुरावा करण्यास अर्वाचीन मतप्रसाराचे जबरदस्त साधन जे वर्तमानपत्र ते उपलब्ध असले की मग काय, मनात आणूं ते धोरण व बाधूं ते तोरण !

श्री. खाडिलकराच्या निवडणुकीच्या आड येण्यास अशा तऱ्हेची काही परिस्थिति पूर्वी कधी कारणीभूत झाली नसेलच असे म्हणवत नाही. परतु याहीपेक्षा स्थलदोष हा त्याच्या निवडणुकीला अधिक बाधला असावा असे दिसते. आमच्या साहित्यसंमेलनाचा आणि संस्थानी मुल-खाचा ऋणानुबंध काही विशेष आहे ! महाराष्ट्रीय साहित्यसेवक संस्थानी पाहुणचारावर विशेष लुब्ध असतात आणि संमेलनाच्या मंडपापेक्षा भोजनाच्या मंडपाकडेच, विशेषतः मेजवान्याच्या प्रसगी, साहित्यसेव-

कांचा मेळा अधिक आस्थेने वळत असतो, असें काही माझें म्हणणें नाही ! परंतु त्याबरोबरच हेही खरे की संमेलनाने आजावर खालसातीपेक्षा संस्थानाच्या राजधान्याच अधिक वेळा पाहिल्या आहेत ! लेखी पुराव्याने आकड्यानिशीं ही गोष्ट सिद्ध होत असल्याकारणाने ती कबूल केल्याखेरीज गत्यंतर नाही. इ. स. १९२६ सालापासून संमेलन हें नियमाने दरसाल भरूं लागले तेव्हापासून आजवर झालेल्या सात संमेलनापैकी फक्त तीन संमेलने (मुंबई, पुणे व बेळगाव) खालसातींत भरली व चार (ग्वालेर, मडगाव, दक्षिण हैद्राबाद व कोल्हापूर) संस्थानात अगर संस्थानवजा मुलखात भरलीं. खालसातील महाराष्ट्र अंदाजे दीड कोटींचा आहे, त्यात फक्त तीन संमेलने भरतात व अर्ध्या कोटीच्या संस्थानी महाराष्ट्रात समेलन चारदा जाऊन येते ! संस्थानी मुलखाकडेच संमेलनाचे मुख वळविण्यामध्ये धनप्राप्तीचे आमिष कदाचित् साहित्य परिषदेच्या चालकाच्या दृष्टीपुढे (कारण समेलन कुठे न्यावयाचे हे ठरविण्यामध्ये परिषदेच्या चालकाचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष बराच हात असतो) वागत असेल आणि परिषदेला पैशाची जी चणचण भासत आहे ती निवारण करण्याच्या दृष्टीने त्यानी स्वीकारलेले हे धोरण योग्यही असेल. परतु तेजस्वी, धीरोदात्त व मानधन अशा वाग्वीराचा सन्मान करून धन्य व्हावे ही जी हृद्य आकाक्षा समेलनात जमणाऱ्या प्रस्तुत लेखकासारख्या सर्वसामान्य बहुसंख्य जनाच्या अतःकरणामध्ये वसत असते ती मात्र या धोरणामुळे कित्येक वेळा सफल होऊं शकत नाही. वामनराव जोशासारख्या सोज्वळ अध्यक्षानिशी संमेलन भरविणे हें सुद्धा जेथे मोठे दिव्यच ठरते व डॉ. केतकर हेमुद्दा जेथील वातावरणात तापदायक ठरतात तेथे खाडिलकराचे नुसते नाव उच्चारण्यास तरी कोण धजणार ? शिवरामपंत परांजप्यांचें नांवही पूर्वी अशाच कारणानी मागे पडत होते. परंतु १९२९ सालीं बेळगावकरानी बहादुरी करून त्यास अध्यक्ष करण्याचा पण शेवटास नेला. त्यानंतर चार वर्षांनी पुनः संमेलन खालसातींत येताच लगेच परांजप्यासारख्याच तेजस्वी व अलौकिक यशस्वी अशा खाडिलकरास अध्यक्ष निवडण्यांत आलें. यावरून संस्थानी वातावरणांत वाङ्मयप्रेमी लोकाच्या मनोभाव-

नांचा सुद्धा कसा कोंडमारा होतो आणि खालसार्तीत येतांच इतर बाबतींत कारवाया कितीही झाल्या तरी अध्यक्षपदी समुचित पुरुषाचीच कशी योजना होते हे उघड दिसते. पण लक्षात कोण घेतो ?

कलाविलासाच्या मनोरम कल्पनामध्येच गुंग असणाऱ्या अलीकडच्या लेखकाना खाडिलकरानी संमेलनाचे अध्यक्षपद स्वीकारणे हें विश्वामित्रासारख्या रुक्ष तपस्व्याने मेनकेच्या प्रेमाचा स्वीकार करण्यासारखेच विसगत व चमत्कारिक वाटले असेल. परंतु प्रस्तुत लेखकास तर याच कारणास्तव अध्यक्षस्थानीं त्याची योजना होणे व या प्रसगाने तरी त्याचा धीरोदात्त आदर्श आजकालच्या लोकाच्या डोळयापुढे प्रामुख्याने येणे अत्यत इष्ट व अवश्य वाटते. उदात्त ध्येयाने प्रेरित होऊन संकटानी भरलेल्या देशकार्याच्या अथाग दर्यामध्ये आपल्या जीवितनौका बेफिकीरपणे झुगारून देणारे त्यागिवर जे चिपळूणकर, टिळक व आगरकर त्याचेच सच्चे चेले खाडिलकर होत. त्याचा आदर्श कोणत्याही काळी डोळयापुढे ठेवण्यास योग्यच ठरेल. मग क्षुद्र धडपडींत व स्वार्थी कारवायात गुतलेल्या व नेभळटपणास कलाविलासाचे नाव देऊन स्ववचना करू पाहणाऱ्या आजकालच्या वाङ्मयीन पिढीस तर अशा मानधन पुरुषाचा आदर्श पुढे ठेवणे किती अवश्य आहे हे काय सागावयास पाहिजे ? टिळकासारखे त्यागिश्रेष्ठ व धैर्यमेरु तर राहोतच परतु खाडिलकरासारखे त्यागिवर व धैर्यसह्याद्रि तरी महाराष्ट्रात आज कितपत निपजत आहेत याची चौकशी केली असता निराशाच पदरी येते. खाडिलकरासारखे वीरवृत्तीचे, त्यागबुद्धीचे व उच्च प्रतिभेचे तरुण १८९६ सालच्या सुमारास चार पाच पुढे आले असतील तर आज चाळीस वर्षांनंतर दरसाल चाळीस पन्नास तरुण अशा वृत्तीचे राष्ट्रास मिळत जावयास पाहिजे होते. परंतु ती वीरवृत्ति, ती निष्ठा, तो निर्वाणीचा निश्चय कोठे आहे–आता कोठे पाहावयास मिळेल–म्हणून निराशेने पिशासारखें धुंडाळण्याचा आज प्रसंग आला आहे.

आणि खरोखरच खाडिलकराचें चरित्र व चारित्र्य धीरोदात्त कोटींतील आहे. ऐन तारुण्यात सुळावरची पोळी पतकरून टिळकाना जाऊन मिळण्यात जी त्यागवृत्ति त्यांनी प्रकट केली तिला स्वार्थवृत्तीचे

यत्किंचितही लांछन आजवर त्यानी लागूं दिलेलें नाही ही गोष्ट कांहीं सामान्य नव्हे. नाही म्हणावयास नाटयरचना करून त्यानी हजारो रुपये कमाविले; परंतु त्याच्या पूर्णचंद्रोपम अशा त्यागी जीवनास लागलेले हे धनोत्पादनाचे लाछन इतके हृद्य व भूषणास्पद आहे की आज त्याना संमेलनाचे अध्यक्षपद मिळवून देण्यास पुष्कळ अंशीं तेच कारणीभूत झालेले आहे. ह्याची वीरवृत्ति व देशभक्ति याच्याविषयी येथे काहीएक लिहिण्याचे कारणच नाही. त्याच्या लिखाणातील शब्दान्‌शब्दातून ती वर उसळते आहे की काय असा भास होतो. आपल्या बुद्धीस जो मार्ग पटला तो कितीही कष्टाचा व बिकट असला तरी पतकरण्याची निश्चयी वृत्ति आणि पतकरल्यानतर तो हमखास यशस्वी करून दाखविण्याची कर्तबगारी हेही त्याचे गुण 'नव्या काळा'च्या स्थापनेच्या प्रसगीं उत्कृष्ट-रीतीने निदर्शनास आले आहेत. प्रसिद्धिविमुखता हा एक त्याचा गुण सध्याच्या काळी अगदी अलौकिक व सर्वथैव दुर्मिळ असाच वाटण्या-जोगा आहे. ह्याच्या साठाव्या वाढदिवसाप्रीत्यर्थ इतरानी सभा कराव्या, परंतु खुद्द ह्याच्या तोंडून अगर वृत्तपत्रातून अवाक्षरानेही त्याचा उल्लेख व्हावयाचा नाही. अनेक लोकानी अनेक कामाकरिता येऊन त्याची मदत घ्यावी, परतु याचे नाव कोठे अध्यक्ष म्हणून, कोठे सल्लागार म्हणून किंवा कोठे प्रस्तावनालेखक म्हणून झळकले आहे असे कधीही व्हावयाचे नाही. यानी कोठे संस्था स्थापिलेल्या नाहीत, कोठे दौरे काढलेले (टिळकाच्या आमदानीनंतर) नाहीत; फारशीं कोठे भाषणे केलेली नाहीत किंवा स्वतःच्या वाङ्मयाच्या प्रसारासाठी खटपटी केल्या नाहीत. परंतु गेल्या वर्षी 'सकाळ'ने वाचकाची मते मागविलीं असता प्रचड व अफाट बहुमताने महाराष्ट्रीय वाचकानी ह्या कविकृष्णाला सर्वश्रेष्ठ नाटककार म्हणून गौरविले आहे. मराठींतील श्रेष्ठ वृत्तपत्रकाराच्या गणनेत याचे नाव कोणी वगळू शकणार नाही. त्याचप्रमाणे महाराष्ट्रीय देशभक्ताग्रणीच्या नामोच्चारात याचा समावेश झाल्याशिवाय त्यास पूर्तता येणे शक्य नाही. याच्यावर कोणी टीका केली असता तीस थोडेबहुत तरी उत्तर देण्याची प्रवृत्ति याच्यात प्रारंभीं वसत असे असे त्याच्या 'सवाई माधवरावाच्या मृत्यू'मधील प्रस्तावनेवरून दिसून येते. परंतु ही प्रवृत्ति लवकरच मावळली. पुढे असा

प्रकार सुरू झाला की कोणी कोठेही कशीही यांच्यावर टीका करो, निंदेचा व शिव्याशापाचा वर्षाव याच्यावर करो—याच्याकडून त्यास उत्तर म्हणून मिळावयाचे नाही. वृत्तपत्रातले तत्त्वप्रधान राजकीय वाद अर्थातच निराळे; त्याशिवाय खाडिलकरानी आपल्यावर केलेल्या टीकेला वैयक्तिक स्वरूपाचे दिलेले उत्तर, उपर्युक्त अपवादाशिवाय, त्याच्या लिखाणामध्ये शोधूनही सापडावयाचेच नाही असे मला तरी खास वाटते. खाडिलकराची ही एकच गोष्ट इतकी अलौकिक आहे की मराठी वाङ्मयाच्या क्षेत्रात असा दुसरा कोणताही पुरुष आढळावयाचाच नाही असे निभ्रांत म्हणता येईल. आपल्यावर कोणी कसाही कितीही टीकेचा, निंदेचा वर्षाव करो, त्यास उत्तर म्हणून द्यावयाचे नाही, ही वाङ्मयक्षेत्रातील स्थितप्रज्ञ वृत्तीच होय. वैयक्तिक टीकाचा व परस्पर निंदेचा बुजबुजाट झाला आहे, अशा सध्याच्या काळात अशा स्थितप्रज्ञ व अविकार्य पुरुषाचाच आदर्श लोकाच्या डोळयापुढे येणे इष्ट व अवश्य होते. तसा तो या प्रसंगाने येत आहे हे आपण आपले मोठे भाग्यच समजले पाहिजे.

अनेक दृष्टींनी अलौकिक असलेल्या या पुरुषाचे चारित्र्य याप्रमाणे उग्ररमणीय व प्रसिद्धिविमुखतेने लोभनीय वाटणारे असे आहे. त्याच्या चरित्राचे अवलोकन केले म्हणजे असे वाटते की अशा तऱ्हेच्या या लोक-विलक्षण जीवनक्रमाच्या बुडाशीं खबीर व अढळ असे काही तरी तत्त्वज्ञान असले पाहिजे. धनाचा हव्यास, प्रसिद्धीची व कीर्तीची लालसा, उत्तरास प्रत्युत्तर देण्याची खुमखूम—या गोष्टी लहानापासून मोठ्यापर्यंत सर्वांच्याच जीवनात आढळून येतात. या गोष्टींबद्दलचे आकर्षण इतके जबरदस्त असते की मोठमोठ्यासही ते टाळता येत नाही. अशा स्थितीत जो मनुष्य लीलया ते टाळू शकतो त्याच्या अंगीं काही विलक्षण प्रकारचे धैर्य व

आत्मन्येवात्मना तुष्टः ।

अशा प्रकारची वृत्ति असली पाहिजे. असे धैर्य व अशी वृत्ति मनुष्याच्या अंगीं केव्हा बाणेल ? जेव्हा जीवनविषयक काही तत्त्वज्ञानाचा अढळ आधार त्यास असेल तेव्हाच. जन्मस्वभावच अशी वृत्ति निपजविण्यास काही अंशीं कारणीभूत झाला असेल हे खरें. परंतु जन्मस्वभावानुसार

उत्पन्न होणाऱ्या वृत्ति डळमळीत असतात; परिस्थितीच्या आकर्षणाने त्याचा जोर कमी होऊन मनुष्य तद्विरुद्ध कर्मे पुष्कळ वेळा करितो. खाडिलकराच्या अंगीं या बाबतींविषयी जी खंबीर उदासीनता व पराङ्मुखता दिसून येते तिला कारण त्यानी अंगीकारिलेले गंभीर, उदात्त व प्रखर असे तत्त्वज्ञानच होय; केवळ जन्मस्वभाव नव्हे.

हें तत्त्वज्ञान काय आहे, कसें आहे, ते आपणांस खाडिलकराच्या वाङ्मयामध्ये दिसून येते. त्याचे विराट्स्वरूपदर्शन त्याच्या लेखनामधून सर्वत्र आपणास होत असतें. जसे त्याचे जीवित तसेच त्यांचे वाङ्मय. किंबहुना त्याचे वाङ्मय हे त्याच्या जीविताचेच एक अंग असल्यामुळे तेंही त्याच्या जीविताप्रमाणेच उग्ररमणीय, प्रसिद्धिविमुख, तत्त्वनिष्ठ व क्रियावत आहे. 'केसरीं'तील अगर 'नव्या काळा'तील लेख असो अगर नाटकांतील संवाद असो, कोणत्या तरी जीवनविषयक तत्त्वज्ञानाचा आधार दिल्याशिवाय ते कोणत्याही विषयाचे प्रतिपादन करणारच नाहीत. त्याच्या साहित्यपरिषदेसच अनुलक्षून लिहिलेल्या 'केसरी'तील 'मराठी भाषेचा उत्सव' या लेखातील काही विधानांचा गोषवारा श्री. पोतदारानी जुलै १९३२च्या 'रत्नाकरा'मधील आपल्या लेखात दिला होता तो देखील श्री. खाडिलकराच्या तत्त्वप्रधान प्रतिपादनशैलीची साक्ष देण्यास पुरेसा आहे--' "एकेकटयाची तपश्चर्या गुणसंवर्धक होते; परंतु समूहाची तपश्चर्या शक्तिदायक असते; म्हणून समूह म्हणजेच अधिकार, समूह म्हणजेच वैभव व समूह म्हणजेच लक्ष्मी "--असा ओजस्वी सिद्धात खाडिलकरानी विशद केला.' श्री. पोतदाराच्या गोषवाऱ्यामधूनच दिलेलीं हीं दोन तीन वाक्ये किती अर्थगर्भ आहेत! सामाजिक जीवनातील अत्यंत महत्त्वाचीं तत्त्वे किती सुंदर व वेचक शब्दानी येथे वर्णन केलीं आहेत! साहित्य परिषदेच्या स्थापनेसारखी साधी गोष्ट प्रतिपादन करताना सुद्धा ती त्यानी अशी सुंदर व तेजस्वी तत्त्वांच्या अवगुंठनांतून प्रतिपादिली आहे!

परंतु तात्त्विक सिद्धातांच्या बैठकीवर आरूढ होऊन कोणत्याही विषयाचे ओजस्वी रीतीने प्रतिपादन करणारे त्याचे ते सुंदर लेख आज कोठे उपलब्ध आहेत? 'केसरीं'तील त्यांची ओजस्वी वाणी तर केवळ

स्मृतिशेष झाली आहे. आणि 'लोकमान्य' 'नवाकाळ' या दैनिकांच्या भाऱ्यात गडप झालेले लेख तरी आता कशाने बाहेर निघणार आहेत ? त्याच्या चाहत्यापैकी कोणातरी साक्षेपी गृहस्थाने बरेच कष्ट करण्यास तयार होऊन त्याच्या लेखाचा तलास लाविला पाहिजे व निदान त्यातील वेचक लेख तरी निवडून काढून ते एकत्र पुस्तकरूपाने प्रसिद्ध केले पाहिजेत. मराठी भाषेच्या वैभवरक्षणाच्या दृष्टीने ही कामगिरी अवश्य झाली पाहिजे. खाडिलकर हे प्रसिद्धिविमुख असले म्हणून त्याचे वाङ्मय मराठी भाषेच्या सुपुत्रानीही अप्रसिद्धच ठेवून अंधारात नष्ट होऊं द्यावे असे मुळीच नाही. उलट असे करणे खास कृतघ्नपणाचे ठरेल. त्याच्या प्रसिद्धिविमुखतेमुळे तर इतरावर त्याचे लिखाण बचावण्याची जबाबदारी अधिकच तीव्रतेने येऊन पडते.

त्याची नाटयकृति मात्र सुदैवाने सर्व उपलब्ध आहे. नवीन नवीन नाटयप्रकारासाठी हपापलेल्या व आपल्या मनाच्या इच्छेचे प्रतिबिंब सभोवतालच्या परिस्थितीत पाहणाऱ्या कित्येक आधुनिक रसिकाना जरी खाडिलकराचे दिवस आता भरले असे वाटत असले तरी खाडिलकर हे अझूनही रंगभूमीचे अनभिषिक्त सम्राट आहेत असे विधान केल्यास तें वस्तुस्थितीने बाधित होण्याचा संभव नाही. त्याना मागे सारून आपल्या प्रतापाची प्रभा सर्वत्र पसरविणारा असा नाटककार अझून नाटयक्षितिजावर यावयाचा आहे. नवे नवे नाटयप्रकार किंवा नवे प्रतापी नाटककार उदयास येऊ नयेत असे नाही. परंतु नवी चीज ही केवळ नवी म्हणूनच जर तिचा–विशेषतः कंपूशाहीच्या जोरावर–बोलबाला होऊं लागला तर जुनी वस्तु ही केवळ पुराणी म्हणूनच तिचा उदो उदो करण्याची प्रवृत्तीही उत्पन्न होऊ लागेल हें लक्षात ठेवले पाहिजे. सुधारकानी एकूणएक जुन्या चालीस नावे ठेवून नवीन प्रकाराची तरफदारी करण्याचा विडा उचलला तेव्हा दुर्धारकानीही तोडीस तोड म्हणून प्रत्येक जुन्या चालीची तळी उचलण्याचा चंग बाधला, हा पूर्वीच्या सामाजिक चळवळीचा इतिहास प्रसिद्धच आहे. वस्तुतः खाडिलकर आता लेखननिवृत्त झाल्यासारखेच आहेत. त्याच्यासारख्याच प्रतिभाशाली अशा एखाद्या नव्या नाटककाराची अपेक्षा आमची रंगभूमि

आज करीत आहे यात कांही शंका नाही. असे एक वा अनेक नाटककार उत्पन्न झाले–किंवा सध्या रंगभूमीत पदार्पण केलेल्यापैकीच कोणी पुढे आले–तरी आज पंचवीस तीस वर्षे ह्या एका पुरुषाने रंगभूमीवर अद्वितीय प्रभुत्व गाजवून 'यशःश्री'ला 'पायिची दासी' बनविले हो गोष्ट नाशाबीत होऊ शकणार नाही; आणि मराठी वाङ्मयास ललामभूत झालेल्या त्याच्या तेजस्वी नाट्यरत्नाचे तेज कोणी लपवू शकणार नाही.

खाडिलकराची नाट्यकृतीही त्याच्या इतर लेखनाप्रमाणे तत्त्वविचारपरिपूर्ण आहे. आपले सर्व सामाजिक व राजकीय तत्त्वज्ञान त्यानी आपल्या नाटकात ओतले आहे. कोणत्याही विषयाचे किंवा मुद्द्याचे प्रतिपादन करावयाचे असले तरी त्यातून कोणत्या तरी व्यापक तात्त्विक सिद्धाताचे उद्भावन करून त्या सिद्धाताच्या बैठकीवर आपल्या प्रतिपादनाची उभारणी करावयाची ही जी त्याची विशिष्ट पद्धत ती त्याच्या नाटकातही पदोपदीं दिसून येते. एक लहानसेच परंतु सुदर उदाहरण 'सत्त्वपरीक्षा' नाटकातून येथे देतो.

सुवर्णदासीने लुटलेल्या फराळाच्या दुकानातील लाडवाची रस्तोरस्तीं नुसती नासाडी चालली असता रोहिदासाच्या तोंडात एक कणही गेला नाही हे पाहून तारामती शोक करीत आहे. त्यावर शहाणा व मानी रोहिदास म्हणतो:—

"आई, आज मीं म्हटले का ग तुला, मला भूक लागली आहे म्हणून? मग तू का रडतीस!"

त्यावर तारामती म्हणते, "—बाळा तूं म्हटलें नाहीस म्हणूनच मी रडते आहे. बाळा, अन्नाची चव—खाऊचा हव्यास मनुष्याच्या जिभेला आमरण असतो, आणि शरीरपोषणाकरिता ह्या चवीच्या सुखाची जोड मानवकुडीला अवश्य आहे. मरेतों अन्नाची इच्छा जिवत असली तरी त्या इच्छेची खरी मौज व जरूरी बाळपणींच असते. ऐहिकाच्या पलीकडे ज्याची दृष्टि गेली नाही, असला म्हातारा जसा समाजाला त्रासदायक होतो, विषयात आनंद न मानणारा तरुण जसा समाजाला सौभाग्यदायक नसतो,

त्याचप्रमाणे लहानपणींच जिभेला दाबांत ठेवणारा बालक समाज खुरटा करतो. बाळा, तुझ्या बाल्यावस्थेंत विसंगत वर्तन तूं माझ्याकरिता करितो आहेस.—माझ्या जिवासभोंवारच्या आतडीला पीळ कसा पडणार नाही ?”

हें तारामतीचें भाषण रसाच्या दृष्टीने जितकें करुण व हृदयद्रावक तितकेंच विचाराच्या दृष्टीने गभीर व उदात्त आहे. रोहिदासाच्या उपाशी राहण्यावरून समाजातील निरनिराळ्या अवस्थाच्या लोकाची प्रवृत्ति कशी असावयास पाहिजे याविषयींचे जे तात्त्विक सिद्धान्त येथे प्रदर्शित केले आहेत ते किती अनमोल आहेत ! असे तत्त्वसिद्धान्त इतक्या सहजसुंदर रीतीने प्रदर्शित करण्यात येतात की वाचकास वाचीत जाताना ते अगदी स्वाभाविक व अपरिहार्य असे भासतात. वाचकास एखादे वेळेस वाटते की असे सिद्धात काय, आपणही सहज वर्णन करूं शकू. परतु ही गोष्ट वाटते तितकी सोपी नसून अशा मनोज्ञ रीतीने व्यापक, उदात्त व भव्य तत्त्वाचे हातोहात प्रणयन करणारा असा खाडिलकर हा एकच एक लेखक व नाटककार आजवर मराठींत निपजला आहे, हे सत्य मराठी वाङ्मयाचे सूक्ष्म अवलोकन केल्यास कोणासही पटणारे आहे. इतर लेखकही विशिष्ट वर्ण्य वस्तूवरून सामान्य सिद्धान्त निष्कासित करतात, परतु ही त्याची तत्त्वदर्शी वृत्ति मधून मधून किरकोळ रीतीने प्रकट होते आणि खाडिलकराचे संबंध लेखचे लेख अगर नाटकेचीं नाटकें त्याच्या तत्त्वज्ञानाचीं वाहक बनलेलीं आहेत, हा मोठा फरक लक्षात ठेवण्याजोगा आहे.

वरील वर्णनावरून कोणाचा जर असा समज होईल, की तत्त्वज्ञानाचा अवजड बोजा लादल्यामुळे खाडिलकराचीं नाटकें नुसतीं भारवाहक व रुक्ष झालीं आहेत, तर तो मुळीच यथार्थ ठरणार नाही. खाडिलकराच्या नाट्यकृतींत तत्त्वज्ञान असूनही त्यात विलक्षण जादू व मोहनी भरलेली आहे ही हजारों महाराष्ट्रवाचकांच्या व प्रेक्षकाच्या अनुभवाचीच गोष्ट आहे. याचे कारण हेंच की त्यांच्या नाट्यकृतीला तत्त्वज्ञान हे भारभूत झालेले नसून भूषणभूत झालेलें आहे. कथानक पौराणिक असो वा ऐतिहासिक असो, त्यावर कोणत्या तत्त्वविचारांचा

छाप कसा बसवावयाचा, कथानक प्रत्यक्ष रीतीने तत्त्वप्रतिपादक करावयाचें, का आपलीं इष्ट तत्त्वे त्यातून अप्रत्यक्ष रीतीने सूचित करावयाचीं, इत्यादि सर्व गोष्टी ठरविण्यामध्ये खाडिलकराचीं कुशलता इतकी श्रेष्ठ दर्जाची दिसून येते की या बाबतींत त्याच्या प्रतिभेला अशिक्षितपटुत्वाचा वरच मिळाला आहे की काय असे वाटते.

अशा रीतीने ज्या नाट्यकृतींमधून खाडिलकरांनी आपले तत्त्वज्ञान इतक्या सुंदर रीतीने गोवले आहे, त्या कलेच्या दृष्टीनेही इतक्या सुंदर आहेत की त्याच्यातील तत्त्वविचाराविषयी फारसे प्रेम न बाळगणारा रसिक देखील त्याच्या कलासौंदर्यास खासच मान डोलवील. नाट्यकलेचे रहस्य खरोखर खाडिलकरास जसे अवगत झाले आहे तसे फारच थोडयास झाले असेल. खाडिलकर हे अप्रतिम यशस्वी नाटककार जे झाले आहेत ते त्याना नाट्यकला वश आहे, या कारणामुळेच होय. त्याच्या तत्त्वज्ञानामुळे किंवा–कित्येक जण म्हणतात त्याप्रमाणे–त्याच्या राजकीय क्षेत्रातील पुढारीपणामुळे मुळीच नव्हे. कित्येकास असे वाटते की त्याच्या नाट्यकृतींत प्रचलित राजकीय प्रश्नाचे जे प्रतिबिंब पडलेले असते त्यामुळेच नाटककार या नात्याने त्यास इतके यश मिळाले आहे. परंतु ही कारणमीमासा भ्रामक आहे. प्रचलित राजकीय प्रश्नाचे प्रतिबिंब त्याच्या नाटकात पडलेले असते ही पुष्कळ अंशाने त्याच्या प्रतिपक्षीयानी अगर विघ्नसतोषी लोकानी उठविलेली हूल आहे. तिच्यात तथ्य कितीसे आहे हा मोठाच वादग्रस्त प्रश्न आहे. त्याचीं अतिशय लोकप्रिय झालेलीं नाटके–मानापमान, स्वयवर, द्रौपदी, काचनगडची मोहना, भाऊबंदकी, यात प्रचलित राजकीय प्रश्नाचा ठसा ठळक रीतीने उमटलेला दाखविता येणे दूरापास्त आहे. तेव्हा खाडिलकराच्या यशस्वितेचे खरे रहस्य हें नसून त्यानी नाट्यकलेचे खरे रहस्य ओळखले आहे हेच होय. ते कसे ते आपण थोडक्यात पाहूं.

नाट्यकलेच्या तंत्राच्या दृष्टीने विचार करूं जाता नाट्याचे दोन मुख्य प्रकार संभवतातः—१ ललित विनोदी नाटक ( Comedy ) २ गंभीर नाटक ( Serious Drama ). खाडिलकराचीं सर्व नाटके

(कदाचित् 'बायकांचे बंड' व 'मानापमान' खेरीजकरून) यापैकी दुसऱ्या प्रकारातच पडण्याजोगीं आहेत. तेव्हा त्याविषयी आपण विचार करूं.

गंभीर नाटकामध्ये–व ललितविनोदी नाटकामध्येसुद्धा–कथानकावर भिस्त विशेषशी कधीच नसते ही एक मोठी लक्षात ठेवण्याजोगी गोष्ट होय. कादंबरीमध्ये कथानक हे एक बरेच महत्त्वाचे अंग असते. परंतु या अंगाचे महत्त्व नाटकामध्ये पार उतरते. मोठे गुतागुतीचे व जाळीदार कथानक विणणारा गृहस्थ कुशल कथालेखक ठरेल, परतु नाटककारात त्याची पायरी लागलीच तर फारच कनिष्ठ स्थानीं लागेल. याचे कारण उघड आहे. नाटक हे केवळ सवादाने व्यक्त होणारे व प्रत्यक्ष प्रयोगरूपाने दाखविण्यात येणारे व्यक्तीच्या जीवनाचे चित्र होय. गुंतागुंतीचे, रहस्यमय व पल्लेदार कथानक केवळ संवादस्वरूपात साकल्याने वर्णन करणे अर्थातच कृत्रिमपणाचे, बेडौल व वाचकाच्या कल्पनेस फाजील ताण देणारे ठरते व डोळ्यापुढून झरझर धावत जाणाऱ्या प्रयोगामध्ये तर असले कथानक आकलन करणे हे महा बिकटच काम ठरते. अतिप्राचीन ग्रीक नाटककारापासून तों आजतागायत जे जे श्रेष्ठ नाटककार होऊन गेले त्यानी कथानकावर आपली बिलकुल भिस्त ठेवलेली दिसत नाही. पुष्कळशा विख्यात नाट्यप्रभूंनी आपल्या परमोज्ज्वल नाट्यकृतीकरिता पूर्वपरिचित कथानकेच घेतलेलीं आढळतात. यातील बीजही हेच आहे, की निवळ कथानक समजून घेण्यासाठी प्रेक्षकाच्या कल्पनेस यत्किंचितही श्रम पडू नये. इब्सेनच्या नाटकात कथानक बहुतेक पूर्वीच घडून आलेले असते व नाटकात मागून वाहत येत असलेल्या कथौघाचा प्रपात तेवढा दाखविलेला असतो. शॉ, बॅरी वगैरे कित्येक श्रेष्ठ नाटककाराच्या कृतींमध्ये पुष्कळ वेळा म्हणण्यासारखें कथानकच नसते. खाडिलकरानीही आपल्या नाटकासाठी अगदी सुटसुटीत, अल्प व पूर्वपरिचित अशीच कथानके घेतली आहेत, हे नाट्यकलेचे रहस्य त्यास पूर्णपणे आकलन झाले आहे, याचे अचूक निदर्शक होय.

नाटकात कथानकास महत्त्व असत नाही, तर व्यक्तींच्या जीवनातील प्रसगाना महत्त्व असते. अर्थात् स्वभाववैशिष्ट्याने युक्त अशा व्यक्तींच्या भव्य सुंदर प्रतिमा डोळ्यापुढे उभ्या करून त्या व्यक्तींच्या

जीवनातील महत्त्वाच्या, आणीबाणीच्या व निकराच्या अशा प्रसंगांचा चित्रपट परिणामकारक रीतीने प्रेक्षकांच्या मनावर ठसविणे व तद्द्वारा मानवी जीवनातील विचारणीय प्रश्नाकडे त्याचे चित्त वेधून घेणे, हेंच गंभीर नाट्यकृतीचे खरे कार्य असते. जगातील श्रेष्ठ नाटककारानी आपल्या श्रेष्ठ कलाकृतींच्या द्वारे हीच कामगिरी केली आहे. या कामगिरीचे विवेचनासाठी साहजिकच दोन भाग करता येतात. पहिला भाग, वैशिष्ट्यपूर्ण, जिवत व आपल्या विचारानी वा कृतींनी वाचकाचे मन वेधून घेणाऱ्या अशा व्यक्ति निर्माण करणे हा होय. अशा व्यक्ति निर्माण करण्याचे कौशल्य, म्हणजेच खरी प्रतिभा. ह्या व्यक्ति म्हणजे कृत्रिम रीतीने हालचाल करणारी कळसूत्री बाहुली किंवा विशिष्ट गुणावगुणाचे गठ्ठे असेच जर बनले तर नाटककाराचे कौशल्य ते काय? आपल्या निकटच्या माणसाविषयी वाटतो इतका जिव्हाळा प्रतिभाशाली नाटककाराने निर्मिलेल्या व्यक्तीविषयी वाटला पाहिजे, तरच तें खरे व्यक्तिनिर्माणकौशल्य.

हे व्यक्तिनिर्माणकौशल्य खाडिलकरास कितपत साधले आहे हे आजमावणे फारस अवघड नाही. जिव्हाळयाच्या व्यक्ति निर्माण केल्याशिवाय कोणचेही गभीर स्वरूपाचे नाटक यशस्वी होणे व चिरकाल टिकणेच शक्य नाही. अगदी प्रारंभी, तरुण वयात सुद्धा, व्यक्तिनिर्माणासबंधीच्याच प्रश्नानी खाडिलकराचे मन कसे व्यापले होते व नाटककाराचे खरे साध्य म्हणजे वैशिष्ट्यपूर्ण व्यक्ति निर्माण करणे हेच होय ही गोष्ट त्यास कशी पटली होती, हे त्याच्या 'सवाई माधवरावा'स लिहिलेल्या प्रस्तावनेवरून दिसून येते. आथेल्लो व हॅम्लेट याचा संयोग करून विचारवान् परंतु विकारवश असा एक नायक निर्माण करावा ही कल्पना त्याच्या मनात प्रथम प्रादुर्भूत झाली! इतर लेखक मोठ्या अट्टाहासाने कथानकाचे धागेदोरे जुळविण्यासाठी ज्या वयात परिश्रम करीत असतात त्या वयात खाडिलकराचे लक्ष व्यक्तिनिर्माणावर स्थिरपणाने केंद्रीभूत झालेले दिसावें, ही एकच गोष्ट त्याच्या उच्च प्रतिभेची साक्ष देते. दुसरी एक लक्षात ठेवण्याजोगी गोष्ट ही की नायक, नायिका, खलपुरुष, नायकाचे विरोधक वगैरे सर्व प्रकारच्या

व्यक्तींच्या निर्माणात खाडिलकरांचे सारखेंच कौशल्य दिसून येतें. सवाई माधवराव व केशवशास्त्री; कीचक, कंकभट व द्रौपदी; प्रतापराव व दौलतराव ही मित्राची जोडी; हरिश्चंद्र, विश्वामित्र व तारामती; कच, देवयानी व शुक्राचार्य; इत्यादि अनेकशः व्यक्तींचीं चित्रे डोळ्यापुढे आणलीं म्हणजे किती विविध प्रकारच्या भूमिका उत्कट रीतीने त्यानी रेखाटल्या आहेत हे पाहून मन स्तिमित होते. तत्त्वप्रधान व विचारी; त्यागी व ध्येयवादी; मदाध व मानी; कर्तव्यतत्पर व स्वसुखनिरभिलाष; धर्मनिष्ठ व धीरप्रशात अशा अनेक नायकाची, उपनायकाची व प्रतिनायकाचीं त्यानी काढलेलीं रम्य चित्रे तर मराठी नाट्यवाङ्मयात केवळ अद्वितीय आहेत. धीरोदात्त, अतुल वीर्यशाली व मानधन अशा पुरुषाचीं चित्रे खाडिलकरानीच रेखाटावीं.

परतु भूमिकानिर्मिति हा नाटककाराच्या कामगिरींतील एक भाग होय. जगामध्ये कोणचीही व्यक्ति घेतली तरी तिचा सभोवतालच्या परिस्थितीशी सतत एक प्रकारचा सहकार व संघर्ष चाललेला असतो. व्यक्ति जितकी उच्चपदस्थ, जितकी महत्त्वाची, जितकी विचारशील व जितकी कर्तृत्वशाली, तितका त्या व्यक्तीचा परिस्थितीशी चाललेला सामना महत्त्वाचा व विचारणीय ठरतो. या सामन्यात कित्येक वेळा व्यक्ति विजयी होते. असे झाल्यास ती घटना सुखपर्यवसायी ठरते. परंतु पुष्कळ वेळा व्यक्तीच्या अंगीं असलेल्या काही महत्त्वाच्या दोषामुळे अगर व्यक्ति निर्दोप असूनही परिस्थिति असीम बलशालिनी ठरल्यामुळे व्यक्ति त्याखाली चिरडली जाऊन नष्ट होते. अशा घटनेस शोकान्त (tragedy) म्हणतात. कसेही झाले तरी ज्यात हा व्यक्ति व तिजभोवतालची परिस्थिति (यात भोवतालचे लोक अर्थात् आलेच) याच्यामध्ये चाललेला सामना व त्या सामन्यातील आणीबाणीचे प्रसंग चित्रित केलेले असतात ते नाटक गंभीर स्वरूपाचे नाटक होय. खाडिलकराचीं बहुतेक सर्व नाटकें गंभीर स्वरूपाचींच असल्यामुळे त्यानी आपल्या नाटकात हा व्यक्ति व परिस्थिति यांजमधील संघर्ष कसा चित्रित केलेला आहे हें पाहिलें म्हणजे त्यांच्या कारागिरीचा केंद्राबिंदु आपण शोधून काढिला असें होईल.

खाडिलकराचीं कांही नाटकें ऐतिहासिक व कांही पौराणिक

आहेत. तेव्हा पौराणिक किंवा ऐतिहासिक कथेचा मालमसाला घेऊन त्यावर निरनिराळ्या रीतीने आपली कारागिरी ते कशी चालवितात हें पाहणे मोठे बोधप्रद होईल. पौराणिक कथेत बहुधा काही तरी नैतिक तत्त्व मूळचे असतेच; आणि व्यक्ति व परिस्थिति यांचा एक प्रकारचा संघर्षही त्यात घडून आलेला असतोच. परंतु ही सर्व जुन्या प्रकारची मांडणी खाडिलकरांस नाट्यदर्शनासाठी यथायोग्य वाटत नाही. जुन्या कथेमध्ये असलेलीं तत्त्वे बदलून टाकून त्या कथानकाला अभिनव, व्यापक व समाजोपयोगी अशा नवीन तत्त्वाची बैठक ते देतात आणि ह्या नवीन तत्त्वाच्या आवरणास शोभेल असे संघर्षाचे नवीन केंद्र ते निर्माण करतात. अर्थात् या नूतनोद्भावित संघर्षाच्या स्वरूपाला अनुसरून मूळच्या भूमिकाचे स्वभावविशेषही त्यास थोडे बहुत बदलावे लागतात. मूळच्या पौराणिक कथानकातल्याच व्यक्ति, परंतु त्याचे हेतु, त्याची मनोरचना, त्याच्या वागणुकींतील तत्त्वे हीं मात्र निराळीं, अशी अद्भुत सांगड घालून देण्यात येते. जुन्या पौराणिक कथेला खाडिलकर ज्या तत्त्वज्ञानाची बैठक देतात ते तत्त्वज्ञान अगदी आधुनिक तऱ्हेचे, आधुनिक समाजाच्या व्यवहारास लागू पडणारें व निरनिराळ्या राष्ट्रोपयोगी व समाजोपयोगी कल्पनांनी युक्त असे असते. परतु त्यातील खुबी ही की, आधुनिक तत्त्वज्ञान जुन्या पुराण्या कथेवर बसविले असूनही या परस्पर संमिश्रणात अस्वाभाविकता व कृत्रिमता बिलकूल अनुभवास न येता एक प्रकारची स्फोटक स्फूर्तिदायकताच अनुभवास येते. मूळ तत्त्वेच बदलल्याकारणाने संघर्षाचे स्वरूपही बदलते, त्याचीं कारणें व त्याचे तात्त्विक परिणामही भिन्न होतात व व्यक्तीचे स्वभावविशेषही बदलतात. परंतु खाडिलकर ज्या नव्या तत्त्वज्ञानाची सांगड जुन्या कथानकाशीं घालतात तें तत्त्वज्ञान, एक तर, जुन्या कथानकावर थोड्या प्रयत्नाअंतीं बसू शकेल, असें असते. शिवाय ते इतके प्रखर, ओजस्वी, स्फूर्तिदायक, कल्याणप्रद व राष्ट्रोपयोगी असते की, त्या तत्त्वज्ञानामुळे मूळ पौराणिक कथेला नवीन उजळा आल्यासारखा वाटतो, पौराणिक व्यक्तींच्या अंगात नवजीवन संचरले आहेसें वाटतें आणि वाचकाच्या व प्रेक्षकाच्या मनावर सर्वस्वीं अनुकूल परिणाम होतो.

व्यक्तीचा व परिस्थितीचा जो संघर्ष कथानकामध्ये योजिलेला असतो त्याची मांडणी प्रारंभीं, बहुधा पहिल्या दुसऱ्या प्रवेशातच, तर्कशुद्ध व पद्धतशीर रीतीने करून पुढे पायरी पायरीने त्या संघर्षाची तीव्रता वाढवीत नेण्याची खाडिलकरांची कुशलता इतकी अप्रतिम आहे की, त्यांच्या कोणत्याही नाटकात जसजसे पुढे पुढे वाचीत जावें तसतशी रसोत्कर्षाची व औत्सुक्याची तार चढतच जाते. त्यांच्या नाटकाचा नूर मध्येच कोठे उतरल्यासारखा कधीही वाटत नाही. हा अनुभव इतर नाटककरांचीं नाटके वाचताना रसिकाला क्वचितच चाखावयास मिळतो, म्हणून खाडिलकरांच्या नाटकातील ह्या एकसारख्या चढतच जाणाऱ्या रसोत्कर्षाचे अलौकिकत्व वर्णावेसे वाटतें.

खाडिलकरांचीं नाटकें उग्र असूनही रमणीय, तत्त्वप्रचुर असूनही रसाळ, पौराणिक असूनही अभिनव अशी कशीं वठली आहेत, याचे रहस्य हे वर वर्णिल्याप्रमाणे आहे. जगातील श्रेष्ठ नाटककाराच्या कृतीमध्ये जे नाट्यकलेचे स्वरूप आढळते तसेच त्या कलेचे स्वरूप खाडिलकरांच्याही नाटकात आढळत असल्यामुळेच त्यांच्या नाटकास इतका उच्च दर्जा व इतके यश मिळाले आहे, ही गोष्ट वरील विवेचनावरून वाचकांच्या लक्षात आली असेलच. त्यानी नाटकामध्ये आपले सामाजिक तत्त्वज्ञान ओतलें. परंतु त्यासाठी त्यानी कलेचा अव्हेर केला नाही. उलट कलेच्या मोहिनीमंत्राच्या योगानेच त्यानी आपले आधुनिक तत्त्वविचार पौराणिक व्यक्तींच्या तोंडून वदविले आहेत. कलेचे स्तोम मात्र कधीच न माजविता त्यानी तिला आपल्या कार्यासाठी राबविली आहे. त्यांच्या कारागिरीचे साकल्याने व सामान्य रूपाने वर्णन येथे केलें आहे. त्यांच्या काही नाटकाचे पृथक्शः विवेचन करून आतापर्यंत केलेले सामान्य विवेचन त्या नाटकास कसे लागू पडते हें दाखविण्याचें कामही खरोखर करावयास पाहिजे. परंतु ते करण्यापूर्वी काही थोडे दिवस विश्रांति घेऊन व वाचकांनाही देऊन दरम्यानच्या काळांत खुद्द खाडिलकरांच्या ओजस्वी वाणीचा प्रत्यक्ष लाभ घेण्यास सर्वांस संधि देणें हें उचितच होईल

## २

[ 'विहंगम' एप्रिल १९३४ ]

खाडिलकराच्या नाटकाचें साकल्याने व स्थूलमानाने अवलोकन आपण मागील लेखांकात केले. त्यात आपणास प्रामुख्याने ही एक गोष्ट दिसून आली की, खाडिलकराची सर्व नाट्यकृति तत्त्वविचारपरिपूर्ण आहे; एक प्रकारचे प्रखर तत्त्वज्ञान त्याच्या सर्व प्रतिपादनाच्या बुडाशीं आहे. किंबहुना, त्याच्या जीवनातच त्याचे तत्त्वज्ञान मुरलेले असून ते त्याच्या जीवनाशीं एकरूप झालेले आहे. 'माझ्या विचारसरणीत मुरलेले राजकीय तत्त्वज्ञान हेच माझ्या जीवनात अग्रेसर होय असे मी सदैव मानीत आलो आहे' असे अत्यत अर्थपूर्ण उद्गार १८ व्या साहित्य संमेलनाच्या अगोदर त्यानी 'त्रिकाळ' पत्रास जी मुलाखत दिली त्यात काढले आहेत. तेव्हा या नाट्याचार्याचा अनन्यसामान्य विशेष असे जे त्याचे तत्त्वज्ञान त्याचे आकलन करण्याचा आपण प्रथम प्रयत्न करूं. आणि नंतर त्याच्या नाट्यकृतींचा एकैकशः परामर्श घेऊ.

खाडिलकरानी आपल्या वर्तमानपत्राचे नाव 'नवा काळ' असें ठेवले आहे आणि त्याच्यासाठी ध्येयवाक्य म्हणून

कालो वा कारणं राज्ञो राजा वा कालकारणम् ।
इति ते संशयो माऽभूत् राजा कालस्य कारणम् ॥

या महाभारतातील श्लोकाची निवड केली आहे. याचा 'नवा काळ' निघण्यापूर्वी शिवरामपंत पराजपे याचे 'काळ' पत्र उदित होऊन निमालें होते. त्याचा मान राखण्याकरिताच खाडिलकरानी आपल्या पत्राचें 'नवा काळ' असे नामकरण केले असावे. परंतु 'नवा काळ' हे नाव व त्या खालील ध्येयवाक्याचा श्लोक हीं दुसऱ्या एका दृष्टीने फार अर्थपूर्ण आहेत. खाडिलकराच्या जीवनात, त्याच्या नाट्यकृतींत व त्याच्या स्फुट लेखनांत अनुस्यूत झालेले एक अतिशय महत्त्वाचे तत्त्व या श्लोकामधून प्रकट झालेले आहे. मार्मिकपणाने व सूक्ष्मपणाने अवलोकन केल्यास हें तत्त्व अपरोक्ष रीतीने त्याच्या जीवनास, मनास व वाङ्मयकृतींस वळण

देण्यास कारणीभूत झालेले आहे, असेही आपणास दिसून आल्याखेरीज राहणार नाही. 'राजा कालस्य कारणम्'! राजा, म्हणजे शारीरिक बलाच्या जोरावर समाजाच्या आचार-विचाराना, उक्तिकृतींना वळण लावण्याचें सामर्थ्य जिच्या अंगीं असते अशी व्यक्ति किंवा व्यक्तिसमूह, हाच समाजाची सुस्थिति किंवा दुःस्थिति घडविण्यास सर्वथैव कारणीभूत असतो. ज्याच्या हातात सत्ता नाही असे जनतेच्या प्रीतीस पात्र झालेले पुढारी अगर नेते याचा प्रभाव केवळ मानीव, नैतिक व अप्रत्यक्ष स्वरूपाचा असतो. राष्ट्राचे उत्कर्षापकर्ष घडवून आणण्याचे, समाजात सद्‌गुणाचा अगर दुर्गुणाचा फैलाव करण्याचे, उदात्त ध्येयाचा अगर हीन मनोवृत्तीचा प्रसार करण्याचे-खरे सामर्थ्य राजसत्तेतच असते. म्हणूनच राजावर किंवा सत्ताधीशावर फार मोठी जबाबदारी आहे. राष्ट्राचा सत्ताधीश हा नेहमी खंबीर, उदात्त शीलाचा, त्यागी व ध्येयवादी असा असला पाहिजे. त्याने राष्ट्रोत्कर्षास अनुकूल असे आचरण केले की राष्ट्राचा उर्जित काल आलाच; त्याने कोणत्याही राष्ट्रधारणास व व्यक्तिधारणास अवश्य अशा गुणाच्या अभावीं स्वतःचे अधःपतन करून घेतले की राष्ट्राचा विनाशकाल प्राप्त झालाच. अर्थात् राष्ट्राची राजसत्ता ही आपणास अनुकूल व इष्टपरिणामी अशी करून घेण्यास आपण झटले पाहिजे, हेच आपले मुख्य कर्तव्य होय-राष्ट्रोद्धाराची गुरुकिल्ली हीच होय. इतर सर्व प्रकारच्या सुधारणेच्या चळवळी फुकट होत. कारण, राजसत्ता अनुकूल नसेल तर त्या चळवळीपासून काही फलनिष्पत्ति होणार नाही व राजसत्ता खरोखर उदात्त शीलाची व लोकहितैषी असेल तर अशा चळवळीची काही जरूरी नाही,—असा खाडिलकराचा ठाम ग्रह झालेला दिसतो. अर्थात राष्ट्रोद्धाराची तळमळ ज्यास लागली आहे, देशोन्नतीसाठी आपला उत्साह व आपले कर्तृत्व वेचण्याची ज्याची तयारी आहे, अशा देशभक्तानी आपल्या देशाची राजसत्ता सुधारून ती पूर्णपणे लोकहितैषी, त्यागी व सत्यनिष्ठ बनविण्याच्या कामीं आपले शक्तिसर्वस्व वेचलें पाहिजे, असा सिद्धान्त खाडिलकराच्या उपर्युक्त तत्त्वज्ञानापासून सहजच फलित होतो. आणि हा सिद्धान्तच त्याच्या आयुष्यांत प्रतिबिंबित झालेला दिसून येतो. प्रारंभापासून आज-

घटकेपर्यंत केवळ राजकीय कार्यासच त्यांनी आपलें आयुष्य कां वाहिलें, धार्मिक, सामाजिक, वाङ्मयिक, औद्योगिक,—वगैरे अनेक प्रकारच्या चळवळींपासून ते अलिप्त कां राहिले, त्यांच्या नाटयरूप ललितकृतीं-मधूनही त्याच्या प्रखर राजकीय तत्त्वज्ञानाचाच सूर निघत असलेला कां ऐकूं येतो, "स्वतःच्या जीवनक्रमाकडे पाहण्याची माझी एक विशिष्ट दृष्टि आहे. माझी साहित्यसेवा लोकाकडून कोणत्याही दर्जाची मानिली जावो, मी या साहित्यसेवेला आपल्या विचारात केव्हाही आग्रस्थान दिलेले नाही. माझ्या विचारसरणींत मुरलेले राजकीय तत्त्वज्ञान हेंच अग्रेसर होय, असेच मी सदैव मानीत आलों आहे" असा एकांगी व बेपर्वाईचा जबाब ते का देतात-याचे कारण त्यानी उराशीं बाळगिलेला उपर्युक्त महासिद्धान्तच होय. 'राजा कालस्य कारणम्' हे तत्त्व त्याच्या जीवनास देखील विशिष्ट वळण देण्यास कारणीभूत झाले आहे, असे जें आम्ही वर म्हटले आहे, त्याचा अर्थ हाच होय.

'राजा कालस्य कारणम्' या सिद्धान्ताने जसे त्याच्या आयुष्यास वळण दिले आहे तसाच त्याच्या नाटयकृतीवरही प्रभाव गाजविला आहे. त्याच्या बहुतेक नाटकामधून या सिद्धान्ताचीं निरनिराळी अंगे व याच्याच बऱ्या वाईट बाजू प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीने चित्रित केलेल्या आढळतात. या संबंधात अगदी पहिली लक्षात ठेवण्याजोगी गोष्ट ही की, खाडिलकरानी आपल्या सर्व नाटकात राजे, राजपुत्र किंवा तत्सम सत्ताधीश याच्या भूमिका वर्णिल्या असून सत्ताधीश या नात्याने त्याच्या होत असलेल्या वर्तनाचे व त्याच्या बुडाशीं असलेल्या मनोवृत्तींचे मार्मिक विश्लेषण केलें आहे. राजेरजवाडयाचीं, राजपुत्र-राजकन्याचीं पात्रे शेंकडो नाटकातून वावरताना आपल्याला दिसतात. परंतु इतर नाटकामधील राजाचे राजेपण शोभेकरिता व अद्भुततेकरिता असते. पूर्ण सुखाचे व वैभवाचें वातावरण दाखविता यावें व त्याच्या योगाने प्रणयाची पार्श्वभूमि चागली सजविता यावी हा किंवा अशाच तऱ्हेचा वरपागी उद्देश बहुधा राजेरजवाडयांचीं पात्रे घालण्यात इतर नाटक-काराचा असतो. परतु खाडिलकरानी राजाचे राजेपण व त्याच्या पाठीमागे असणाऱ्या मनोवृत्ति यांनाच आपल्या विवेचनाचे विषय केले आहे व

त्यांवरून राष्ट्राच्या उन्नति-अवनतीसबंधाचे सिद्धान्त अप्रत्यक्ष रीतीने सुचविले आहेत.

त्याचे पहिलेच नाटक 'सवाई माधवराव याचा मृत्यु' हे या दृष्टीने मोठे उद्बोधक आहे. त्या नाटकाच्या प्रस्तावनेत, " विचारवान परतु विकारवश असा ( सवाई माधवराव हा ) 'हॅमलेट' आपल्याला सापडला," असे विधान खुद्द नाटककारानी केले आहे. शेक्सपियरच्या मूळ 'हॅमलेट'कडे पाहिले तर त्यास 'विचारवान परंतु विकारवश' अशीं दोन्ही विशेषणे लावता येतील की काय यांची शका वाटते. हॅमलेट विचारवान आहे; परतु विकारवश नाही—आणि हाच तर त्याच्या अंगीचा मोठा दोष आहे. त्याच्या ठिकाणी विचाराचाच अतिरेक झालेला दृष्टीस पडतो. खरोखर विकारवश असा नायक शेक्सपियरच्या दुसऱ्या मोठ्या ट्रॅजेडींतील अथेल्लो हा आहे. आणि थोडे बारकाईने पाहिले तर सवाई माधवरावाचे पात्र म्हणजे हॅमलेट व अथेल्लो या दोन्ही भूमिकाचे मिश्रण आहे असे दिसून येईल. सवाई माधवराव हा हॅमलेटप्रमाणे संशयी, मनातल्या मनात कुढणारा असा आहे. परंतु तो तितकाच भावनाप्रधान म्हणजे विकारवश असून या बाबतीत त्याचे अथेल्लोशी फार साम्य आहे. अथेल्लो हा संशयी नाही परतु अत्यत विकाराधीन आहे. तो प्रेमविकाराच्या आधीन होतो तेव्हा त्या दिशेने पराकोटीस जातो; पुढे त्याच्या मनात भलतेच भरवून देताक्षणीं तिटकारा, द्वेष, इत्यादि भावनाच्या अधीन होऊन, तो पत्नीवधरूपी भलतेच कृत्य करून बसतो. सवाई माधवरावाची जवळजवळ तशीच स्थिति आहे.

परंतु शेक्सपियरची उपर्युक्त दोन विख्यात दुःखान्तके व 'सवाई माधवरावाचा मृत्यु' यात एक मोठा फरक आहे. अथेल्लो व हॅमलेट हीं वैयक्तिक जीवनाचे चित्रण करणारीं नाटके आहेत, तर 'सवाई माधवरावाचा मृत्यु' या नाटकात नाटककाराने राष्ट्राच्या भाग्यनाशाचा देखावा चित्रित केला आहे. 'अथेल्लो' हे केवळ वैयक्तिक जीवनाचे चित्र आहे. 'हॅमलेट' मध्ये राष्ट्रीय जीवनाचा थोडा तरी संबंध नाटककाराने आणलेला आहे. परंतु 'सवाई माधवरावाच्या मृत्यू'त राष्ट्राचे जीवन ठळकपणें वाचकापुढे माडले असून सवाई माधवरावाचे जीवन

हे राष्ट्रीय जीवनाचेंच एक अंग होय, ही गोष्ट दरबारचे प्रवेश ( अंक १ प्रवेश ३; अंक ३ प्रवेश २ ) व दसऱ्याच्या स्वारीचा प्रवेश ( अंक ४ प्रवेश ३ ) इत्यादि प्रवेशांच्या योगाने स्पष्टपणे जाणविली आहे. अर्थात् राष्ट्रोन्नतीचा व महाराष्ट्र साम्राज्याचा प्रमुख घटक व चालक या नात्यानेच नाटककार सवाई माधवरावाकडे पाहत आहे आणि या नात्यानेच तो उणा पडतो असे त्याने दाखविले आहे. सवाई माधवराव आपल्या स्वभावसिद्ध अवगुणामुळे स्वतः तर नाश पावतोच, परतु त्याबरोबरच महाराष्ट्र राज्यलक्ष्मीच्याही नाशास कारण होतो, असा निष्कर्ष नाटककाराने शेवटीं कथन केला आहे. 'श्रीमताबरोबरच महाराष्ट्राच्या साम्राज्याची इमारत ढासळून पडली!' हे नानाच्या तोंडीं घातलेले अखेरचे उद्गार अगदी याच अर्थाचे द्योतक आहेत.

आपल्या कोणत्या अवगुणामुळे सवाई माधवराव स्वनाशास व राष्ट्रनाशास कारण होतो ? या प्रश्नाचे उत्तर देणे मुळीच कठीण नाही. एक तर तो हलक्या कानाचा आहे. नाना फडणीस आदिकरून धुरंधर मुत्सद्दी ज्या वेळेस मोठमोठ्या पराक्रमाच्या व राज्यवृद्धीच्या मसलती करीत असतात त्याच वेळेस हा फितुरी लोकाच्या हलकट गप्पा ऐकून आपले मन कसे बिघडवून घेत असतो, याचे मोठें भेदक चित्र नाटककर्त्याने रगविले आहे. यापेक्षाही जबरा असा अवगुण म्हणजे विकारवशता हा होय. आपण ऐकिलेल्या गप्पाची व आपणास आलेल्या सशयाची तर्कशुद्ध रीतीने विचारपूर्वक छाननी करण्याच्या भरीस तो पडत नाही. त्याचे मनोविकार भडकतात, तो त्याच्या अधीन होऊन सरतेशेवटीं त्यास बळी पडतो.

तेव्हा, राजाचे कारभारी जरी पूर्णपणे इमानी, राष्ट्रहितदक्ष, अलौकिक बुद्धिमान व कर्तृत्ववान असे असले तरी, राजा जर हलक्या कानाचा व विकारवश असा असेल तर कारभाऱ्याच्या भगीरथ प्रयत्नाचाही काही उपयोग न होता राजाच्या अवगुणामुळे राष्ट्राचा विनाशकाळ जवळ येतो–हा निष्कर्ष हे नाटक वाचून आपल्या मनात येतो. 'राजा कालस्य कारणम्' होतो तो असा!

या सिद्धान्ताचा आणखी एक अनिष्टस्वरूपी पैलू 'भाऊबंदकी' या नाटकात चमकत असलेला दृष्टीस पडतो. 'राजा कालस्य कारणम्' या

तत्त्वाची एक अनिष्ट बाजू दाखविण्याबरोबरच आपणास अभीष्ट अशा 'नव्या काळा'च्या अरुण छटांचें रम्योज्ज्वल दृश्यही या नाटकात नाटककर्त्यांने दाखविले असल्यामुळे यातील तत्त्वप्रतिपादन फारच सुंदर व परिपूर्ण भासते. शिवाय तें अत्यंत उघड व उत्तान असल्याने इतर नाटकाप्रमाणे उकलून सागण्याजोगा भाग त्यात विशेषसा नाहीच. राघोबा हा स्त्रैण व त्याला नाकात वेसण घालून वागविणारी स्त्री आनदी ही पापी महत्त्वाकाक्षेने प्रेरित झालेली. त्या दोघानी पुतण्याचा खून करून राज्य मिळविले. परंतु सत्याला लवकरच वाचा फुटून राघोबाचे पाप उघडकीस आले व बारभाईच्या कारस्थानामुळे त्याची उचलबागडी झाली. अर्थात पापाच्या मार्गाने मिळविलेली सत्ता टिकत नसते, हा मोठा राजनैतिक सिद्धान्त या उदाहरणावरून उघड निघत असलेला आपणास दिसतो. सत्ताधीशाने आपली सत्ता पापमार्गाने मिळविलेली असली म्हणजे त्याच्या भोवतीं तशाच पापी, स्वार्थी व तोंडपुज्या आश्रिताचा घोळका जमतो. अशा राजवटींत खऱ्या मुत्सद्याचा बोज नाहीसा होतो, निःस्पृह कार्यकर्त्यांचे उच्चाटन होतें आणि धर्मभोळेपणा, दभ, अंधश्रद्धा याची पोळी पिकते; असे अनेक अनिष्ट परिणाम घडून येत असल्याचे या नाटकात खाडिलकरानी मोठ्या कुशलतेने व मार्मिक तऱ्हेने वर्णन केले आहे.

दुसरा एक बोध उघडच राघोबाच्या कथानकापासून निष्पन्न होतो, तो गृहकलहासबधीचा होय. आनदीच्या प्रेरणेने राघोबाने गृहकलह माजविला. राजसत्तेमध्ये अशा रीतीने कलीने प्रवेश केला म्हणजे राष्ट्रातील सामान्य जनताही कज्जेदलाल बनून भाऊबंदकीच्या रोगाने कशी ग्रस्त होते हे दुर्गा व म्हाळसा ह्या भाडखोर भूमिकाच्या योगाने नाटककाराने मार्मिक रीतीने सूचित केले आहे पुढे राघोबाची हकालपट्टी होऊन बारभाईच्या एकीच्या पायावर नव्या राज्याची प्राणप्रतिष्ठा होताच भाऊबदकीचा रोग नाहीसा होऊन त्याच भाडखोर जावा गुण्यागोविदाने नादूं लागलेल्या नाटककारानी दाखविल्या आहेत. हे काहीसे कृत्रिम दिसते खरे, परतु 'राजा कालस्य कारणम्' या महासिद्धान्ताची यथार्थता तंतोतत पटवून देणारे उदाहरण म्हणून ते कौतुकास्पद वाटल्याखेरीज राहत नाही.

सत्ताधीशामधील गृहकलहाचा एक निराळ्या तऱ्हेचा देखावा 'सवतीमत्सर' या नाटकात खाडिलकरांनी दाखविला आहे. आणि या बाबतींत त्याची 'भाऊबंदकी'शीं थोडीशी तुलना होण्याजोगी आहे. कैकेयी ही आनदीप्रमाणेच स्वार्थी महत्वाकाक्षेने प्रेरित झालेली व दशरथ हा राघोबा-सारखाच कामुक व दुबळ्या मनाचा आहे. त्यामुळे रघुकुलातही पेशव्यांच्या घराण्याप्रमाणे गृहकलह माजतो. परंतु हे साम्य येवढयापुरतेच. रघुकुलातील व्यक्ति इतर सर्व बाबतींत फारच निराळ्या व उच्च मनोवृत्तीच्या आहेत. किती झाले तरी हें कलियुग व ते त्रेतायुग! मंथरेच्या शिकवणुकीने कैकेयी आपलपोटी बनली असली तरी ती आनंदीप्रमाणे अघोरी कृत्ये करणारी कृत्या बनलेली नाही; इतकेच काय, परतु तिचे मागणे रतिभरही न्यायास सोडून नाही. त्यामुळे दशरथास देखील दयेची याचना करण्याखेरीज दुसरे तिसरे तिच्या बाबतींत काही करता येत नाही. भरताला राज्य व रामाला वनवास मागून घेणे कितीही निर्घृणपणाचे असले तरी ते तिच्या अधिकारातले अतएव पूर्णपणे न्याय्य होते. म्हणूनच, आनंदीच्या कृत्यामुळे पेशवे कुळाला पापाचा कलंक लागला व त्यामुळे त्याची एकतंत्री राज्य-सत्ता अनिष्ट व अपात्र ठरून बारभाईच्या (oligarchy) सत्ताकाळास प्रारंभ झाला, असे दृश्य जसे 'भाऊबंदकी'त दाखविले आहे, तसा काहीच प्रकार 'सवतीमत्सरा'त वर्णिलेला न पून, कैकेयीच्या मागण्यांमुळे रामचद्राची सत्यप्रतिज्ञा प्रकट होऊन त्याच्यामुळे रघुकुलाची उन्नतिच झाली व दंडकारण्यात 'महाराष्ट्र' निर्माण होऊन जगाचे कल्याणच झाले असे उलट त्या नाटकाच्या अखेरीस सूचित केले आहे. मत्सर व स्वार्थ हे केव्हाही वाईटच; व ते ज्या व्यक्तींच्या अगीं दिसून येतील त्या व्यक्ति निंद्यच होत. परतु अशा व्यक्ति स्वाधिकाराचे अतिक्रमण न करिता आपली लालसा पूर्ण करून घेऊ इच्छीत असतील तर त्यामुळे सबंध राजकुल (किंवा कोणताही सत्र अथवा कुल) पतित होत नाही. त्यातून रामचद्रासारखा सत्याचा, प्रेमाचा व शातीचा पुतळा जर सुदैवाने उपलब्ध असला तर त्या स्वार्थप्रेरित मत्सराची आग तो गिळून टाकतो व अमंगलातूनही मगल निर्माण करून दाखवितो, असा निष्कर्ष तत्त्वान्वेषी दृष्टीने या नाटकाकडे पाहिले असता आपल्या मनात उतरतो.

'सवतीमत्सर' या नाटकाच्या कथानकात गुंफलेलें राजकीय तत्वज्ञान ते हेच होय. त्याचे निरीक्षण केल्यास त्यांत मूळ रामायणांतील कथानकाशीं असंबद्ध असे काही दिसत नाही. उपर्युक्त तत्त्वे रामायणातील कथानकातूनच प्रत्यक्षपणे निर्गलित होतात. कैकेयीचा स्वार्थीपणा व मत्सर, दशरथाची कामुकता, रामाची मातृपितृनिष्ठा, सत्यप्रतिज्ञा, एकवचनिता, या सर्व गोष्टी मूळ रामायणात आहेत. याच गोष्टी खाडिलकरानीही वर्णिल्या आहेत. व यावरून निघणारे त्रिकालाबाधित सामान्य सिद्धात अत्यंत वेचक रीतीने व उज्ज्वल वाणीने सर्व प्रमुख पात्राच्या भाषणात गुंफून दिले आहेत. त्या त्या ठिकाणीं ते उद्गार चालू प्रसंगालाही उत्कृष्ट रीतीने लागू पडतात व त्रिकालाबाधित सत्याचाही सामान्य रीतीने बोध करितात. येवढीच कामगिरी काही कमी प्रशंसनीय आहे असे नव्हे. 'खुद्द कैकेयीनेच आपले वनवासाचे मागणें मागे घेतले तर रामाने वनवासाला जावयाचा आग्रह धरण्याचे कारण काय ?' असा युक्तिवाद करणाऱ्या वसिष्ठास उद्देशून रामचंद्र म्हणतो—"मी प्रतिज्ञा करायला कारण कोणतेंही असो, प्रतिज्ञा केल्यानंतर शेवटपर्यंत प्रतिज्ञा पाळणे हाच सत्यनिष्ठाचा धर्म आहे.....गुरुजी, प्रतिज्ञा पाळणे हा सनातन धर्म आहे आणि ह्याच धर्मावर सत्याची प्रतिष्ठा अवलंबून आहे. हें सत्य केवळ कैकेयी मातोश्रीकरिता नाही, हे सत्य केवळ बाबाच्याकरिता नाही, किंवा एकट्या रामाकरिताही नाही,...सत्यनिष्ठानी एका देशावर किंवा काळावर नजर ठेवून भागत नाही. विश्वाच्या जोपासनेसाठी ब्रह्मादिकानी जी अव्याहत तपश्चर्या चालविली आहे त्या तपश्चर्येत सत्याचरण हें प्रमुख अंग आहे. ती तपश्चर्या सर्व देशाकरिता व सर्व काळाकरितां आहे.—संसाराच्या प्रवाहात आई केवळ आपल्या लेकराला सोडून देते, मग लेकरू प्रवाहाचें होते, आईचें राहत नाही. कैकेयी मातेने सत्याच्या प्रवाहात मला सोडले आहे. इ. इ." (अंक ३, प्रवेश ४ ). याच्या अगोदर कौसल्येची समजूत घालताना राम म्हणतो,—"रघुकुलासारख्या उज्ज्वल व पवित्र कुळात सवतीमत्सर शिरला; चौदा वर्षे वनवास भोगून मी सर्वांकरिता प्रायश्चित्त घेत

आहे.—हा घरातला मत्सर सिंहासनाला बाधतो आणि अखेर राष्ट्रकार्य व देवकार्य नष्ट होतें.—बायकाबायकामधला मत्सर घरगुती वाटतो खरा, पण सत्याचा प्रकाश जर वेळींच त्या मत्सरावर पडला नाही तर कर्त्या व पराक्रमी पुरुषातही तो मत्सर शिरून मत्सराची कीड सर्व राजकाजाला लागते. आई, सत्याशिवाय दुसऱ्या कशानेही मत्सराचा अग्नि शमत नाही." (अंक ३, प्रवेश २). अशा तऱ्हेचीं वचनमौक्तिकें प्रस्तुत नाटकात इतस्ततः विखुरलीं आहेत. त्याजकडे जितके निरखून बघावे तितके तितके त्याचें तेज अधिक प्रत्ययास येते व खाडिलकराच्या तत्त्वान्वेषणसामर्थ्याचा अचंबा वाटतो.

परंतु खाडिलकराची कर्तबगारी येवढ्यावरच थाबत नाही. मूळ कथानकावर सरळपणे व प्रत्यक्षपणें बसूं शकेल अशा राजकीय तत्त्वज्ञानाचा मुलामा तर ते त्यावर चढवतातच. परंतु त्याची तत्त्वान्वेषी प्रतिभा याहीपुढे जाऊन मूळ कथानकात ज्याचा मागमूसही मिळणार नाही, परंतु आधुनिक काळास ज्या विशेषेकरून लागू पडतील अशा कल्पनाच्या छटा ते नाट्यकथानकात चातुर्याने मिश्रित करतात. ही त्याची चतुराई त्याच्या पौराणिक नाटकातच प्रामुख्याने प्रकट झालेली आहे. 'सवती मत्सरा'त अशा कोणत्या कल्पना समाविष्ट केल्या आहेत ते पाहावयाचें असल्यास मंथरेच्या भूमिकेकडे आपणास वळले पाहिजे. मंथरा ही प्रादेशिक असूयेने प्रेरित झालेली एक हृदयशून्य, नीति अनीतीची कदर न बाळगणारी (unscrupulous) स्त्री होती. केकय देशाच्या लोकाचे वर्चस्व अयोध्येंत वाढावे, कैकेयीच्या द्वारा तेथील सर्व राज्यकारभार आपल्या हातीं यावा, ही तिच्या जिवाची इच्छा. ती पूर्ण करून घेण्यासाठी ती कैकेयीच्या मनात नसलेला सवतीमत्सर उत्पन्न करिते आणि आपले कार्य साधून घेते. एका देशांतले मुत्सद्दी कोणत्या ना कोणत्या तरी निमित्ताने दुसऱ्या देशाच्या राज्यकारभारात हात घालतात आणि तेथील न्याय्य राज्यसत्तेस हुसकून लावून आपल्या अपहारास (exploitation) अनुकूल होईल अशी राज्यसत्ता त्या देशात स्थापन करितात, असा जो देखावा आधुनिक जगाच्या इतिहासात अनेक ठिकाणीं घडून आलेला किंवा घडत असलेला आपल्या दृष्टीस पडतो, तोच या नाटकात मंथरेच्या

उपद्व्यापांच्या द्वारा नाटककाराने सूचित केला आहे असें मार्मिकपणें पाहिल्यास लक्षात येते. कथानकाभोवती घातलेले तत्त्वज्ञानाचे किंवा तात्त्विक कल्पनाचे हें दुसरे आवरण होय. हे ठळक रीतीने नाटकात प्रतिपादन केलेले नसून अर्धवट सूचित व अर्धवट उक्त अशा स्थितींत नाटककाराने ठेवले आहे. आणि त्यातच त्याची खरी चारुता आहे.

पण याच्याही पुढे जाऊन राम म्हणजे महात्मा गांधी, वसिष्ठ, कौसल्या, सुमंत इत्यादि रामाचे पक्षपाती म्हणजे कांग्रेस, लक्ष्मण म्हणजे क्रांतिकारक पक्ष, दशरथ राजा म्हणजे हिंदुस्थान देश, कैकेयी म्हणजे हिंदुस्थान सरकार व मन्थरा म्हणजे कट्टर साम्राज्यवादी इंग्रज, रामवनवास म्हणजे गांधींचा ( १९२२ मधील ) बंदिवास–याप्रमाणे प्रचलित राजकारणाचे रूपक या नाटकावर कोणी बसवूं लागला तर ते बरोबर होईल किंवा कसे ? याविषयी निर्णय कोण देऊ शकेल ? प्रादेशिक असूयेच्या कल्पनेस मंथरेच्या भाषणाचा थोडा तरी आधार आहे. परंतु वरील रूपक ग्रंथकारास अभिप्रेत आहे असे म्हणावयास तितकाही आधार नाही. नाही म्हणावयास अंक ३ प्रवेश ३ या, कथानकाच्या दृष्टीने अगदी निरर्थक असलेल्या, प्रवेशावरून वर उल्लेखिला आहे तशा प्रकारचा प्रचलित राजकीय चळवळीचा ध्वनि ग्रंथकारास अभिप्रेत असावा असे म्हणतां येते. रामचंद्रवियोगाच्या प्रसंगीं सर्व अयोध्या नगरी शोकावेगाने बेफाम झाली असता स्वतः अगदी थंड व निर्विकार राहिलेल्या दोन दीड शहाण्या नागरिकांचा संवाद या प्रवेशात घातला आहे. नाट्यदृष्ट्या हा प्रवेश निरर्थक असून तो गांधींच्या कैदेमुळेही ज्यांचे समाधान भंगलें नाही अशा व्यक्तींना उपहासविषय करण्याकरिता घातला असावा हें उघड दिसते, आणि यावरून प्रचलित राजकीय चळवळीचे प्रतिबिंब या नाटकात पाडण्याचा नाटककाराचा हेतु असावा असे अनुमान होते.

परंतु पौराणिक कथानकाच्या द्वारें प्रचलित राजकीय चळवळीचे प्रतिपादन करण्याबाबत खरे गाजलेले नाटक म्हणजे 'कीचकवध' हे होय. हे नाटक ज्या वेळेस लिहिले व अनिर्बंध वातावरणात ज्या वेळेस याचे प्रथम प्रयोग होऊ लागले त्या वेळीं त्याचा जनतेच्या व सरकारच्या मनावर कसा परिणाम होत असेल याचे आकलन आजच्या घटकेस करणे कठीण

आहे. सरकारच्या रोषास तें पात्र झालें होतें ही गोष्ट उघडच आहे आणि यावरूनच जनतेचीं मने विशेष उद्दीपित करण्यास ते कारणीभूत झाले असावें असेंही अनुमान करण्यास हरकत नाही. परंतु हा मागील इतिहास मनात न आणता एक वाङ्मयकृति या नात्याने आजवर त्याच्याकडे पाहिले तर मूळ पौराणिक कथानकाचे व व्यक्तींचें सरळ व अविकृत स्वरूपात दिग्दर्शन या नाटकाइतके खाडिलकराच्या दुसऱ्या कोणत्याही पौराणिक नाटकात केलेले नाही असे म्हणणे भाग पडेल. मूळ महाभारतात वर्णिलेले व्यक्तींचे स्वभाव व त्यांचे हेतु हे नाटकात कसे कायम ठेविले आहेत याचे स्पष्टीकरण नाटककारानी आपल्या प्रस्तावनेत केले असून ते बहुतांशी यथार्थ आहे. नाटककारानी मूळ कथानक व त्यातील व्यक्ति विकृत केल्या नाहीत याचे कारण म्हणजे त्यास जे तत्त्व प्रतिपादन करावयाचे होते ते महाभारतातील कथानकामध्ये मूळचेच अनुस्यूत असलेले त्यास सापडले हे होय. हे तत्त्व म्हणजे 'राजा कालस्य कारणम्' या त्याच्या महासिद्धान्ताचेच एक अंग होय. 'सवतीमत्सरा'त कामुकतेमुळे राजा दशरथ हा दुर्बल व मेषपात्र झालेला दर्शविला आहे. लाडामुळे शिरजोर झालेली कैकेयी 'दुबळ्यासारखी भीक काय मागता? नामर्दासारखे गयावया काय करता? नेभळ्याप्रमाणे पाया काय पडता?' असे वाक्ताडन दशरथाला मोठ्या उल्लासाने करते. 'कीचकवधा'त उन्मत्त व मदांध सेनापतीच्या आहारीं गेल्यामुळे राजसत्ता निर्माल्यवत् कशी होते याचे दृश्य अत्यंत भडक रीतीने वाचकाच्या पुढे उभे केले आहे. सद्‌गुणी प्रजाजनाचे त्याच्यावर होणाऱ्या अत्याचारापासून रक्षण करून त्यास पूर्ण अभय देणे हे जे राजसत्तेचे आद्य कर्तव्य ते देखील बजाविता येऊं नये इतकी अनुकंपनीय स्थिति कीचकाच्या शिरजोरपणामुळे विराट राजाची होते. आपल्याच अधिकारी वर्गाच्या शिरजोरपणामुळे राजसत्ता सत्प्रवृत्त असूनही जर अनाथाचे रक्षण करण्यास असमर्थ ठरत असेल तर सज्जनानी शासनाचा अधिकार आपल्या हातीं घेऊन अत्याचारास प्रवृत्त झालेल्या दुष्टाचे निर्दालन करण्यास पुढे होण्याखेरीज दुसरा मार्गच नाही. हे सर्वसामान्य व सर्व परिस्थितीस लागू पडणारें राजकीय तत्त्व या नाटकातील कथानकाच्या द्वारा प्रति-

पादन केलेलें दिसतें. 'सवतीमत्सरा'त शातीचा, प्रेमाचा व सहनशीलतेचा मार्ग उपदेशिला आहे तर 'कीचकवधा'मध्ये बलाचा मार्ग अवलंबिलेला दाखविला आहे. परंतु ज्या परिस्थितींमध्ये हे दोन निरनिराळे मार्ग अवलंबण्यात आले त्या परिस्थिती अत्यंत भिन्न आहेत हे लक्षात ठेवले पाहिजे. 'सवतीमत्सरा'त कैकेयीने स्वाधिकाराचें अतिक्रमण न करता वर मागितले आहेत; तिच्या मनातील हेतु कितीही गैर असोत, तिचें कृत्य अधर्म्य आहे असे कोणाच्यानेही म्हणवत नाही. याच्या उलट कीचक हा मदाध, उन्मत्त, राजसत्तेचा उपमर्द करून भयंकर अत्याचार करण्यास प्रवृत्त झालेला असा अधम पुरुष आहे. त्याला नाहीसा करण्याखेरीज इलाजच नाही अशी बिनतोड परिस्थिति प्राप्त झालेली आहे.

विशिष्टपरिस्थितिनिरपेक्ष असे राजनैतिक तत्वज्ञान 'कीचकवधा'त कोणते दिसून येते हें याप्रमाणें सागितल्यानंतर तत्कालीन राजकीय चळवळीचे प्रतिबिंब यात कसकसे पडलेले काही लोकास प्रतीत होते तेही थोडेसें निर्दिष्ट केले पाहिजे. राजा विराट म्हणजे पार्लमेंटची सार्वभौम राजसत्ता, कीचकानुकीचक म्हणजे नाटक लिहिले त्या वेळची नोकरशाही, सैरन्ध्री म्हणजे राष्ट्रीयसभा किंवा हिंदुस्थानची जनता, कंकभट (युधिष्ठिर) म्हणजे मवाळपक्ष व बल्लव (भीम) म्हणजे जहालपक्ष असें समीकरण बहुधा बसविण्यात येते. या समीकरणास आधार काय म्हणून कोणी विचारल्यास उपर्युक्त सर्व पात्राची काही ठिकाणची भाषणे हाच एक सागता येईल. ही भाषणें ध्वनिगर्भ आहेत असे मानिल्यास त्याच्यातून तत्कालीन परिस्थितीला लागू पडेल असा अर्थ सूचित होऊं शकेल, हे खरें; परंतु नाटकाच्या सर्व कथानकावर, त्यातल्या सर्व संवादावर व प्रसंगावर प्रचलित चळवळीचे रूपक बसविता आले पाहिजे अशी अपेक्षा करणे रास्त होणार नाही. प्रचलित राजकारणाचे प्रतिबिंब जे कित्येकास खाडिलकराच्या नाटकांत दिसते ते केवळ ध्वनिसामर्थ्याने होय. तो ज्या ठिकाणीं जेवढयापुरता निघत असेल, तेवढयापुरता घ्यावयाचा. अत्यत भिन्न काळातील व परिस्थितींतील पौराणिक कथानकामध्ये सद्यःकाळातील परिस्थितीचा आभास उत्पन्न करितील अशा छटा सफाईने मिश्रित करण्याचे खाडिलकराचे चातुर्य अप्रतिम आहे. तसे चातुर्य इतर कोणाही नाटककाराने

आजपर्यंत दाखविले नाही, परंतु प्रचलित चळवळीचा हा भास कित्येक ठिकाणीं व्यंजनेने उत्पन्न होणारा असतो, प्रत्यक्ष शब्दानी ते पौराणिक कथेवर किंवा प्रसंगावर प्रचलित चळवळींतील प्रसंगाचीं रूपकें योजीत नाहीत, हे लक्षात ठेवले पाहिजे. अर्थात् काही ठिकाणीं प्रचलित राजकारणाचे ध्वनिगर्भ रूपक जुळतेसे दिसेल तर काही ठिकाणी त्यास अगदी विसंगत अशा गोष्टी मूळ कथानकात वर्णिलेल्या आढळतील. कीचकवधातीलच दाखला द्यावयाचा झाल्यास, त्यात भीम कीचकास मारतो असे वर्णन केले आहे, त्यावरून त्या काळचा जहाल पक्ष अत्याचारास अनुकूल होता, असे अतिरिक्त अनुमान काढणे बरोबर ठरणार नाही. त्याप्रमाणे कंकभटाच्या तोंडी घातलेली काही भाषणे मवाळ पक्षाच्या तोंडीं शोभतील, निदान खाडिलकर हे त्यातील उदात्त तत्त्वज्ञानाचे श्रेय मवाळ पक्षास देण्यास तयार होतील, असे वाटत नाही. उदाहरणार्थ पुढील भाषण पहा—

"न्यायबुद्धीला केव्हा केव्हा बाहेरून निर्दयतेचे सोंग आणावे लागते, हे खरे; पण द्रौपदी, असला निष्ठुरपणा जर केवळ स्वहिताकरिताच असेल तर कितीही शांतपणाने, सावकाशीने, पक्का विचार करून व अंतःकरण दयाळू ठेवून, हा निष्ठुरपणा दाखविला असला, तरी परमेश्वर त्यावर पापाचा छाप मारल्यावाचून राहणार नाही. स्वतःच्या भावी सुखाच्या लालचीने आज क्रूर होणे म्हणजे लोभाच्या जाळ्यात सापडून फसण्यासारखे आहे. ज्याला आज दुःख द्यावयाचे त्याचे त्या दुःखापासून अधिक कल्याण होणार आहे, अशी दयाळू न्यायदेवतेची पूर्ण श्रद्धा असल्याशिवाय क्रूरपणाचें प्रत्येक कृत्य पापमय आहे असें समजावें."
अशीच उदाहरणे 'सवतीमत्सर' नाटकामधूनही देता येतील. त्या नाटकातील रामचंद्रावर गांधींची छाया पडली आहे असे एका दृष्टीने म्हणता येईल, हे वर सांगितलेच आहे. परंतु दोन्ही व्यक्तींचे सांगोपांग रूपक जमवूं लागल्यास तें जमणे शक्य नाही. गांधींना कैद झाली सहा वर्षे व ती त्यांनी भोगली फक्त दोनच वर्षें, तर रामचंद्रास वनवास झाला व त्याने भोगला चौदा वर्षें—हें एक विसंगतीचें उदाहरण म्हणून देता येईल. परंतु रामाच्या भाषणावरून जर गांधींचे तत्त्वज्ञान वाचकांच्या डोळ्यापुढे अप्रत्यक्षरीत्या उभें राहत

असलें तर अशा शेंकडो विसंगतींमुळे त्यास किंचिन्मात्रही बाध येणार नाही. केवळ याच दोन नाटकासंबंधाने नव्हे तर खाडिलकराच्या सर्वच नाटकाच्या संबंधाने ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. त्यांच्या नाटकामध्ये अमुक अमुक प्रचलित चळवळीचे प्रतिबिंब दिसतें म्हणून अट्टाहासाने आपणच प्रतिपादन करावयाचें, आपल्या मनाच्या कल्पनेप्रमाणे तें प्रतिबिंब कथानकाच्या सर्व अगामध्ये दिसले पाहिजे अशी आग्रहमूलक अपेक्षा मनात बाळगावयाची व ती अपेक्षा सफल झाली नाही म्हणजे खाडिलकराना रूपक चागलें साधले नाही म्हणून हाकाटी करावयाची. हा प्रकार अन्यायाचा व अरसिकपणाचा होय. अमक्या राजकारणाचें प्रतिबिंब माझ्या नाटकात आहे असे खाडिलकर स्वतः कोठे सागत नाहीत. तसा ध्वनि जर कोठे उमटल्यासारखा कोणास वाटत असेल तर तो तेवढ्यापुरताच घेऊन वाचकाने चालले पाहिजे. धडधडीत वाच्यार्थाने आपल्या कल्पना व्यक्त करणाऱ्या कवीच्या उपमा-रूपकामध्ये सुद्धा जर सर्वगामी साम्य आढळून येत नाही व मुखाला पाकळ्या कोठे आहेत म्हणून विचारणाऱ्यास आपण मूर्खात काढतों; मग येथे तर काय, अप्रत्यक्ष रीतीने अस्फुट स्वरूपात प्रादुर्भूत होणारा ध्वनिच केवळ प्रचलित राजकारणाचा भास करून देणार जेथे तसा ध्वनि निघत असेल तेथे तो अवश्य ग्राह्य धरावा व पौराणिक कथानकातून सुद्धा प्रचलित चळवळींचा सूर काढण्याच्या चातुर्याबद्दल नाटककारास धन्यवाद द्यावा. परतु जेथे ध्वनि निघत नसेल तेथे सुद्धा तो असल्याचे हट्टाने प्रतिपादन करून मग तो प्रत्यक्षाशीं विसगत असल्याबद्दल हाकाटी करावयाची हे अरसिकपणाचे होय.

## ३

[ वरील दोन लेखाकातील मजकूर काहीसा अपुरा वाटल्यामुळे लेखकानी प्रस्तुत पुस्तक तयार होण्याच्या वेळीं अधिक मजकूर लिहिला, तो पुढे दिला आहे. ]

[ एप्रिल १९४१ ]

नाट्यकलेचा परमोत्कर्ष मराठीमध्ये खाडिलकराच्या नाटकात झालेला दृष्टीस पडतो; आणि खाडिलकरांच्या साहित्यक्षेत्रातील तपश्चर्येचें

तेज पुंजीभूत झालेलें व चिरस्थायी स्वरूपांत साठविलेलें असें त्याच्या नाटकां-मध्येच दृष्टीस पडतें. त्याची कला त्याच्या तपस्वितेशीं एकरूप झालेली येथे दिसून येते आणि तपस्विता कलासौंदर्याने सजून आविर्भूत होते.

तपस्वितेचे एवढे गौरव करावें, असे तप तरी खाडिलकरानी कोणते केले होते? शरीराच्या व मनाच्या शक्ति एकवटून त्याना ध्येयाप्रीत्यर्थ राबविणे याचेच नाव तप. अर्थात् ध्येयासाठी आत्मदान, आत्मविस्मृति हे तपाचे एक मुख्य लक्षण होय, आणि तेच खाडि-लकराच्या कलेला उत्तम रीतीने लागू पडते. खाडिलकराच्या लिखाणाचा प्रकृतिस्वभावच असा आहे की त्यात आत्मनिष्ठता, आत्मपरता कोठे आढळावयाची नाही. गडकऱ्याचीं नाटके वाचूं लागलों म्हणजे त्यातील पात्राच्या तोंडून गडकरीच बोलत आहेत, असा भास झाल्याखेरीज राहत नाही. त्याचे लिखाण आत्मपर आहे. घनश्याम, वृंदावन वगैरे गडकऱ्याचीं खलपात्रे म्हणजे गडकऱ्याना जगाच्या आलेल्या कटु अनुभवाच्या भावनात्मक प्रतिक्रिया वाटतात. ‘जगातील कोणाही माणसाने मजवर कधीही दया केली नाही तर मी दुसऱ्याला दया काय म्हणून दाखवावी?’ असे बोलणाऱ्या घनश्यामाच्या तोंडून गडकऱ्याचे चिडलेले मन आपली भावना ओकीत आहे, असा भास आपणास झाल्याखेरीज राहत नाही. जयंतासारख्या भूमिकेच्या द्वारा आपल्या दबलेल्या उत्कट भावनाना गडकरी वाव देतात, तर सुधाकर, वृंदावन, घनश्याम इत्यादि खल वा खलसम पात्राच्या भाषणातून गडकऱ्याना जगाविषयी वाटणारा त्वेष, संताप, चीड इत्यादि विकाराचे पडसाद उमटतात. याच्या उलट जगा-कडे पाहण्याची खाडिलकराची दृष्टि आत्मनिरपेक्ष आहे. त्यामुळे त्याचे लिहिणे नेहमी वस्तुनिष्ठ किंवा विषयनिष्ठ असते. त्यानी निर्मिलेल्या भूमिकाच्या उद्गारात किंवा मनात कितीही खोल जरी तुम्ही शिरलात तरी त्यात खाडिलकराचा कोठे थाग पत्ता लागावयाचा नाही. त्याची प्रत्येक भूमिका, ती ज्या प्रसंगात असेल त्या प्रसंगाला आणि तिच्या स्वतःच्या स्वभावाला अनुरूप असें जें असेल, तेवढेच बोलेल. अल-कारिक व भावनात्मक भाषणाचा पसारा माडून त्यात अतृप्तीच्या असंतोषाने जळत असलेल्या आपल्या मनाच्या विकृत कल्पनाना स्वैर

संचार करण्यास मोकळे सोडावयाचें असें खाडिलकरांच्या हातून कधी होणार नाही. म्हणूनच त्यांचीं खलपात्रे काय, नायक काय व नायिका काय, सर्व आपआपल्या प्रकृतीनुसार, उद्देशानुसार अथवा ध्येयानुसार वागणारी वेचक माणसे अशींच वाचकास भासतात. त्याच्यात कित्येक वेळा कृत्रिमता आढळेल, अतिशयोक्ति आढळेल, तत्त्वानुसंधानाचा अतिरेकही दृष्टोत्पत्तीस येईल; परतु खाडिलकराच्या व्यक्तिगत भावनाचे नाद त्याच्यामधून आपणास कोठे ऐकू येणार नाहीत. एकदा कथानक, त्यातील भूमिका, त्यातील प्रतिपाद्य तत्त्वें वगैरे निश्चित केल्यानंतर खाडिलकर हे आपल्या निर्माण होऊ घातलेल्या नाट्यकृतीहून निराळे असे राहतच नाहीत. आपले स्वत्व ते आपल्या कलेमध्ये विलीन करून टाकतात. कलावंताचा हाच खरा योग, हीच समाधि होय. ही विषय-निष्ठा किंवा आत्मविस्मृति सहजसाध्य नाही. म्हणूनच, रस्किनच्या म्हणण्याप्रमाणे अशा आत्मविलोपी कलावंताना श्रेष्ठ गणले जाते.

कलाकाराच्या तीन पायऱ्या आपल्याला त्याच्या वृत्तीनुसार कल्पिता येतात. ज्याच्या भावनाना उत्कटता व अभिजातता कशी ती नसतेच, ते कलावंत पहिल्या पायरीवरचे होत. अशा लोकाचे लेखन वस्तुनिष्ठच असते, परंतु त्यात जीव नसतो; त्यातील नाद पोकळ असतो. या कोटीतल्या नाटककाराची नाट्यनिर्मिति म्हणजे जवळजवळ कळसूत्री बाहुल्याचा खेळ होऊन बसतो. ज्याची भावना उत्कट व संवेदना-शक्ति तीक्ष्ण असते ते अर्थात याच्यापेक्षा वरच्या दर्जाचे होत. आपल्या भावनाच्या आविष्कारामुळे ते रसिकाचीं मने हालवून सोडतात. परंतु आपल्या उत्कट भावनाच्या मोहजालात ते गुंतून राहतात; त्यामुळे त्याचें लेखन आत्मपरतेच्या उन्मादक गंधाने परिलिप्त असे निर्माण होते. त्याची पात्रे वाजवून पाहिलीं तर त्याना घडविणाऱ्याच्या भावनाचा नाद त्यांतून ऐकू आल्याखेरीज राहणार नाही. आध्यात्मिक भाषेत बोलावयाचें तर असे कलाकार हे ‘ अहंकारविमूढात्मा ’ बनतात; त्याच्या कलाकृती-मध्ये त्याचा अहंकार कमजास्त प्रमाणाने, अनुस्यूत झालेला असतो.

ज्याच्या भावना उत्कट आहेत, संवेदनाशक्ति तीक्ष्ण आहे, परंतु ज्यानी आपल्या भावनाचें संयमन करून त्याना व्यापक व उन्नत

(sublimated) बनविले आहे, ते याहीपेक्षा वरच्या दर्जाचे कलाकार होत. याच्या भावना इतक्या उन्नत व समर्थ झालेल्या असतात की आपल्या व्यक्तित्वाचा आग्रह त्याच्या ठिकाणीं राहत नाही. हे कलाकार स्वतः निर्मिलेल्या कलाकृतींतील विविध व्यक्तींशीं किंवा प्रसंगाशीं इतके समरस होऊं शकतात की तेवढयापुरतें त्याचें व्यक्तित्व त्या कृतींत विलीन होते. आणि मग आपण निर्मिलेल्या व्यक्तींना आणि प्रमेयाना स्वस्वभावानुसार वागू देणे आणि आपण त्याचा तो खेळ सकौतुक तटस्थ वृत्तीने पाहत बसणे इतकेच त्याचे काम उरते. एकदा आपल्या प्राणाची शक्ति वेचून नवीन जीव निर्माण केल्यावर तो जीव आपल्या अंतर्गत प्रेरणेनुसार विकसित होत असता त्याच्या लीला कौतुकाने अवलोकन करणे, हेच पित्याचे कर्तव्य होऊन बसते. कलाकाराची इतिकर्तव्यता याहून फारशी भिन्न नसते. कलाकाराची निर्माता ही पदवी अशाच ठिकाणीं सार्थ ठरते. इतर कलाकार आविष्कर्ते होत; ते आत्मभावनाचे आविष्करण करतात, मग ते कितीही मनोहर रीतीने केलेले असो. निर्माता जो आहे, तो स्वतःचें चैतन्य ओतून स्वतःहून अलिप्त, स्वतःपेक्षा गुणधर्मांनी भिन्न, अशी कलाव्यक्ति निर्माण करितो. आध्यात्मिक कल्पना कलाविषयक विवेचनात आणणे जर गैर नसेल—आणि ते गैर वाटण्याचें काहीच कारण नाही—तर पुनः भगवद्गीतेतील पुढील वर्णन अशा कलाकारास यथार्थतेने लागू पडते असे आपण म्हणूं शकूं:—

तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः
गुणा गुणेषु वर्तन्ते इति मत्वा न सज्जते ॥ ३. २८

'आपण निर्मिलेल्या कलाकृतींतील व्यक्तीचे गुण आणि कर्में हीं दोन्ही आपल्यापासून भिन्न आहेत हे तत्त्व जाणणारा, गुणाचा हा आपआपसात खेळ चालला आहे असे समजून, त्यात आसक्त होत नाही.'

खाडिलकर हे असे तत्त्ववित् कलाकार आहेत. त्यानी निर्मिलेल्या भूमिका त्यांचीं मतें व तत्त्वे बोलत नाहीत, असे नाही. परंतु तीं मतें व तत्त्वें आणि त्या त्या भूमिकाचे ते ते स्वभावविशेष त्या

कथेचे आवश्यक घटक बनलेले असतात. आपआपल्या स्वभावाचे गुणधर्म आणि व्यापक प्रमेयाची विकासकारक प्रेरणा इतकी सामग्री घेऊन ती कलाकृति आपले जीवनध्येय, आपली अखेरी, आपल्या स्वतःच्या चैतन्यशक्तीनेच साधिते. एवढी सामग्री आपल्या कला-संतानाला दिल्यानतर मग त्याच्या अंगोपागांमध्ये आपले व्यक्तित्व, आपल्या व्यक्तिगत भावना याचा दुरून सुद्धा स्पर्श आपल्या स्वयंप्रभ कलाकृतीला खाडिलकर होऊ देत नाहीत.

ही वस्तुनिष्ठता, हा आत्मविस्मृतीचा योग मोठ्या प्रतिभा-वंतालाच साधतो, हे जरी खरे असले तरी श्रेष्ठ प्रतिभेचे हे लक्षण इतके सुपरिचित व सर्वसामान्य आहे की त्याची उदाहरणे कला-विवेचकाच्या डोळ्यापुढे नित्य नाचत असतात, असे म्हटल्यास चिंता नाही. नाटककारातच पाहावयाचे झाले तर शेक्सपियर हा वस्तुनिष्ठ कलावंताचा मेरुमणि म्हणून तेव्हाच डोळ्यापुढे उभा राहतो. आधु-निकात जेम्स मॅथ्यू बॅरी हा असाच आत्मविलोपी वस्तुनिष्ठ नाटककार होऊन गेला. शेक्सपियरच्या नाटकावरून त्याचे चरित्र, त्याचे व्यक्तित्व, त्याच्या मनोवृत्ति, याचा तलास काढू पाहणाऱ्या टीकाकाराची कशी दमछाक होते, हे सुप्रसिद्धच आहे. तो दुष्टाबरोबर दुष्ट, धर्ताबरोबर धूर्त, सुजनाबरोबर सुजन, बावळटाबरोबर बावळट इतक्या बेमालूम रीतीने होतो, की त्याच्या स्वतःच्या अंतःकरणाचा कोठेच पत्ता लागत नाही. खाडिलकरानी निर्मिलेल्या भूमिका व कथावस्तु याच्याविषयीही तसेच म्हणता येईल. केशवशास्त्री व पिलाजीराव याच्यासारखे आपस्वार्थी नीच, कीचकासारखे सत्तामदाध, रुक्मीसारखे जातिमदाध, दुर्योधनासारखे हावभरू व परोत्कर्षासहिष्णु, विश्वामित्रासारखे स्वतः चचल व तत्त्वशून्य असल्यामुळे दुसऱ्याच्या तत्त्वनिष्ठेविषयी असूया बाळगणारे, असे अनेक प्रतिनायक त्यांनी जितक्या सफाईने व अलिप्त वृत्तीने निर्माण केले आहेत, तितक्याच सफाईने त्यानी प्रतापरावासारखे तडफदार, परंतु धोपटमार्गी व अविवेकी देशभक्त, सवाई माधवरावासारखे विचारवान् परंतु विकारवश व संशयी तरुण, कंकभटासारखे धर्माधर्मविवेचक, रामशास्त्र्यासारखे निःस्पृह राष्ट्रनेते, हरिश्चंद्रासारखे सत्यप्रतिज्ञ सम्राट,

कचासारखे निग्रही व त्यागी राष्ट्रसेवक, रामासारखे सत्य–अहिंसेचे उपासक, अशा विविध प्रकारच्या नायकाच्या कृतिमान् चारित्र्याचे भव्य चित्रपट त्यानी प्रेक्षकाच्या डोळ्यापुढे उभे केले आहेत. स्त्रीभूमिकाची चित्रे वठविण्यातही त्याचा तितकाच हातखडा आहे. इतिहासातील आनंदीबाईचे चित्र बरेच अस्पष्ट व सामान्य आहे. जावाजावांमधील ईर्ष्या व असूया या भावनांना बळी पडलेली एक जहाबाज व उलाढाली बायको, यापेक्षा तिच्या स्वभावधर्माचा उलगडा इतिहासात अधिक होऊं शकत नाही. या आनंदीबाईचे सागोपाग व खरेखुरे दर्शन आपल्याला खाडिलकराच्या 'भाऊबंदकी'मध्येच घडते. तिची महत्वाकाक्षा, तिचे धोरण, तिची राजकारणपटुता, आणि या सर्व गुणाचा गृहकलह निर्माण करून स्वतःची एकतंत्री सत्ता वाढविण्याकडे ती करीत असलेला उपयोग याचे इतके हृदयवेधक चित्र वाचकाच्या मनावर उमटते की जणूं काही त्या काळच्या महाराष्ट्रात आपण असून आनंदीबाई प्रत्यक्ष आपल्या डोळ्यासमोर वावरते आहे, किंबहुना तिचे अंतर्याम कोणी मानसशास्त्रज्ञ आपणासमोर उघड करून दाखवितो आहे, असा भास झाल्याखेरीज राहत नाही. द्रौपदी, भामिनी, देवयानी, तारामती, रुक्मिणी, मेनका या खाडिलकराच्या नायिकाही कमी कौशल्याने रेखाटलेल्या आहेत, असे नाही. मराठी नाट्यवाङ्मय जिवत, उठावदार व मानवतायुक्त स्त्रीभूमिकाच्या बाबतींत काहीसे दरिद्रीच आहे. अस्वाभाविक, अतिरेकी भावनावडबराने भारावलेल्या 'सिंधु' छाप किंवा 'वसुंधरा' छाप भूमिकाची मराठी नाटकात लयलूट आहे. आर्य स्त्रियाच्या मानीव सद्गुणाची पोपटपंची करणाऱ्या मृत्पिडवत् स्त्रीपात्राचीही मराठी नाट्य-वाङ्मयात वाण नाही. खाडिलकराची स्त्रीसृष्टि अशी अस्वाभाविक, कृत्रिम व निर्जीव वाटत नाही, याचे कारण स्वत्व विसरून कथावस्तूमध्ये व तदंगभूत भूमिकामध्ये तन्मय होऊन जाण्याची त्याची पात्रता हेच होय.

परतु शेक्सपियरची वस्तुनिष्ठता आणि खाडिलकराची वस्तु-निष्ठता यामध्ये एक मोठाच फरक आहे आणि त्या फरकामध्येच खाडिलकरांचें अलौकिकत्व सामावलें आहे. शेक्सपियरचें व्यक्तिनिर्माण-

कौशल्य अप्रतिम आहे, हें खरें. परंतु नानाविध वैचित्र्यपूर्ण व्यक्ति निर्माण करण्यात त्याची वृत्ति बव्हंशी खेळकरपणाची आहे. प्रकृति (मनुष्यस्वभाव) आणि नियति याचा नानाप्रकारचा झगडा दाखवून प्रकृति ही नियतीपुढे कशी पगु ठरते, अर्थात मनुष्य हा सर्वशक्तिशाली नियतीच्या हातातले खेळणे कसे आहे, हे दाखविण्याचा त्याचा कदाचित हेतु असावा. परंतु हा हेतु आपण मानला तर आहे, नाही तर नाही. तो त्याच्या कृतीवरून स्पष्टपणे व्यक्त होतो, व तो लक्षात घेतल्याखेरीज त्याच्या कृतीचा आस्वाद पूर्णपणे घेता येणार नाही असे मुळीच नाही. आणि हा हेतु मानला तरी तो केवळ व्यक्तींसच लागू पडणारा आहे. व्यक्तीच्या स्वभावधर्मानुसार तिच्या हातून कशी कृति घडून येते व त्या कृतीचा परिस्थितीवर परिणाम घडून येऊन त्याची प्रतिक्रिया व्यक्तीस कशी भोगावी लागते, हे शेक्सपियर उत्कृष्ट रीतीने दाखवितो. व्यक्तीव्यक्तींमधला भावनाचा, हेतूचा व उपजत स्वभावगुणाचा खेळ वा संघर्ष उत्तम रीतीने रंगवावा असा शेक्सपियरनेच. परंतु व्यक्ति ही समाजाची घटक आहे आणि समाजधारणेला उपयुक्त अशा तत्त्वाचे पालन करण्याची तिजवर जबाबदारी असून त्या जबाबदारीचे पालन न झाल्यास केवळ व्यक्तीपुरताच नव्हे, तर सर्व समाजास व्यापील असा अनर्थ घडून येतो, याची जाणीव शेक्सपियरला नाही. त्याचे राजे महाराजे, प्रिन्स, ड्यूक व लार्ड हे सर्व आपल्या वैयक्तिक महत्वाकाक्षा, प्रेमसंबंध व सुखदुःखे यामध्ये चूर असतात व याच्या क्रिया-प्रतिक्रियामुळेच त्याच्या नाटकाचें कथानक उद्भवत असतें. शेक्सयियरच्या वेळीं समाजनिष्ठ विचारसरणीचा प्रादुर्भाव झालेला नसल्यामुळे त्याने निर्मिलेल्या भूमिकामध्ये सामाजिक जबाबदारीची जाणीव दिसून येत नाही, यात नवल नाही. परंतु त्याच्यानंतर तीनशें वर्षे लोटून गेलीं असूनही, आमच्या मराठी नाटककारामध्ये समाजनिष्ठ विचारसरणीचा प्रादुर्भाव बहुशः झालेला दिसून येत नाही, याचें मात्र नवल करावयास पाहिजे. गेल्या पन्नास साठ वर्षांत इंग्लंडांत व इतर सर्व युरोपीय राष्ट्रात निर्माण झालेल्या नाट्यवाङ्मयावर समाजनिष्ठ विचारसरणीचा जबरदस्त पगडा बसलेला दिसून येतो. परंतु आम्हाला एका

शेक्सपियरचें तेवढें निधान लाभल्यावर आम्ही त्यालाच घेऊन त्याचें अनुकरण करण्यांत चूर झालों. खुद्द आपल्याच काळामध्ये नाना रचनाप्रकारानी आणि भिन्नभिन्न तत्वविचारांनी पल्लवित होत असलेल्या पाश्चात्त्य देशातील नाटयवाङ्मयाकडे परवापरवापर्यंत आपले लक्ष गेलें नव्हतें.

खाडिलकराचें अलौकिकत्व हेच की चाळीस वर्षांपूर्वी, म्हणजे आधुनिक पाश्चात्त्य नाटयवाङ्मयाची आपल्याकडील लोकास कल्पनाही नव्हती अशा काळीं, समाजनिष्ठ विचारसरणीचा व राष्ट्रोद्धारक तत्त्वज्ञानाचा तेजोदीप आपल्या नाटकामध्ये उभारून त्यानी समाजमनास उद्दीपित केले. हा प्रकार त्यानी इतक्या प्रभावशाली परतु बेमालूम रीतीने केला आहे की त्याच्या कलेचे खरे रहस्य यातच आहे असे कोणाही टीकाकारास म्हणावेसें वाटेल. सामाजिक विचाराचे व तत्त्वज्ञानाचे प्रतिपादन नाटकातून करण्याची ही क्लृप्ति त्यानी पाश्चात्य नाटयवाङ्मयावरून घेतली असे मुळीच दिसत नाही. इंग्रजी अगर पाश्चात्त्य नाटयाचा त्याचा व्यासग शेक्सपियरची कास सोडून इब्सेन, शॉ प्रभृति समकालीन नाटयाचार्यापर्यंत येऊन पोचला होता, असे म्हणण्यास पुरावा नाही. खेरीज, इब्सेनप्रभृतीची व खाडिलकराची पद्धतिही अगदी भिन्न आहे. तेव्हा खाडिलकरानी अवलंबिलेली पद्धत ही त्याच्या स्वतंत्र प्रतिभेची द्योतक होय, असे विधान निश्चितपणे करण्यास हरकत नाही.

खाडिलकरानी नाटके लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वी पौराणिक व ऐतिहासिक नाटके नव्हती असे नाही. पौराणिक प्रकारामध्ये किर्लोस्कराचा नमुना सर्वापुढे होता. ऐतिहासिक प्रकारामध्ये नारायण बापूजी कानिटकर प्रभृतींनी रचना केलेली असून ती आपआपल्या परीने लोकप्रियही होती. हे दोन रूढ असलेले प्रकार हाताशी घेऊनच खाडिलकरानी आपल्या प्रतिभासामर्थ्याच्या बळावर त्याना आपल्या तत्त्वज्ञानाचे व विचारसरणीचे वाहक बनविले. खरा प्रतिभाशाली पुरुष साधनाकरिता तंडत किंवा कुचबत नाही. जरूर पडल्यास स्वतःचे नवीन साधन निर्माण करण्याची धमक त्याच्या अगीं असते; तथापि तशी जरूर नसेल,

तर असलेलीं साधनें हातार्शी घेऊन आपले कार्य सुरू करण्यास त्याची केव्हाही तयारी असते. खाडिलकरानी नाटकाच्या दृष्टीने उपयुक्त, म्हणजे ज्याच्यामध्ये संघर्षाचीं स्वभावसिद्ध बीजे असून भूमिकाच्या व्यक्तित्व-दर्शनास भरपूर वाव मिळण्याजोगा आहे, अशी ऐतिहासिक व पौराणिक कथानके निवडलीं; आणि त्या कथानकातील संघर्ष, जो मुळात केवळ वैयक्तिक स्वरूपाचा होता, त्याला तात्त्विक स्वरूप देऊन दोन परस्पर-विरोधी राजकीय वा सामाजिक विचारसरणींमधील कलहाचे स्वरूप त्याला दिले. स्वतंत्र काल्पनिक कथानक निर्माण करण्याइतकी कल्पकता खाडिल-कराच्या ठायी नव्हती म्हणून त्यानी आयती तयार कथानके घेतलीं असें क्वचित् कोठे अधिक्षेपपूर्वक ध्वनित केले जाते. हा ध्वनि सर्वस्वी चुकीचा आहे, हे 'काचनगडची मोहना', 'मानापमान' या उत्कृष्ट नाटकाचीं कथानके सर्वस्वी स्वतंत्र आहेत यावरून सिद्ध होतच आहे. परंतु अशा तऱ्हेचा आक्षेप ज्याच्या मनात वागत असेल त्याना सामान्यतः नाट्यकलेचे व विशेषतः खाडिलकराच्या कलाचातुरीचे हृद्गत नीट आकलन झाले नाही असे म्हणणे प्राप्त आहे. पौराणिक व ऐतिहासिक कथानकाचा स्वीकार खाडिलकरानी केला यात त्याचा कोणत्याही प्रकारचा कमीपणा नसून त्या योगाने त्याची प्रज्ञा व त्याचे कलाविषयक तारतम्य हेच उत्कृष्ट रीतीने व्यक्त झाले आहे. सुपरिचित पौराणिक व ऐतिहासिक कथानके घेण्यात खाडिलकरानी दोन गोष्टी साधल्या आहेत. कथानकाच्या सुपरिचितत्वामुळे त्यात ओतले गेलेले राजकीय व सामाजिक तत्त्वज्ञान वाचकाना वा प्रेक्षकाना आकलन करण्यास सुलभ झाले. नाही तर, अगोदर कथानक व त्यातली पात्रे याचे आकलन करण्या-साठी प्रेक्षकाना आपल्या बुद्धीला श्रम द्यावे लागून त्यावर आणखी कथा-नकात गुंफलेल्या तात्त्विक विचाराचे स्वरूप, महत्त्व व औचित्य लक्षात आणण्यास बुद्धीला अधिकच ताण द्यावा लागला असता. कथानके व त्यातील प्रमुख भूमिका वाचकास परिचित असल्यामुळे त्या समजून घेण्याकरिता करावा लागणारा बौद्धिक प्रयत्न मुळातच वाचला. कीचक हा कोण होता, त्याने कोणता अत्याचार केला व त्याचे त्याला काय फळ मिळाले हे वाचकास अगोदरच माहीत असल्यामुळे त्याचा स्वभाव

कसा होता, त्याच्या वागणुकीच्या बुडाशीं कोणचीं तत्त्वें होतीं व त्या तत्त्वाचे समर्थन त्याने कसे केले हें पाहण्याकडे वाचकाचे लक्ष साहजिक व सुलभतेने वळते. नाटकात अनुस्यूत केलेले तत्त्वज्ञान व त्यातील प्रमेय याकडे वाचकाचे व प्रेक्षकाचे लक्ष शक्य तितक्या जोमाने व तत्परतेने खेचले जावे, असे नाटककारास नेहमीच वाटत असते. खाडिलकराच्या योजकतेमुळे त्याचा हा हेतु अनायासेच सिद्धीस गेला आहे.

ऐतिहासिक व पौराणिक कथानके घेतल्याच्या योगाने साधलेली दुसरी गोष्ट म्हणजे आपल्या प्रतिपाद्य विषयाला व तत्त्वज्ञानाला भव्य, उदात्त, अशकनीय व वचक उत्पन्न करणारे असे अधिष्ठान खाडिल-करानी प्राप्त करून दिले आहे, ही होय. बायको बाहेरगावीं गेली किंवा बाळंतीण असली म्हणजे, किंवा असे काही कारण नसताना सुद्धा, स्वयंपाकिणीचा अगर मोलकरणीचा अभिलाष करणारे लोक आमच्या समाजात किती तरी असतील—आहेत असल्याच कथाबीजाचा विस्तार करणारीं नाटके अगर कादबऱ्या मराठीत कित्येक झाल्याही आहेत. परतु असल्या एखाद्या नादान खर्डेघाशाला हाताशी धरून कीचकाच्या ऐवजी त्याचे कथानक खाडिलकरानी रंगविले असते तर काय बहार झाली असती याची कल्पना करणे अवघड नाही. कीचकासारखा प्रतापी पौराणिक वीर खाडिलकरानी हेरला; व त्याने स्वपराक्रमाने मत्स्य देशाचे राज्य निष्कटक केले, सम्राट कौरवेश्वराने त्याला पाचारण करून त्याला 'द्रौपदीपति' ही पदवी देऊन त्याचा बहुमान केला वगैरे वर्णनाच्या योगाने त्याच्या स्वबाहुबलावर आधारलेल्या उद्दाम अरेरावी-पणाची भूमिका सिद्ध केली, म्हणूनच त्याच्या तोडी " आणि अन्नच काय, जगातील सुखोपभोगाचे सर्व पदार्थ मजकरिता आहेत..... .. ज्याच्या बाहुबलाने राजे, महाराजे, अधिराजे उत्पन्न होतात, हुकमाचे शब्द ज्याच्या मुखातून निघण्याचा अवकाश की त्याबरोबर अभिषिक्त राजे, महाराजे, अधिराजे ह्याना आपल्या वडिलोपार्जित सिंहासनावरून नेमूटपणे खाली उतरावे लागते,...असल्या मजसारख्या वीर पुरुषाच्या पुढे विश्वातील सर्व सुखोपभोगाचे पदार्थ हात जोडून सेवेला तत्पर उभे राहिले पाहिजेत" असे गर्वोद्धत उद्गार व या उद्गारास साजेसे

"राज्यकर्ते ते राज्यकर्ते, आणि दास ते दास; हा भेद नेहमी लक्षात ठेवला पाहिजे" हें तत्त्वज्ञान ते घालूं शकले. अशा सत्तामदांध म्हणून पूर्वपरिचित असलेल्या महत्त्वाच्या पौराणिक व्यक्तीच्या तोंडीं असें तत्त्वज्ञान घातलें म्हणूनच ते समर्पक ठरलें व समर्पक ठरले म्हणूनच तें परिणामकारक झाले. अशाच रीतीने द्रौपदी, कंकभट, हरिश्चंद्र, विश्वामित्र, रुक्मिणी, रुक्मी, राम, मंथरा, विश्वामित्र, मेनका, कच, देवयानी, इ० पौराणिक भूमिकांच्या तोंडीं, त्यांच्या स्वभावधर्मास, परिस्थितीस व प्रसंगास साजेसे विचार घालून आपल्या राजकीय व सामाजिक तत्त्वज्ञानाचे पैलू खाडिलकरानी व्यक्त केले आहेत. त्यानी घेतलेल्या पौराणिक भूमिका सर्वच उच्च पातळींतल्या, वैभवशाली, समाजनियमनाचा अधिकार अगर समाजास धडा घालून देण्याची जबाबदारी ज्यास त्यांच्या उच्च पदवीमुळे प्राप्त झाली आहे, अशा आहेत. आणि त्या अशा असल्याचे समाजमनाने अगोदरच मान्य केलेले आहे. अशा व्यक्तींच्या तोंडीं खाडिलकरानी घातलेली समाजधारणेचीं व समाजनियमनाचीं भिन्न भिन्न प्रमेये अगदी स्वाभाविक वाटतात व शोभून दिसतात. त्या त्या प्रसंगामध्ये त्या त्या व्यक्तीने अशा तऱ्हेनेच विचार केला असला पाहिजे, असे आपण सहज मानूं शकतो. अशा रीतीने, भव्य, उदात्त व समाजजीवनाच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचीं तत्त्वे तितक्याच महत्त्वाच्या व प्रभावशाली व्यक्तींच्या तोंडी घातल्याकारणाने त्यांचा जोड अगदी बरोबर जमला आहे, इतकेंच नव्हे, तर परस्पराची शोभा परस्परामुळे वृद्धिंगत झाली आहे. तत्त्वाचा व प्रमेयाचा आविष्कार अधिक भव्यतेने व परिणामकारक रीतीने झाला आहे, आणि व्यापक प्रमेयाच्या प्रतिपादनामुळे भूमिकांच्या भव्यतेत, प्रभावशालित्वात मोठीच भर पडली आहे.

तत्त्वप्रतिपादनाच्या भव्यतेच्या जोडीला भूमिका व त्यांचीं कृत्ये यांचीही भव्यता व विशालता असली पाहिजे, ही अपेक्षा खाडिलकरांच्या मनात इतकी खोल घर करून बसलेली दिसते, की लहानसान बाबतींत सुद्धा तिचा प्रभाव दृष्टीस पडल्याखेरीज राहत नाही. एकदोनच उदाहरणावरून ही गोष्ट वाचकास पटविता येईल. 'सत्त्वपरीक्षे'च्या

पहिल्याच प्रवेशात तारामतीने रत्नपालापासून घेतलेल्या कंठयाबद्दलची वाटाघाट असून त्याबरोबरच हरिश्चन्द्राची सत्यप्रतिज्ञेची दवंडी आलेली आहे. सत्यव्रताची दवंडी पिटली जात असतानाच तारामतीवर आपलें बोलणे खरे करण्याची पाळी येते व ती खऱ्या कंठयाबद्दल वीस लाख व खोटया कंठयाबद्दल वीस लाख रुपये रत्नपालाला देऊं करते! हरिश्चंद्राची सत्यव्रताची प्रतिज्ञा जितकी भव्य व बिकट तितकी कंठयाची किंमतही प्रचंड व अकटोविकट! दुसरे उदाहरण 'मानापमाना'त आहे. तेथे तर संपत्तीच्या प्रदर्शनाचा विषय मुख्य आहे. तेव्हा तेथे पैशाच्या प्रचंड रकमाचा नुसता खेळ माडला असल्यास त्यात नवल नाही. विलासधराचे उत्पन्न पंचवीस लाखाचे तर लक्ष्मीधराचे चोवीस लाखाचे. अर्थात धैर्यधराला जहागीर मिळाली ती त्याच्यावर ताण करण्याकरिता पन्नास लाखाची तरी असावयास पाहिजेच! त्यात त्याच्या निःस्पृहतेचे प्रदर्शन करण्यासही वाव मिळून त्याच्या दिलदारपणामुळे ती जहागीर पन्नास लाखांची पचवीस लाखावर आणल्याचे वर्णन करिता आले, हा आणखी एक फायदा!

तात्पर्य, आपल्या भव्य तत्त्वज्ञानास साजेशा प्रभावशाली व उच्चपदस्थ पौराणिक व्यक्ति नाटकासाठी निवडल्यामुळे एकंदर जोड चागला जमून खाडिलकराच्या पौराणिक नाटकाचा उठाव चागला झाला आहे. ऐतिहासिक नाटकाची गोष्टही अशीच आहे. परंतु या बाबतींत अनेकवचनी प्रयोग करण्यास फारशी जागा नाही. त्याचीं खरींखुरीं ऐतिहासिक नाटके दोन; 'सवाई माधवराव याचा मृत्यु' आणि 'भाऊबदकी'. वस्तुतः काल्पनिक, परतु ऐतिहासिकाबरोबर गणण्याजोगीं आणखी दोन नाटके आहेत: 'काचनगडची मोहना' आणि 'प्रेमध्वज'. पैकी 'प्रेमध्वज' हें नाटक अव्वल दर्जाचा नाटककार प्रसंगी तिसऱ्या चौथ्या दर्जाचेही नाटक लिहू शकतो हे दाखविण्यासाठी उदाहरण म्हणूनच उपयोगी पडण्याजोगे आहे. त्याचा विचार सोडून दिला असता उरलेल्या तीहीपैकी 'भाऊबंदकी' हेच काय ते हमखास तत्त्वप्रतिपादक असे नाटक आहे. बाकीचीं दोन नाटके या नात्याने उत्कृष्ट आहेत. त्या दोन्हीही मराठी भाषेतल्या उत्तमापैकी शोकान्तिका (tiagedies)

आहेत. परंतु त्या दोन्हींमध्ये तत्त्वप्रतिपादनाचा हव्यास मर्यादित स्वरूपात आहे. समाजधारणेच्या किंवा माणसामाणसामधील वागणुकीच्या परस्परविरोधी तत्त्वाचा संघर्ष निर्माण करून त्या संघर्षाला कथानकाचा प्राण किंवा केन्द्रबिन्दु बनविण्याचो खाडिलकराची विशिष्ट खुबी या नाटकात निदर्शनास येत नाही. सवाई माधवरावाचा नाश पाताळयंत्री फितुरीमुळे झाला. परंतु फितुरी हे काही तत्त्व नव्हे! एका बाजूने केशवशास्त्र्याचा माधवरावाचे मन बिघडविण्याचा फितुरी उद्योग व दुसरीकडे नाना फडणिसाची कडक जपणूक या दोहोंच्या कैचीत सापडल्यामुळे माधवराव बेफाम व बेभान होतो. परंतु ही क्रिया-प्रतिक्रिया केवळ वैयक्तिक स्वरूपाची आहे. या नाटकाला देखील सामाजिक अधिष्ठान आहे आणि त्याचे वर्णन पूर्वीच्या लेखाकात केलेलेच आहे परंतु नाटकातील सघर्ष हा तत्त्वातत्त्वामधील सघर्ष नसून वैयक्तिक गुणावगुणाचा संघर्ष आहे. 'काचनगडच्या मोहने'ची गोष्ट जवळजवळ तशीच आहे. त्यात वैयक्तिक स्वार्थाकरिता राष्ट्राच्या राजकीय उद्धाराच्या प्रयत्नाचा दगलबाजीने घात करण्यास आपल्यातलेच नीच लोक कसे प्रवृत्त होतात हें दार्खावले असल्यामुळे व्यापक अशा राष्ट्रीय विचाराचा ठसा वाचकाच्या मनावर उमटतो, हे खरे. तथापि त्यात परस्परविरोधी दोन सामाजिक प्रमेयाचा संघर्ष दर्शविलेला आहे असे म्हणता येत नाही. तेव्हा 'सवाई माधवरावा'प्रमाणे 'काचनगडची मोहना' हीही मुख्यतया व्यक्तिस्वभावामुळे घडून आलेली शोकान्तिका ( character tragedy ) मानली पाहिजे. सवाई माधवराव व प्रतापराव हे स्वतःच्या स्वभावदोषामुळे त्याना घेरू पाहत असलेल्या दारुण नियतीच्या अधीन होतात.

'भाऊबदकी' हे मात्र खरेखुरे तत्त्वप्रतिपादक ऐतिहासिक नाटक म्हणता येईल. एकतत्री राज्यसत्ता फार माजली म्हणजे ती स्वार्थलपट व पापी बनते; असे झाले म्हणजे जनतेला देखील आकुचित स्वार्थापरते ध्येय उरत नाही व त्यामुळे गृहकलह निर्माण होऊन समाज सडून जातो; या थराला समाज आला म्हणजे अंत.कलह माजविणाऱ्या पापी राजसत्तेला दूर करून बारभाईची–पचाची–निःस्पृह, त्यागी, ध्येयदर्शी राष्ट्रनेत्याची

सामुदायिक सत्ता प्रस्थापित केली पाहिजे; हे तत्त्व या नाटकात प्रतिपादन करण्याचा प्रयत्न नाटककाराने केला आहे. रामशास्त्री, बापू याच्या मुखाने या नाटकात बारभाईचे तत्त्व तर वदविले आहेच, परंतु आनंदीबाईच्या मुखाने स्वार्थी एकतत्री राज्यसत्तेचे तत्त्व बोलत आहे हेही लक्षात ठेवले पाहिजे.

ही तत्त्वप्रतिपादनाची प्रक्रिया खाडिलकराच्या पौराणिक नाटकात भरास आलेली दिसते, हे सुप्रसिद्धच आहे. १९०७ साली प्रसिद्ध झालेल्या 'कीचकवधा'पासून तो १९३३ साली अवतरलेल्या 'संगीत सावित्री'पर्यंत ही ध्येयदर्शी व तत्त्वप्रतिपादक नाटकाची परपरा चालत आलेली आहे. तत्त्वप्रतिपादनाच्या या हव्यासामुळे उत्तरोत्तर खाडिलकराच्या नाट्यकृतींना कृत्रिमपणा व बोजडपणा येत चालला असे कित्येक टीकाकाराचे म्हणणे असून अखेरची काही नाटके तर कलादृष्ट्या अगदी हीन आहेत, असे काही जणानी ठरवून टाकले आहे. टीकाकाराच्या या मताची यथार्थता ठरविण्यास येथे अवकाश नाही व तसा प्रस्तुत लेखाचा उद्देशही नाही. किंबहुना या नाटकातून कोणकोणची ध्येये व सामाजिक प्रमेये नाटककारान प्रतिपादिली आहेत, याचेही विवरण प्रस्तुत लेखाच्या योजिलेल्या मर्यादेत करणे शक्य नाही; खाडिलकराच्या प्रतिभेचा निदर्शक असा आणखी एक कलागुण, जो येथे उल्लेखिला नाही तर प्रस्तुत लेखाचे उद्दिष्ट सफल झाले असे मानता येणार नाही, तेवढा गुण अखेरीस सागून हे लाबलेले विवेचन संपवू.

हा गुण भिन्न भिन्न प्रकारानी नाटकामध्ये प्रकट झालेला दिसतो. तथापि यास एकच नाव देणे झाल्यास ते ' समन्वयकौशल्य ' असे देता येईल. खाडिलकरानी आपल्या नाटकात सामाजिक तत्त्वाचे व प्रमेयाचे प्रतिपादन केले आहे, यावरून पुष्कळाचा समाज असा होतो की त्याच्या नाटकातील पात्रे संधि सापडेल तेथे जहाल राजकीय मताचीं व्याख्याने झोडतात, मग त्या व्याख्यानाचा कथानकाशीं फारसा संबंध असो वा नसो. या समजाइतका अयथार्थ समज दुसरा कोणताही नसेल. जीं तत्त्वे किंवा प्रमेये नाटकाच्या द्वारा प्रतिपादन करण्याकरिता योजिलेलीं असतात,

तीं केवळ संवादातूनच नव्हे तर नाटकाच्या कथानकातून, घटनामधून परिस्फुट होणारीं असतात, आणि त्या तत्त्वावरच नाटकातील पेचप्रसग आधारलेला असतो, हा तर खाडिलकराच्या नाटकाचा विशेष आहे. नाटकाकरिता स्वीकारलेल्या पौराणिक किंवा ऐतिहासिक कथानकात ज्या मुख्य घटना किंवा जो केन्द्रभूत प्रसंग असेल तो कोणच्या सामाजिक वा राजकीय तत्त्वाच्या सघर्षामुळे उद्भवला असे दाखविणें समर्पक व तर्कशुद्ध दिसेल, हें खाडिलकर प्रथम हेरतात. ज्या तत्त्वाचा वा ध्येयाचा नाटकामध्ये उपन्यास करावयाचा तीं याप्रमाणे निश्चित केल्यानंतर कथानकाला गति देणाऱ्या ज्या मुख्य भूमिका असतील त्याच्या स्वभावधर्मास शोभून दिसतील अशीं नियोजित तत्त्वप्रणालीचीं अगे त्या त्या भूमिकेच्या ठायीं आरोपित करावयाचीं आणि त्या त्या भूमिकेच्या हातून घडणाऱ्या कृति ह्या तिच्या तात्त्विक विचारसरणीस व स्वभावधर्मास अनुसरूनच घडल्या असे, प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीत्या सूचित करावयाचे. याप्रमाणे स्थूल मानाने खाडिलकराच्या नाट्यरचनेची प्रक्रिया आहे. आपल्या तत्त्वप्रणालीस किंवा उद्दिष्ट ध्येयास जुळण्यासाठी त्यानी पौराणिक कथानकामध्ये पुष्कळ ठिकाणी बदल केला आहे व पौराणिक कथेला कल्पनानिर्मित प्रसंगाची जोड दिलेली आहे. तथापि पौराणिक कथेतील मुख्य निकराचा वा अखेरचा प्रसंग त्यानी बदललेला नसून त्या प्रसंगाच्या अनुषंगानेच प्रतिपाद्य ध्येयाचे व प्रमेयाचे स्वरूप निश्चित करण्याचा प्रयत्न केला आहे. अशा रीतीने, तारतम्यबुद्धि पूर्ण जागृत ठेवून, कथानक, त्यातील घटना, भूमिका व त्याचे स्वभावधर्म आणि प्रतिपाद्य प्रमेये व ध्येये याची एकवाक्यता होऊन हीं सर्व नाट्यागे एकमिलाफाने वाचकाच्या वा प्रेक्षकाच्या नजरसमोर येतील अशी रचना करण्याचा खाडिलकराचा प्रयत्न असतो. एखाद्या ठिकाणी हा प्रयत्न साधावा तितका साधला नसेल, त्यात क्वचित् ढोबळ दोष राहिले असतील; परंतु हे संभवनीय दोष जमेस धरूनही आपण निखालस असे म्हणूं शकतो की नाट्यातील घटना ( action ) व त्यातील प्रमेयप्रणाली याच्यामध्ये कार्यकारणरूप जिव्हाळयाचा सबंध असावयास पाहिजे, याची पूर्ण

जाणीव त्यास असून असा संबंध त्यानी आपल्या बहुतेक सर्व नाटकामध्ये यशस्वी रीतीने निर्माण करून दाखविला आहे.

'कीचकवधा'मध्ये कीचक हा 'राज्यकर्ते ते राज्यकर्ते व दास ते दास' हें तत्त्व उराशीं बाळगणारा सत्तामदांध असा प्रबल पुरुष दाखविला आहे. त्या नाटकातील एकामागून एक घटना वरील तत्त्वाचा अंमल सैरन्ध्रीवर करण्याचा दुराग्रह कीचकाने धरल्यामुळे घडून आल्या आहेत, हे सहज दिसून येणारे आहे. 'सत्त्वपरीक्षा' नाटक हे तर सामाजिक वागणुकीसंबंधाच्या दोन परस्परविरोधी तत्त्वामधील उघड उघड झटापट आहे व त्यातील प्रत्येक घटना ही त्या झटापटींतील एकेक पुढची पायरी आहे, हे अगदी स्पष्ट दिसून येणारे आहे. हरिश्चन्द्र हा सत्यव्रती, पूर्ण निर्भेळ सत्य आपण आचरणात आणून दाखवू शकतो असा बाणा बाळगणारा सम्राट् आहे, तर विश्वामित्र हा पूर्ण सत्य आचरणात आणणे या जगात अशक्य आहे, किंबहुना कोणताही सद्गुण निर्भेळ, पूर्ण स्वरूपात दिसणे अशक्य आहे, प्रसंग येईल तसे वागणे हेच खरे वागणुकीचे तत्त्व होय, असे मानणारा ऋषि आहे. हरिश्चन्द्राच्या निर्भेळ सत्याच्या बाण्यामुळे त्याच्यावर दुर्धर प्रसंग ओढवतात व विश्वामित्राच्या काशीनगरींतील नागरिकांच्या तत्त्वशून्य वागवणुकीमुळे त्याची संकटपरंपरा वृद्धिंगत होते, हें नाटक वाचल्यास सहज लक्षात येण्याजोगे आहे. प्रत्येक नाटकाचें सागोपाग निरीक्षण करणे प्रस्तुत लेखाच्या मर्यादेत शक्य नाही. तथापि तसे निरीक्षण केलें तरी, कथानकातील घटना, भूमिकाचे स्वभावधर्म व नाटकात गोवण्याचे प्रमेय, यांची कलात्मक एकवाक्यता करण्यात खाडिलकरानी बहुतेक सर्वत्र यश मिळविलें आहे, या निष्कर्षाखेरीज दुसरा कोणताही निष्कर्ष वाचकाच्या हातीं लागणे शक्य नाही. खाडिलकराचें 'समन्वय-कौशल्य' म्हणून ज्या गुणाचा उल्लेख केला, तो हाच होय.

हा 'समन्वयकौशल्या'चा मुख्य प्रकार झाला. याखेरीज आणखीही एक प्रकार लक्षांत घेण्याजोगा आहे. खाडिलकरानी आपल्या नाटकाकरितां स्वीकारलेल्या मुख्य भूमिका उच्चपदस्थ, प्रतापी, समाजाचे नेतृत्व करणाऱ्या अशा व्यक्ति आहेत, हें आपण पूर्वी पाहिलेंच आहे. या

भूमिका काही विशिष्ट स्वीकृत तत्त्वानुसार वर्तन करीत असतात, हा आपल्या लक्षात येऊन चुकले आहे. परतु ज्या समाजामध्ये या उच्चपदस्थ व अधिकारी व्यक्ति वावरत असतात, त्या समाजातील सामान्य व्यक्तीचे काय? समाजनेत्यानी, सत्ताधारी व्यक्तीनी स्वीकारलेल्या भल्याबुऱ्या ध्येयाचा व तत्त्वाचा सामान्य जनतेच्या जीवनावर काय परिणाम होतो? समाजनेत्यानी अवनतिकारक तत्त्वाचा अवलंब केला की समाजाचे एकदर जीवन बिघडते, नासते व उन्नतिप्रद विचाराच्या उदात्त ध्येयाच्या व्यक्तीकडे समाजाचे नेतृत्व आले की त्यातील सामान्य व्यक्तींचेही जीवन परिशुद्ध होण्याच्या मार्गास लागते, असा खाडिलकराचा ठाम ग्रह आहे.

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः।
स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥

हे गीतावचन तर सुप्रसिद्ध आहेच; त्याखेरीज

कालो वा कारणं राज्ञो राजा वा कालकारणम्।
इति ते संशयो माऽभूद् राजा कालस्य कारणम् ॥

हे भारतातील समानार्थक सुभाषित खाडिलकराच्या विशेषच आवडीचे दिसते, हे आपण पूर्वी पाहिलेच आहे. तेव्हा समाजनेत्यानी अवलबिलेल्या भल्याबुऱ्या तत्त्वाचा समाजातील सामान्य व्यक्तींच्या जीवनावर कसा काय परिणाम झालेला दिसतो, हे आपल्या नाटकामध्ये साक्षेपाने दाखविण्याचा खाडिलकरानी प्रयत्न करावा, हे क्रमप्राप्तच होते. तसा प्रयत्न त्यांनी आपल्या प्रत्येक तत्त्वप्रतिपादक नाटकात केला आहे. या प्रयत्नातूनच त्याच्या नाटकातील विनोदी पात्राची उत्पत्ति झाली आहे. खाडिलकरांचा विनोद कनिष्ठ दर्जाचा असतो, असे नेहमी म्हणण्यात येते. निवळ विनोद या दृष्टीने पाहिले असता टीकाकाराच्या या म्हणण्यात बराच तथ्यांशही असेल. परंतु टीकाकाराची ही दृष्टिच मुळात बरोबर नाही. समाजनेत्यानी अवलंबिलेल्या अवनतिकारक प्रमेयामुळे सामान्यजनाचें जीवन देखील कसें बिघडते, भ्रष्ट होते, याचें दिग्दर्शन करण्याकरितां खाडिलकराच्या नाटकातील या

सामान्य पात्राची योजना असते. या दृष्टीने पाहिले असतां या पात्राच्या कृतींतील व उद्गारांतील अतिशयोक्ति, आचरटपणा व असंभाव्यता हीं सर्व सकारण व सहेतुक असलेलीं आढळतील व म्हणूनच तीं बऱ्याच अशीं क्षम्य ठरतील. शास्त्याच्या वर्गास न्यायनीतीचे निराळे माप व शासित वर्गास निराळे माप लावणाऱ्या कीचकासारख्या सत्तामदांध पुरुषाच्या अमदानींत सर्व प्रकारचा शासित वर्ग किती हतबल, सत्ताधाऱ्याच्या पायीं लाळ घोटणारा व नीतिअनीतीची चाड न बाळगणारा असा बनतो हे 'कीचकवध' नाटकात निरनिराळया पात्राच्या द्वारा दर्शविलें आहे. लाळघोटया व आशाळभूत स्त्रीचें उदाहरण म्हणून सौदामिनी, कामकरी वर्गातली लुडबुडी व लावालावी करणारी व्यक्ति म्हणून सिद्धपाक आचारी, अशी योजना केली आहे व विद्येस आश्रय नसल्यामुळे बेकार होऊन हिंडणाऱ्या विद्वानाचा नमुना म्हणून विद्याधर पंडितास पुढे केला आहे. 'भाऊबंदकी'तील चमकशास्त्री व नमकशास्त्री आणि त्यांच्या बायका, यांचे उपकथानक राज्यकर्त्यांमधील गृहकलह सर्वसामान्य जनतेमध्ये कसा शिरला होता, हे दाखविण्यासाठी घातलें आहे, हे तर सुस्पष्टच आहे. 'सत्त्वपरीक्षे'तही तत्त्वशून्य रीतीने प्रसंग पडेल असे वागणे हेच सामाजिक नीतीचे तत्त्व, असे मानणाऱ्या विश्वामित्राच्या काशीनगरीतील सर्व व्यवहार कसा भ्रष्ट झालेला होता, हे दर्शविण्याच्या उद्देशानेच सुवर्णदासी, बचंभट, चित्रगुप्त, इत्यादि पात्रे आणलीं आहेत. अशा रीतीने तात्त्विकदृष्ट्या पूरक म्हणून आणलेल्या गौण पात्राचाही मुख्य कथानकात महत्त्वाच्या प्रसंगीं उपयोग करून घेऊन त्याचा कथानकाशी समन्वय कसा साधिला आहे हें 'कीचकवधा'तील सौदामिनी, 'भाऊबंदकी'तील शास्त्रीद्वय व त्यांच्या बायका आणि 'सत्त्वपरीक्षे'तील सुवर्णदासी वगैरे पात्राच्या उदाहरणावरून लक्षात येण्याजोगे आहे. तेव्हा तात्त्विक दृष्ट्या गौण पात्रांचा मुख्य पात्राशीं व घटनादृष्ट्या गौण पात्राचा मुख्य कथानकाशीं समन्वय साधिलेला असल्यामुळे हे निराळ्या प्रकारचे समन्वयकौशल्य खाडिलकरानी श्रेष्ठ दर्जाचें प्रकट केले आहे,

खाडिलकरांच्या कलात्मक तपश्चर्येचें हें किंचितसें विवरण येथे केलें आहे. तपश्चर्या दुर्वास ऋषीप्रमाणे दुसऱ्याला त्रास देण्याकरिता तामस बुद्धीने करिता येते, विश्वामित्राप्रमाणे प्रतिसृष्टि निर्माण करण्या-साठी राजस भावनेने करिता येते व दधीचि ऋषीप्रमाणे परहितार्थ सात्त्विक भावनेनेही करिता येते. स्वसमाजाला सत्य, अहिंसा, त्याग, प्राप्तकर्तव्यपालन इत्यादि सद्गुणानी परिपूत झालेल्या उन्नतिमार्गाचा बोध करण्याकरिता खाडिलकरानी ही तपश्चर्या केली असल्याने ती सात्त्विक तपातच मोडते हे सागावयास नको. त्यांच्याच तोंडून एके ठिकाणीं उमटलेल्या,

' येतां अशुभसा काल नवा, तपाने ध्येय मनीं सेवा । '

या दिव्य संदेशानुसार त्यानी आचरण केले आहे. तो संदेश आपल्या देशबांधवाच्या मनातून आचरणात कितपत उतरला आहे, हे पाहत ते आज संन्यस्तवृत्तीने बसले आहेत. त्याच्या ऋषितुल्य दृष्टीला यापुढे कोणकोणची दृश्ये दिसणार आहेत, हे कोण सांगेल ?

---

# ५

## मराठी साहित्यांतील एक महान व्यक्ति

# ज्ञानकोशकार
# श्रीधर व्यंकटेश केतकर

[ 'विहंगम' एप्रिल १९३७ ]



समाजकल्याणार्थ ज्या व्यक्तींनी जगणें अत्यंत इष्ट व अवश्य असत अशा व्यक्ति आपलीं अनेक कामें व अनेक संकल्प अपुरे ठेवून मृत्युवश होणे हा समाजास एक प्रकारचा शापच होय. हा शाप महाराष्ट्रास आजपर्यंत फारच भोवलेला आहे. आधुनिक महाराष्ट्रांत बाळशास्त्री जांभेकरापासून अकालमरणाची जी परंपरा सुरू झाली आहे ती अद्याप खंडित झालेली नाही, हे डॉ. केतकराच्या मृत्यूने सिद्ध झाले आहे.

डॉ. केतकर हे अनेक महत्त्वाचीं कामें अपुरीं ठेवून गेले, त्याचे अनेक संकल्प त्याच्याबरोबरच निमाले आणि ज्याच्यातून नवीन कल्पनाची एकसारखी निपज होत होती असे त्याचें बुद्धिरूपी अजस्र यंत्र एकाएकी बंद पडले. त्यामुळे झालेले महाराष्ट्राचे नुकसान कधीही भरून येण्यासारखे नाही. प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासाचे पाच खंड प्रसिद्ध करण्याचे त्यानी योजिले होतें, त्यापैकी एक खंड प्रसिद्ध झाला आहे. बाकीचे चार खंड आता कल्पातापर्यंत वाट पाहून वाचकाच्या नजरेस पडणार नाहीत. आजतागायत झालेल्या जगाच्या प्रगतीचा आढावा घेण्याकरिता ते ज्ञानकोशाचे पुरवणी खंड काढणार होते. गुजराती ज्ञानकोशाचे कामही त्याच्या देखरेखीखाली मद गतीने चालू होते. या अनेक कार्यामागे त्याची प्रेरकशक्ति जिवंत असल्यामुळे त्याच्या कार्यनिर्मितीचे स्थान बाह्यतः रुक्ष, अव्यवस्थित व भयाण असें असूनही ते प्रत्येक मराठ्याच्या मनास खरोखरीचें 'आशास्थान' वाटत असे. त्याची प्रेरक शक्ति निमाल्याबरोबर आता तेच निराशेचें व विषादाचे स्थान बनले आहे.

स्वतःसंबंधाने डॉ. केतकरानी पुष्कळच लिखाण ठिकठिकाणीं लिहून ठेवले आहे. त्यावरून त्याच्या जीवनक्रमाचा चित्रपट ज्याप्रमाणे रेखाटतां येईल त्याचप्रमाणे त्याचा स्वभाव, त्याची मनोरचना, त्याची विचारसरणी व त्यांची कार्यपद्धति याचाही चागल्या रीतीने उलगडा

करतां येईल. केतकर हा एक प्रतिभाशाली पुरुष होता व प्रस्तुत लेखकाचा त्यांच्याशीं अनेक वर्षांचा परिचयही होता. त्याच्या प्रतिभेच्या व कर्तृत्वशक्तीच्या अनेक बाजू डोळयांसमोर स्पष्ट दिसत असल्यामुळे व दुःखाच्या प्रसंगीं विस्तार, किंबहुना पाल्हाळ करण्याकडे साहजिक प्रवृत्ति होत असल्यामुळे त्याजविषयी आपण जितके लिहूं तितके थोडेच असे मनाला वाटते. परंतु 'विहंगमा'च्या धोरणाच्या दृष्टीने जितके अवश्य तितकेच येथे लिहिणे उचित ठरेल.

खाऊनपिऊन सुखी अशा एका कोकणस्थ ब्राह्मणाच्या कुटुंबात डॉ. केतकर याचा जन्म (रायपूर येथे) झाला. त्याचे वडील पोस्ट मास्तर असून त्याची बरीच नोकरी मध्यप्रातात झाली होती. त्याचे एक चुलते उमरावतीस असत. डॉक्टराच्या लहानपणीच त्याचे वडील वारल्यामुळे त्याची आई त्याना घेऊन उमरावतीस आपल्या दिराजवळ, परंतु स्वतंत्रपणे येऊन राहिली. उमरावतीस त्याचे शालेय शिक्षण झाले. त्याच्या उपजत असलेल्या स्वच्छदी, बेफिकीर व स्वावलंबी वृत्तीस त्याच्या घरच्या परिस्थितीमुळे वृद्धिगत होण्यास विशेषच वाव मिळाला असला पाहिजे. डॉ. केतकराच्या शिक्षणास पुरेल इतके वित्त बहुधा त्याच्या वडिलानी मागे ठेवले असावे. घरात देखरेख करणारे वडील पुरुष माणूस कोणी नाही व पैशाकरिता दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याची गरज नाही अशा स्थितीत त्याची विद्यार्थिदशा गेली. ते स्वतःच म्हणतात, "इंग्रजी पहिल्या यत्तेपासून तो मॅट्रिक होईपर्यंत मजकडे पाहणारे कोणीच नव्हते. घरात खर्चही इतर कुटुंबाच्या मानाने अधिक होत असे. आणि त्यामुळे कोणचीही ददात नव्हती. मॅट्रिकपर्यंतचा काळ म्हटला म्हणजे स्वच्छंदाने विहार करण्याचा काळ होता असेच म्हटले तरी चालेल."

इ. स. १९०० सालीं डॉ. केतकर हे 'मातृक्लेशनमुक्त' झाले. हें दुहेरी अर्थाने घेता येईल. म्हणजे त्या सालीं ते मॅट्रिक परीक्षा पास झाले व त्याच सालीं त्याची आईही वारली. आई वारल्यामुळे त्याना किती मोकळे वाटले याचें निर्भीडपणाने त्यानी स्वतःच वर्णन केले आहे.

"इ. स. १९०० मध्ये माझी आई वारली व थोरली बहिणही त्याच वर्षी वारली. त्यामुळेही एक तऱ्हेचे स्वातंत्र्य वाटले. आता मला जगभर वाटेल तिकडे भटकावयास हरकत नाही असे वाटू लागले. आणि अगदी स्वतंत्र मनाच्या स्थितीत मी कॉलेजमध्ये प्रवेश केला." मुंबईच्या विल्सन कॉलेजामध्ये पुढील शिक्षणाकरिता त्यानी प्रवेश केला व विलायतेला जाईपर्यंतची पाच सहा वर्षे, म्हणजे १९०१ ते १९०६ पर्यंतचा काळ, त्यानी मुंबईसच काढला. विद्यालयीन शिक्षणात ते कोठेच चमकले नाहीत. हायस्कुलात असतानाचा त्याचा स्वच्छंदीपणा व मनसोक्त आचरणाची वृत्ति कॉलेजात गेल्यानंतर अधिकच बळावली, असे दिसते. वर्गाच्या अभ्यासाकडे लक्ष न देता मनास येतील त्या निरनिराळ्या विषयाच्या वाचनात गुंग असावे, बरोबरीच्या विद्यार्थ्यांबरोबर गप्पा माराव्यात व भटकावे आणि देशाभिमानाचे नानातऱ्हेचे बेत करून त्याविषयी चर्चा करावी, अशा रीतीने त्यानी आपला विद्यालयीन आयुष्यक्रम घालविलेला दिसतो.

उमरावतीस हायस्कुलात शिकत असताना व मुंबईस कॉलेजात असताना आपला काल कसा गेला याचे वेधक व मार्मिक वर्णन डॉक्टरानी आपल्या आठवणींत केलें आहे. सध्या वाङ्मयाच्या व इतर क्षेत्रात नावारूपास चढलेले अनेक गृहस्थ त्याचे सोबती होते; त्यापैकी शाळेत असतानाचे सोबती म्हणजे वीर वामनराव जोशी, श्री. यशवंत खुशाल देशपांडे व कादंबरीकार श्री. बाळकृष्ण संतुराम गडकरी हे होत. पैकी श्री. गडकरी याचा दाट स्नेह केतकर कॉलेजात गेल्यानंतरही चालू होता व या दोघानी मिळून 'महाराष्ट्र वाग्विलास' नावाचे मासिकही १९०६ सालच्या आरंभी काढले होते, ही हकीकत केतकरानी आपल्या आठवणीत निवेदन केली आहे.

इतक्या लहान वयात, शिक्षण देखील संपण्याच्या पूर्वी केतकर मासिकाच्या भानगडींत पडले ते साहित्याची त्यास अतिशय आवड होती म्हणून नव्हे, तर आपले साहित्यप्रेमी मित्र गडकरी यास साहाय्य करण्याच्या भावनेने. त्याच्या मनोवृत्तींत लालित्याचा व साहित्यप्रीतीच्या

बुद्धाशी असणाऱ्या भावनानुरंजित रसिकतेचा अंश मूळचाच कमी होता अर्थात रसास्वादनाच्या दृष्टीने साहित्याकडे त्यांनी कधी पाहिले असेल असे वाटत नाही. विद्यार्थिदशेत त्यानी स्वतः काही लेखन केले होते. ( बक्षिसाकरिता लिहिलेल्या एका निबंधाशिवाय ), असेही दिसत नाही. विद्यालयीन आयुष्यक्रमातील त्याचा स्थायीभाव देशाभिमान हा होता. तो मात्र अगदी ज्वलज्जहाल होता व इंग्रजाना हिंदुस्थानातून हाकून दिले पाहिजे ही त्यातील केंद्रीभूत कल्पना होती. " देशाभिमान म्हणजे इंग्रजाचे राज्य घालविण्यासाठी प्रयत्न, दुसरे तिसरे काही नाही, अशा तऱ्हेची कल्पना माझ्या लहानपणी माझीच होती असे नव्हे तर अनेक अल्पवयी मंडळीची होती. त्याना घालविण्याचा मार्ग बडा-शिवाय दुसरा नाही अशी ही अल्पवयी समजूत असल्यामुळे जो बडाळी करी तो तो मोठा देशाभिमानी, म्हणूनच आमची समजूत होई. " असे आपल्या देशाभिमानाच्या कल्पनेविषयी त्यानी म्हटले आहे.

प्रतिभाशाली पुरुषाच्या अनेक लक्षणापैकी हे एक लक्षण असते की तो आपल्या कल्पनेच्या आहारी जातो, कल्पनानिर्मित ध्येयासाठी आपले सर्वस्व अर्पण करितो. केतकर हे देशाभिमानाच्या आहारीं गेले. आपले निकटचे कर्तव्य परीक्षा पास होणे हे ते विसरले. कॉलेजचे शिक्षण पाच वर्षे घेऊनही त्यास पदवी पदरात पाडता आली नाही.

देशाभिमानाच्या कल्पनेच्या पूर्तीसाठी लष्करी शिक्षण घ्यावें, लष्करी शिक्षणासाठी अमेरिकेला जावे, असा केतकरप्रभृति मित्रमंडळी-मध्ये बूट निघाला. परतु अखेरीस केतकर जेव्हा गेले ( एप्रिल १९०६ ) तेव्हा अधिक विचाराने व अभ्यासाने त्याच्या मनातील या कल्पना वितळल्या होत्या. शेवटी, ध्येयशून्य मनःस्थितींत, " आपण जाण्या-संबंधाने गप्पा बऱ्याच मारल्या त्या खऱ्या करून दाखविल्या पाहिजेत असे वाटल्यामुळे " ते अमेरिकेस गेले.

अमेरिकेत पाच वर्षे व इंग्लंडात दोन वर्षे घालवून १९१३ सालीं केतकर हिंदुस्थानात परत आले. हा विलायतवासच त्याच्या पुढील थोर कर्तबगारीचा व अचाट साहित्यसेवेचा पाया होय. आमचे

ज्ञानकोशकार, समाजरीतींचें आपल्या विलक्षण लेखनशैलीने उद्घाटन करणारे कादंबरीकार, वाङ्मयव्यवहारास नवीन वळण लावणारे योजना-कुशल प्रकाशक, हिंदुसमाजाची अभिनव कल्पनानुसार स्वतंत्र रीतीने छाननी करणारे पट्टीचे समाजशास्त्री, आम्हाला अमेरिकेने दिले असें म्हटले असता चुकीचें होणार नाही. गाधींच्या चारित्र्यघटनेस इतर कित्येक गोष्टी कारणीभूत झाल्या असल्या तरी गाधींचे गाधीपण दक्षिण आफ्रिकेने निर्माण केले हे जसे आपणास म्हणता येईल, त्यापेक्षाही अधिक भावार्थाने केतकरासंबंधी वरील विधान आपण करूं शकू. अमेरिकेतील शिक्षण व अनुभव नसता तर केतकर हे पुढे झाले तसे बनले नसते. अमेरिकेच्या पाच वर्षात त्यानी समाजशास्त्र व तदनुषंगी इतर शास्त्रे याचे अध्ययन केले, इतर अनेक विद्या व शास्त्रे याचे आलोडन केलें, शास्त्रीय व ऐतिहासिक विचारपद्धतीचे रहस्य अवगत करून घेतले, अनेकजातिसंकुल आणि वर्णविद्वेषपूर्ण अशा अमेरिकन समाजाचे मार्मिक अवलोकन केले आणि अशा रीतीने साधनसंपन्न बनून ते हिंदुस्थानात परत आले. आठ लक्षावर पुस्तकें असलेल्या कार्नेल युनिव्हर्सिटीच्या लायब्ररींतच चार वर्षे त्यानी आपला मुक्काम ठोकला होता, असे म्हणण्यास हरकत नाही. अमेरिकेतील व्यासंग व अनुभव, तेथे लिहिलेल्या History of Caste in India या पुस्तकास मिळालेले यश, यामुळे अगोदर असलेला त्याचा आत्मविश्वास अनेक पटीनी वाढला.

हिंदुस्थानात परत आल्यानंतर एक वर्षपर्यंत कलकत्ता विद्यापीठात अध्यापकाचे काम करून ती नोकरी त्यानी सोडून दिली व बरेचसे देशभ्रमण व विचारभ्रमण करून मराठींत ज्ञानकोश काढण्याचें कार्य स्वतःकरिता निश्चित केले. मध्यप्रांत-वऱ्हाडच्या अभिमानामुळे नागपूर येथे येऊन त्यानी आपल्या कार्यास प्रारंभ केला. ज्ञानकोशाच्या रचनेमध्ये डॉ. केतकराच्या आयुष्याचीं बारा वर्षे (१९१५-१९२७) गेलीं. या काळातील आपल्या जीवनाचा व कर्तृत्वाचा इतिहास त्यांनी "माझे बारा वर्षांचें काम उर्फ ज्ञानकोश मंडळाचा इतिहास" या नांवाचें एक स्वतंत्र पुस्तक लिहून महाराष्ट्रीय जनतेस विदित केला आहे. एका प्रतिभाशाली पुरुषाच्या मनोव्यापाराचा व कर्तबगारीचा निःसंकोच

रीतीने निवेदिलेला इतिहास या नात्याने हें पुस्तक फार महत्त्वाचें व अवश्य वाचनीय आहे.

पुरवणी खंड मिळून ज्ञानकोशाचे एकंदर तेवीस विभाग प्रसिद्ध झाले. या प्रचंड ग्रंथाचें सूक्ष्मात सूक्ष्म निरीक्षणही येथे करणें शक्य नाही. तथापि एवढे सांगता येईल की महाराष्ट्रास अभिमान वाटावा असेंच तें कार्य झाले आहे. त्यात उणिवा बऱ्याच आहेत व प्रत्यक्ष भेटींत प्रस्तुत लेखक डॉक्टरसाहेबाच्या नजरेस काही उणिवा आणूनही देत असे. तथापि त्याचें म्हणणे असे होते की हिंदुस्थानातील इतर कोणत्याही भाषेतील ज्ञानकोशापेक्षा आपला मराठी ज्ञानकोश सरस झाला आहे, व इंग्रजींतील चेम्बर्ससारख्या दुय्यम दर्जाच्या ज्ञानकोशापेक्षा त्याची योग्यता अधिक आहे.

त्याच्या ज्ञानकोशास संदर्भ ग्रंथ म्हणून तर महत्त्व आहेच; आणि बहुश्रुत वाचकासही त्याचा या नात्याने पुष्कळ उपयोग होतो. तथापि खुद्द केतकराचे नवीन व स्वतंत्र संशोधन त्यात समाविष्ट झाले आहे, या दृष्टीनेही त्यास फार मोठे महत्त्व आहे. ज्ञानकोशाचे पहिले पाच खंड प्रस्तावनाखंड म्हणून प्रसिद्ध झाले आहेत. त्यात विषयाची अकार-विल्ह्याने माडणी नसून निरनिराळया महत्त्वाच्या ज्ञानविभागावर स्वतंत्र प्रबंधरूपाने त्यातील मजकूर लिहिण्यात आला आहे. पहिला विभाग ‘ हिंदुस्थान आणि जग ’ या नावाचा असून त्यात उपलब्ध माहितीच्या आधारावर केतकरानी केलेलें स्वतंत्र विवेचन आले आहे. दुसरा विभाग ‘ वेदविद्या ’, तिसरा विभाग ‘ बुद्धपूर्व जग ’, चवथा ‘ बुद्धोत्तर जग ’ आणि पाचवा ‘ विज्ञानेतिहास ’. या सर्व विभागातील विषय त्याच्या नावावरूनच समजण्याजोगे आहेत.

डॉ. केतकराचें दोन प्रकारचे व दोन निरनिराळया क्षेत्रांमधील स्वतंत्र संशोधन ज्ञानकोशांत समाविष्ट झालें आहे. पहिलें संशोधन हिंदुस्थानातील जातींच्या संबंधाचें असून ते प्रथम त्यांच्या History of Caste या इंग्रजी ग्रंथामध्ये मांडलें गेलें होतें. तेंच संशोधन कालक्रमानु-सार आणि नवीन माहितीनुसार विकसित झालेल्या स्वरूपात ज्ञानकोशात समाविष्ट झालेलें आहे. दुसरें संशोधन वेदांसंबंधीचें आणि पुरातन भार-

तीय संस्कृतीच्या संबंधाचे होय. हे संशोधन मात्र ज्ञानकोशरचनेचे काम चालू असताना केतकरानी केले. "या वेळेस (ज्ञानकोशरचनेच्या वेळीं) ही संधि साधून वेदाभ्यास आपण बराच करून घ्यावा आणि आपलें कोड पुरवून घ्यावे ही इच्छा उत्पन्न झाली......वेदाभ्यास जोराने १९१९ च्या डिसेंबरच्या सुमारास सुरू झाला, तो तीन वर्षे चालू होता." हे वेदविषयक संशोधन वर सागितलेल्या प्रस्तावनाखंडापैकी दुसऱ्या व तिसऱ्या खंडात आले आहे. "वेदविषयक अभ्यासावर ज्ञानकोशाच्या प्रस्तावनाखंडातील सुमारे एक हजार पृष्ठे खर्ची पडलीं आहेत व त्यात जे सशोधन माडले आहे ते करण्यासाठी तीस हजार रुपयावर रकम खर्च झाली आहे", असे त्यानी तिसऱ्या खडाच्या प्रस्तावनेत म्हटले आहे.

या द्विविध संशोधनाचा स्थूल आराखडा देखील प्रस्तुतच्या त्रोटक लेखांत देणे शक्य नाही. तथापि त्यातील मुख्य कल्पनाचा उल्लेख येथे केला नाही तर केतकराच्या स्मृतीस तो मोठाच अन्याय होईल. कारण स्वतःच्या वेदविषयक व समाजशास्त्रीय सशोधनाचे महत्त्व त्यास अतिशय वाटत होते. आपल्या ज्ञानकोशाच्या इतिहासात ते म्हणतात, "आज जरी माझे सशोधनफल जगप्रसिद्ध झाले नाही तरी ते उद्या होईल आणि वेदाच्या अत्यत मोठ्या अभ्यासकात माझे नाव केव्हा तरी होईल ही माझी खात्री आहे. मी असे म्हणूं शकतो की, ज्ञानकोशमडळात नवीन वैदिक संशोधन प्रसिद्ध झाले आहे ते जगातील अत्यंत मोठ्या, वेदाच्या अभ्यासकाच्या सबंध आयुष्यातील कामाइतके मोठे टरेल... ...वैदिक संशोधक म्हणून माझी कीर्ति झाली नाही, हे खरे आहे. ती पुढे होईल अशी माझी खात्री आहे. त्यामुळे मला समकालीनानी जरी योग्य अभिज्ञता दाखविली नसली तरी त्याबद्दल देखील खंत मुळीच नाही. मला असे वाटते की, मी जे काय लिहिले आहे त्याची उत्तम प्रकारे जाणीव होण्याइतका ज्ञानविकास भोवतालच्या जनतेत नाही. त्यामुळे लोकाच्या स्तुतिनिंदेचीही मला फिकीर वाटत नाही. जो पुढे वेदाभ्यासक वर्ग निघेल तो माझे कर्तृत्व ओळखील ही माझी खात्री आहे. तसेच ज्ञानकोशामध्ये जे समाजशास्त्र घातलें आहे तें जगातील प्रचलित समाजशास्त्रज्ञाच्यापेक्षा काही बाबतीत वरच्या दर्जाचे आहे,

हाही मला आत्मविश्वास आहे; तथापि त्याची पारख देखील समकालीन महाराष्ट्राकडून होणे शक्य नाही.”

त्याच्या वेदविषयक संशोधनातील मुख्य कल्पना ही आहे की, वेदमंत्र रचणारे आर्य हिंदुस्थानात येण्यापूर्वी आर्यवंशातील लोक व त्यांची संस्कृति येथे नांदत होती. या संस्कृतीत ब्राह्मणवर्ग नव्हता, तर सूत लोकांचा वर्ग असून तो समाजामध्ये प्रमुख होता. शिवाय त्यांच्यात एकाच अग्नीची पूजा करणारा ‘अथर्वे’ लोकांचा वर्गही होता. “पुराणातील कथांचे मूळ भाग, उपनिषदातील मतांचा बराचसा भाग, जैन व बौद्ध मतांचे पूर्वस्वरूप आणि विद्याधर-गुह्यकादि देवयोनींचे काल्पनिक वर्ग या गोष्टी प्राचीनतर आर्यन् संस्कृतींतील आहेत. लिंगोपासनाही या संस्कृतींतील असावी.” वैदिक उर्फ मान्त्र संस्कृतीचे आर्य हिंदुस्थानात येत असता या प्राचीनतर आर्य संस्कृतीच्या लोकांशीं त्यांचे जे युद्ध झाले तेच “दाशराज्ञ” या नावाने वेदात प्रसिद्ध असलेले युद्ध होय. मान्त्र संस्कृतीच्या आर्यांनी पूर्वीची सूतसंस्कृति परिस्थितीस जुळेल त्याप्रमाणे आत्मसात् करून घेतली, अथर्व्यांचा वर्ग ब्राह्मणात सामील करून घेतला, यज्ञकर्माला मोठे व सार्वजनिक स्वरूप दिले व पौरोहित्य करणाऱ्या ब्राह्मण वर्गाचे सामाजिक वर्चस्व स्थापित केले. वेदातील सर्व सूक्ते दाशराज्ञ युद्धापूर्वीची आहेत. येणेप्रमाणे त्यांच्या संशोधनाचा सूत्रमय सारांश आहे. या त्यांच्या संशोधनाचे परीक्षण वेदविद्येत मुरलेल्या पंडिताकडून होईल, तेव्हा कदाचित त्यात काही दुरुस्तीही करावी लागेल. तथापि त्यांच्या संशोधनाचे अलौकिकत्व निर्विवाद असून त्यांनी त्या संबंधाचे जे उद्गार काढलेले वर दिले आहेत त्यात वृथा आत्मश्लाघेचा भाग फारच थोडा आहे हे कोणासही पटेल.

जातिविषयक संशोधन देखील असेच मौलिक असून सध्याच्या समाजसंघटनेच्या दृष्टीने अतीव उपयुक्त ठरूं शकेल असे आहे. हिंदुस्थानातील प्रचलित जाती या चातुर्वर्ण्यापासून, किंवा भिन्न गुणकर्मांमुळे निघालेल्या नसून त्या हिंदुस्थानात निरनिराळ्या काळीं आलेल्या मानव-कुलापासून किंवा जमातींपासून निघालेल्या आहेत. या जमाती प्राचीन काळीं सामाजिक दृष्ट्या स्वयंपूर्ण होत्या; म्हणजे नाना धंद्यांचे लोक,

त्याचप्रमाणे पौरोहित्य करणारे लोकही त्या जमातींतीलच होते. प्रत्येकीला आपला स्वतःचा धर्म व संस्कृति होती. वैदिक संस्कृतीच्या आर्यांचा प्रसार जेव्हा हिंदुस्थानात सर्वत्र झाला व त्यांच्यामध्ये ब्राह्मण समाज हा जेव्हा प्रमुख बनला तेव्हा ब्राह्मणानी इतर जातीजमातींच्या संस्कृतीचा सोईस्कर भाग निरनिराळया स्वरूपात व निरनिराळया रीतींनी आपल्या संस्कृतीत समाविष्ट करून घेतला व अशा रीतीने अखिल भारतीय हिंदु संस्कृतीची घटना केली; त्याच्याच बरोबर इतर जातींचें पौरोहित्य हळूहळू आपणाकडे घेऊन व चातुर्वर्ण्याच्या मानीव चौकटींत सर्व जातीजमातींना स्थान देऊन सर्वसंग्राहक असा एक हिंदुसमाजरूपी विराट पुरुष निर्माण केला. या त्याच्या मुख्य सिद्धान्ताशीं त्यानी पूर्वीचा इतिहास व सध्याची समाजस्थिति नीट रीतीने जुळवून दाखविली आहे.

डॉ. केतकराच्या वेदविषयक व जातिविषयक संशोधनाचें सार त्याच्या अगदी अलीकडे लिहिलेल्या 'भारतीय समाजशास्त्र' या नवभारत ग्रंथमालेत प्रसिद्ध झालेल्या ग्रंथात आलें आहे.

ज्ञानकोशाच्या व्यापामधून १९२६–२७च्या सुमारास मोकळे होताच त्यानी प्राचीन महाराष्ट्राचा इतिहास रचण्याच्या जगड्व्याळ कामास हात घातला. हा इतिहास ५०० पानाच्या ५ खंडामध्ये प्रसिद्ध होणार होता. परंतु ज्ञानकोशमंडळ संपुष्टात येताच ते आर्थिक विपत्तीच्या भोवऱ्यात सापडले व त्यातून ते अखेरपर्यंत बाहेर निघूं शकले नाहीत. त्याच्या निःस्पृह व बेदरकार वृत्तीमुळे त्यानी आपत्तींची मुळीच क्षिति केली नाही, तथापि त्याचा विपरीत परिणाम त्याच्या प्रकृतीवर व शरीरस्वास्थ्यावर बराच झाला असला पाहिजे यात शंका नाही.

ज्ञानकोशाच्या कामामधून वेळ मिळूं लागल्यानंतर त्यानी अनेक उलाढाली केल्या व विविध प्रकारचे लेखनही केलें. 'विद्यासेवक' नावाचे मासिक त्यानी कित्येक वर्षे चालविलें. पुढे त्यानी एक दैनिकही काढले होतें. परंतु ती टूम अगदीच अल्पकालिक ठरली. याच अवधींत त्यानी अनेक कादंबऱ्याही लिहिल्या. महाराष्ट्रातील सुशिक्षित समाजाकडून केतकरास योग्य तो मान जरी वेळोवेळीं मिळत गेला तरी त्यांच्या कल्पनाचा अभिनवपणा व त्यांच्या मांडणींतील विक्षिप्तपणा हा नेहमी

समाजास रुचतच असे असें नाही. त्यामुळे ते खऱ्या अर्थाने लोकप्रिय कधीच झाले नाहीत. त्याच्या विचारामध्ये, मतामध्ये व सिद्धांतांमध्ये लोकाच्या बुद्धीला धक्के देण्याचें, त्याना नूतन कल्पना व विद्या यांचे क्षेत्र दर्शवून देण्याचे सामर्थ्य होते, परंतु या सामर्थ्याची जाणीव थोडयानाच होत असे. त्याची भाषाशैली खडबडीत, क्लिष्ट व रुक्ष अशी होती. त्यांमुळे सामान्य वाचकाचे मन वेधून घेण्यास ती फारशी समर्थ झाली नाही.

त्याना त्यातल्या त्यात जी लोकप्रियता मिळाली ती त्याच्या कादंबऱ्यामुळे. ‘ गोंडवनातील प्रियंवदा ’, ‘ परागंदा ’, ‘ आशावादी ’, ‘ ब्राह्मणकन्या ’, ‘ गावसासू ’, ‘ विचक्षणा ’ अशा सहा कादबऱ्या त्यानी लिहिल्या. त्यात समाजामध्ये अर्धवट प्रसिद्ध असलेल्या अशा कित्येक व्यक्तींचे व घराण्याचे विकृत चित्रण त्यानी केले आहे, असा त्याजवर आरोप आहे. कादंबरीकाराने आपल्या भूमिका कशा निर्माण कराव्या, हे सागण्याचे हे स्थल नव्हे, आणि या संबधात विशेष रेखीव असा नियम घालून देता येणार नाही, हेही खरे आहे. तथापि अस्तित्वात असलेल्या विशिष्ट व्यक्तींचेच चित्रण, त्यातील थोडयाशा रेषा बदलून करणे, ही पद्धति श्रेयस्कर नव्हे, इतके येथे सागता येईल. पण केतकरानी याच्याबरोबर निरनिराळ्या सामाजिक प्रश्नाचा, रूढींचा व कल्पनाचाही आपल्या कादबऱ्यात पात्रद्वारा ऊहापोह केला असल्यामुळे त्याच्या कादंबऱ्या अतीव उद्बोधक व विचारप्रवर्तक झाल्या आहेत, व त्या मराठी वाङ्मयात चिरकाल टिकून राहतील, यात संशय नाही.

त्याच्या ‘प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासा’चा फक्त एकच भाग प्रसिद्ध झाला आहे. त्यातही अनेक अभिनव कल्पना आल्या आहेत; परंतु त्याचा उल्लेख व परीक्षण करण्याचे स्थल हे नव्हे.

ग्रंथकर्तृत्व हें एकच केतकराच्या कर्तृत्वाचें अधिष्ठान नव्हतें. वाङ्मयप्रकाशनाच्या व्यवहारातही अभिनव कल्पना अमलात आणून प्रकाशनाच्या एकंदर क्षेत्रात त्यानी आपली जबरदस्त छाप उठवून दिली. या बाबतींतील त्याच्या कर्तृत्वाचें वर्णन प्रस्तुत लेखकाने त्यांच्या मृत्यूपूर्वी थोडेच दिवस ‘प्रतिभा’ पाक्षिकांत केलें आहे, त्याची येथे पुनरावृत्ति करीत नाही.

त्याची धडाडी, त्याची जबरदस्त कर्तृत्वशक्ति, त्याची बेदरकार वृत्ति व स्वतःविषयीचा प्रचंड आत्मविश्वास, इत्यादि गुणाचे दिग्दर्शन त्याच्याविषयी आतापर्यंत लिहिलेल्या मजकुरामध्ये झालेच आहे. बालवयापासून त्याच्या अंगी मुरलेल्या देशाभिमानाच्या पायावर या सर्व वैयक्तिक गुणाची उभारणी झाली होती, म्हणून त्याच्या या सर्व गुणाचा उपयोग देशास मुबलक रीतीने झाला. विद्यार्थिदशेच्या शेवटीं त्याना चागलं कळं लागल्यानंतर स्वदेशाच्या संस्कृतीचे रक्षण व ज्ञानसंवर्धन हीच आपल्या देशाभिमानप्रेरित जीवनाची दिशा त्यानी ठरविली होती. दिशा ठरविणे हे फार सोपे काम आहे, पण अशा तऱ्हेचा दिव्य संकल्प तडीस नेणे महाकर्म कठीण आहे; ते त्यानी करून दाखविले यातच अलौकिकता आहे. ते अत्यंत व्यवहारी होते व आधुनिक व्यवहारी वृत्तीवर त्यानी आपल्या योजना उभारल्या होत्या. असे असूनही स्वार्थीपणाचा लेशही त्याच्या अंतःकरणास शिवला नाही. संपत्तीची त्यानी आजन्म परवा केली नाही व धीरोदात्त मुनीप्रमाणे आपले आयुष्य मनन, निदिध्यासन व ज्ञानदान यात घालविले. ते स्वभावाने प्रेमळ, उदार व निर्भीड असत. ते जितके दुसऱ्याशी चागले वागले तितके स्वतःशी, म्हणजे स्वतःच्या शरीराशी चागले वागले असते तर त्याचे निधन इतक्या लवकर ओढवले नसते. अतिरिक्त मानसिक श्रमामुळे व बैठ्या व्यवसायामुळे त्यास कित्येक वर्षे मधुमेहाची व्यथा जडली होती. त्याची भव्य आकृति म्हणजे अलीकडे पोकळ डोलारा बनला होता. अशा स्थितीतही आहारादि व्यवहारात ते पाहिजे तितका नियमितपणा राखीत नसत. त्यातच आर्थिक विपत्तीशीं त्यास निकराचा झगडा करावा लागत होता. काळाने आपले पाश टाकण्यासाठी इतके दूत अगोदरच पाठविले असल्याने त्याला हा घास सुलभ रीतीने अचानक गिळता आला. त्याच्या मृत्यूने महाराष्ट्राचे जे नुकसान झाले आहे, त्याचा विचार मनात आला म्हणजे काही सुचेनासे होते व लेखणी पुढे चालत नाही.

---

# ६

# युगप्रवर्तक डॉक्टर केतकर

[ 'प्रतिभा' ता. १ जुलै १९३७ ]

## १ थोर मन

'न ब्रूयात्सत्यमप्रियम्' या न्यायानुसार कटु सत्य होता होईल तो ओठाबाहेर काढू नये, हे खरे. तथापि अशाच काही प्रसंगाने सागणे येते. डॉ. केतकर हे फार थोर पुरुष होते, असे म्हटल्याने त्याच्या मृत्यूने झालेल्या हानीची नीटशी कल्पना येणार नाही. आपल्या समाजात सध्या थोर पुरुषाचा केवढा भयकर दुष्काळ पडलेला आहे याची जाणीव मनाला नीटशी झाली म्हणजेच डॉ. केतकराच्या मृत्यूने झालेल्या हानीचा प्रचंडपणा मनाला जाणवेल—काळजाला जाऊन भिडेल. विद्वत्तेने ते थोर होते, हे सर्वविश्रुत आहे. विद्वत्ता ही चीज देखील आपल्या समाजात सध्या इतकी दुर्मिळ झाली आहे की त्याच्या थोरवीचे मापन करिताना हा मोठाच महत्त्वाचा मुद्दा मानिला पाहिजे. परतु विद्वत्तेपेक्षाही कर्तृत्व आपणामध्ये दुर्मिळ झाले आहे; म्हणूनच केतकराचे प्रचंड कर्तृत्व अधिकच ठळक रीतीने आपल्या डोळयात भरते. बहुतेक लोक त्याच्या थोरवीचे वर्णन करिताना येथेच थाबतील. परतु यापेक्षाही अधिक मूल्यवान आणि सध्याच्या काळात अधिक दुष्प्राप्य अशी वस्तु त्याजजवळ होती; आणि तिजकरिताच निदान मी तरी त्याना सर्वात अधिक चाहत असे. ती वस्तु म्हणजे त्याचें मोठे मन ही होय. परकाया-प्रवेशाची काही तरी युक्ति निघून त्याच्या मृत्यूमुळे देहनिर्मुक्त झालेल्या त्याच्या मनाचा एकेक लहानसा तुकडा महाराष्ट्रातील सार्वजनिक कार्यांत वावरणाऱ्या आम्हा सर्वांच्या अतःकरणात शिरला तर किती बरें चागले होईल ! ज्या अवयवाचे कार्य दूषित झाले असेल तोच अवयव

(निरोगी अवस्थेंत असलैला) रोग्याला खावयाला द्यावयाचा, अशी उपचारपद्धति (organotherapy) अलीकडे पाश्चात्य वैद्यकात निघाली आहे. शारीरिक रोगांप्रमाणे मानसिक दोषाच्या संबंधातही अशी उपचारपद्धति कोणी शोधून काढून शक्य केली तर मानव जातीवर तो मोठाच उपकार होईल. डॉ. केतकरासारख्याचीं द्राघिष्ठ आणि बलिष्ठ मने आमच्या समाजाच्या चागलींच उपयोगीं पडतील.

त्याच्या मनाचे दाडगें सामर्थ्य उपजत व स्वाभाविक होतें. त्याच्या मनाची विशालता ही काही अंशीं स्वभावसिद्ध तर काही अशीं संस्कारसिद्ध अशी होती. अभ्याससिद्ध असा भाग त्यात फारसा नव्हता. पुष्कळ व्यक्ति आपल्या मनोवृत्तींना बुद्धिपुरस्सर विशिष्ट वळण लावण्याचा प्रयत्न करुन दृढ अभ्यासाने आपली मनोरचना अभीष्ट तऱ्हेची बनवितात. म्हणजे एका जन्माच्या अवकाशातच ते पुष्कळशी मानसिक प्रगति करतात. डॉ. केतकराचे मानसिक गुण असे अभ्यास-सिद्ध नव्हते. आपल्या हिंदु तत्त्वज्ञानाच्या भाषेत बोलावयाचे म्हणजे केतकराची मनोरचना ही 'अनेकजन्मससिद्ध' अशी होती.

त्याच्या मनाचे विशालत्व आणि दाडगेपण हे त्याच्या जीवनात प्रारंभापासून अखेरपर्यंत अनेक दिशानी व्यक्त होत असलेले दिसे. लहानसान कल्पना केतकराना कधी सुचावयाच्याच नाहीत. त्याच्या योजना आणि त्यानी हाती घेतलेली कार्ये प्रचंड व अवाढव्य असावयाचीं. ज्ञानकोशाची विशाल कल्पना त्याना म्हणूनच सुचली आणि ती त्यानी म्हणूनच तडीस नेऊन दाखविली. 'प्राचीन महाराष्ट्रा'चे काम देखील असेच प्रचड. त्याच्या राजकीय कामगिरीकडे वळले तरी तोच प्रकार. लहानसान राजकीय मागण्या मागणे, किवा काँग्रेसच्या चळवळीची दिवटी हातात घेऊन मिरविणें, हें त्याना कधीच रुचले नाही. त्यांनी एकदम आपल्या एकट्याच्याच प्रयत्नाने स्वराज्याच्या गगनास गवसणी घालण्याची व्यापक व अत्यद्भुत कल्पना काढली. आणि तीन राक्षसाच्या गोष्टींतील राक्षसाला बाटलींत कोंडणाऱ्या जानूप्रमाणे स्वराज्याला आपल्या गवसणींत गुंडाळून आपल्या देशबाधवांपुढे आणून

हजर देखील केलें! हा सर्व त्यांच्या कल्पनेचा बुडबुडा असेल, परंतु एखाद्या प्रचंड घुमटाप्रमाणे तो विस्मयजनक होता यांत मात्र शंका नाही. त्याचे व्यावहारिक सिद्धान्त व आडाखे देखील असेच त्याच्या मनाच्या दाडगेपणास साजेसे असत. 'एक रुपयाचे पुस्तक खपविण्यापेक्षा शभर रुपयाचा ज्ञानकोश खपविणें व्यावहारिक दृष्ट्या अधिक सुलभ' हा त्याचा विक्रीशास्त्रातील सिद्धान्त सुप्रसिद्धच आहे.

त्याच्या मनाचे मोठेपण विरोधप्रसंगामधून चागलेच दिसून पडत असे. त्यानी भाडणे केलीं नाहीत असे नाही. आपल्या आयुष्यात पुष्कळच तंटे ते खेळले. महात्मा गाधीपासून तो तहत एखाद्या लहानशा ग्रामस्थ वकिलापर्यंत अनेकावर त्यानी प्रसगोपात्त टीकेचे हत्यार चालविले. परंतु त्याची युद्धपद्धति सरळ, प्राजळ व रोखटोक होती. स्वतःची बौद्धिक श्रेष्ठता व प्रतिपक्षाची हीनता, याविषयीचा ग्रह त्याच्या मनात नेहमी वज्रलेप झालेला असावयाचा. त्यामुळे स्वतःविषयी कधीही न ढळणारा दाडगा आत्मविश्वास आणि प्रतिपक्षाविषयी बेगुमान तुच्छता ही त्याच्या लिखाणात नेहमी दिसून येत असे. तथापि त्याच्या स्वभावात कुत्सितपणाचा लवलेशही नव्हता. मत्सर, द्वेष, असूया इत्यादि क्षुद्र मनामध्ये वास्तव्य करणाऱ्या विकाराचा त्याच्या मनास स्पर्श होत नसे. कोणीही मनुष्य उपजत दुष्ट किंवा अकारण खल नसतो; आपला स्वार्थ साधण्याकरिता तो दुसऱ्याचे नुकसान करण्यास प्रवृत्त होतो, इतकेच; असें त्याचे तत्त्व होते. आपल्या मार्गांत आलेला काटा दूर करण्यापलीकडे त्यानी कधी कोणाशीं शत्रुत्व केलें नाही; अनुदारपणे कधी कोणाचे पाय ओढण्याचा प्रयत्न केला नाही. भाडण खेळण्यात त्यानी नेहमीच दिलदारपणा व खेळीमेळीची वृत्ति दाखविली. ते कधी चिडले नाहीत किंवा जळफळले नाहीत. त्याचे प्रतिपक्षी अनेकवार चिडले, जळफळले व संतापले. डॉ. केतकराचे मोठें मन मात्र कधी क्षुद्र झालें नाही.

एखाद्या प्रचंड डोंगरावरील खाचखळगे व दऱ्याखोरीं हींही ज्याप्रमाणे मोठींच असावयाचीं त्याचप्रमाणे त्याच्या दाडग्या मनाचे

काही दोषही दाडगेच होते, यात शंका नाही. परंतु त्यानी स्वभाषेच्या व स्वसंस्कृतीच्या उन्नतीकरिता आपले आयुष्य अर्पण करावयाचे ठरविल्यामुळे त्याच्या विशाल गुणसमुच्चयाचा फायदा समाजास मिळाला आणि त्याचे दोष मात्र त्याना स्वतःलाच भोवले. सामान्य जनाप्रमाणे द्रव्यार्जन करून प्रपच सुखाने चालविण्याचे ध्येय त्यानी डोळ्यापुढे ठेवले असते तर प्रकार उलट झाला असता; म्हणजे प्रचंड बुद्धिमत्ता, कल्पकता इत्यादि गुणाचा फायदा अधिक बढती मिळवून वैयक्तिक सुखसाधने वाढविण्यात त्यानी करून घेतला असता आणि त्याचा विक्षिप्तपणा, बेदरकारपणा इत्यादि अवगुणाची तोशीस समाजास सोसावी लागली असती. परतु आपल्या आयुष्याच्या प्रारंभीच त्यानी बुद्धिपुरस्सर त्यागाचा मार्ग स्वीकारला व केवळ ५३ वर्षाच्या आयुष्यात प्रचंड कर्तृत्व दाखवून ते कालवश झाले.

## २. सुरवातीचे अनुभव

बरोबर दहा वर्षापूर्वीची, म्हणजे १९२७ सालची गोष्ट. मुंबईच्या एलफिन्स्टन कॉलेजात अध्यापकपदावर असताना माटुंग्यास मी राहत होतो. सकाळी ८ वाजण्याचा सुमार असावा. डॉक्टरसाहेबाची स्वारी मंद पावलानी माझ्या खोलींत शिरली व कपाळावरचा घाम पुशीत पुशीत शेजारच्या खुर्चीवर स्थानापन्न झाली. त्याच्या आगमनाचा हेतु अर्थात् ज्ञानकोश खपविण्याचाच होता व आल्याबरोबर लगेच त्यानी त्याबाबतची प्रस्तावनाही केली.

त्या वेळेपर्यंत केतकर या व्यक्तीशीं माझा परिचय नव्हता व त्याच्या ज्ञानकोशाविषयीही माझे मत फारसे चागले नव्हते. त्याच्याशीं परिचय होण्याचा नव्हे, परतु त्याची चालचलणूक पाहण्याचा प्रसंग मला अनेकदा आला होता. एकदा पुण्यास सार्वजनिक सभेच्या हॉलमध्ये एक सभा होती. (सभा कशाबद्दल होती ते स्मरत नाही व साल कोणतें तेंही आठवत नाही, परतु बहुधा १९२०-२१ असावें.) केतकर अध्यक्ष होते व त्या वेळीं ते जोडा, पेशवाई पायजमा, अंगरखा व पगडी असा

पोशाक करून आले होते. त्या वेळीं ते काय बोलले ते अर्थातच आता आठवत नाही, तथापि त्याच्या वक्तृत्वाविषयी माझें मत काही चागलें झालें नाही. त्यानंतर त्याना पाहण्याचा प्रसंग आला तो १९२७च्या साहित्य संमेलनात किर्लोस्कर नाटकगृहामध्ये. संमेलनागभूत काव्य-गायनास त्या दिवशीं रात्री भलताच रग चढला होता. मी रगपीठावरच बसला होतों. बहुतेक पद्धतीच्या कवीचे काव्यालाप सपल्यावर अखेरीस डॉक्टराची स्वारी रंगपीठावर अवतीर्ण झाली आणि अमेरिकेंतील अनु-भवावरचें आपले आर्याबद्ध काव्य आपल्या बेसूर आवाजात वाचून दाखवू लागली. परदेशस्थ युवतीबरोबर युवकानी केलेल्या प्रणयाचे निर्विकार रीतीने रुक्ष भाषेत केलेले वर्णन, त्याला योजलेले आर्यावृत्त व स्पष्टीकरणात्मक टीपासह ते वाचून दाखविणारे डॉ. केतकर! या सर्व विचित्र गोष्टींच्या समुच्चयामुळे त्या वेळेस केवढी मजा आली असेल, याची कल्पनाच करावी.

आठवणींतून आठवणी निघतात. केतकराचे 'उत्तर अमेरिकेतील वसंतकाल' हे काव्य किंवा त्याचा काही भाग १९१४-१५ च्या सुमारास प्रसिद्ध झाला होता. त्यात वर्णिलेल्या विषयावर कडक शब्दांत केलेली टीका एका मासिकात ( बहुधा 'केरळकोकीळ व नवे मन्वंतर' असावे ) त्याच सुमारास आली होती. ती मोठ्या आवडीने त्या लहान वयात मी वाचीत असें. साहित्यसंमेलनातील केतकराचे काव्यगायन ऐकून मला त्या टीकेचे स्मरण झाले. १९१४ सालचा समजुतींतला अपक्वपणा १९२७ सालीं राहिलेला नव्हता; उलट परदेशात केलेल्या किंवा पाहिलेल्या मौजाचे निर्विकार संथपणाने व खेळीमेळीच्या प्रांजलपणाने वर्णन करणाऱ्या केतकराना पाहून या व्यक्तीमध्ये काही कुतूहलजनक अद्भुतता आहे, अशी भावना त्याचे काव्यगायन ऐकताना झाली.

मिस कोहन याच्याशीं डॉ. केतकर यानी केलेला विवाह तत्कालीन सामान्य लोकमतानुसार आम्हास त्या अपक्व वयात गर्ह्यच वाटला होता आणि त्यासाठी त्यानी केलेला व्रात्यस्तोम म्हणजे निवळ व्रात्यपणाच

असें वाटत होतें. ('आता अर्थात् तसें वाटत नाही.) तथापि या सर्व कृत्यांमध्ये एक प्रकारची चमत्कृतिजनक अलौकिकता होती; आणि त्या ठिकाणी काही विलक्षणपणा, असामान्यता दिसेल त्याकडे ओढ घेण्याचा माझ्या मनाचा स्वभावच असल्यामुळे डॉक्टराविषयी मला एकप्रकारचे कुतूहलमिश्र आकर्षण तेव्हापासूनच वाटत होते.

परंतु हे डॉक्टर केतकराविषयी झाले. त्याच्या ज्ञानकोशाविषयी तर यापेक्षाही प्रतिकूल भावना मनात वसत होती. ज्ञानकोशामध्ये त्यांनी मराठी काव्याविषयी "एकंदरीने मराठीतील काव्यवाङ्मय म्हणजे उष्टे आणि भिकार होय... आजपर्यंत झालेले मराठी वाङ्मय सर्व जरी जळून गेले तरी जगाचे काव्यनाश या दृष्टीने काही एक नुकसान व्हावयाचे नाही." असे जे विधान केले होते त्यावर सर्वत्र बरीच टीका झालेली त्या वेळी ताजी होती. शिवाय ज्ञानकोशाचे जे थोडेसे प्रसंगोपात्त अवलोकन त्यापूर्वी मी केले होते त्यावरून त्याच्या अपूर्णतेचा प्रत्यय मला आलेला होता.

केतकर व ज्ञानकोश याच्याविषयी माझ्या मनोवृत्ति याप्रमाणे होत्या अशा काळीं, वर सांगितल्याप्रमाणे १९२७ साली, डॉक्टरसाहेब एकदम मजपुढे 'दत्त' म्हणून उभे राहिले. संभाषणामध्ये मी त्यांना नडविले परंतु कृतीमध्ये मी त्याच्यापुढे हार खाल्ली. म्हणजे इतकेच की मी ज्ञानकोशाचा ग्राहक झालो.

"तुमच्यासारख्या प्रोफेसरांनी तर ज्ञानकोश अवश्य घेतला पाहिजे. निरनिराळ्या विषयांची माहिती हरघडी तुम्हाला लागणार. त्यासाठी संदर्भ ग्रंथ अवश्य पाहिजे. 'ब्रिटानिका'सारख्या परकीय ज्ञान-कोशाचा आपणास काही उपयोग नाही. आपल्या देशातील लोकांच्या गरजा पाहून तयार केलेला ज्ञानकोशच तुमच्या उपयोगी पडेल." असा युक्तिवाद करून डॉक्टरसाहेबांनी ज्ञानकोश ज्यांनी घेतला अशा काही प्रोफेसरांची नावेंही मला सांगितली.

"डॉक्टरसाहेब! खरोखर जर पाहिले तर मला काही तुमचा ज्ञानकोश घ्यावा असे वाटत नाही. कारण मला त्याचा काही उपयोग

होण्याचा संभव दिसत नाही. सर्वसामान्य माहितीचे जे विषय आहेत ते 'ब्रिटानिका'मधून आम्हास उत्तम रीतीने जाणून घेतां येतात. आपल्या देशासंबंधाच्या विशिष्ट ज्या बाबी आहेत त्यांपैकी आम्हाला ज्या माहितीची जरुरी लागावयाची ती देणारीं पुस्तकें बरीचशीं मजजवळच आहेत आणि काही मला सहज मिळण्याजोगी आहेत. तेव्हा तुमच्या ज्ञानकोशाचा मला काही उपयोग होईलसे दिसत नाही."

यावर डॉक्टरसाहेबानी निरनिराळया रीतींनी माझ्याशीं युक्तिवाद करण्याचा प्रयत्न केला. हिंदुस्थानविषयक माहिती देण्यात ज्ञानकोशाचीं किती पृष्ठे खर्च पडलीं आहेत, ती माहिती कोणकोणत्या दुर्मिळ ग्रंथातून कसकशी मिळविण्यात आली, इत्यादि गोष्टींचे विवरण त्यानी केले. बऱ्याचशा बाबतीत नवीन संशोधन केले असल्याचीही प्रौढी त्यानी गायिली. तथापि माझी समजूत पटल्याचे चिन्ह काही माझ्या चेहऱ्यावर उमटेना.

"डॉक्टरसाहेब, कानाकोपऱ्यातल्या गोष्टी नेहमी थोड्याच उपयोगी पडावयाच्या आहेत ? नेहमी लागणाऱ्या विषयाची माहिती चटकन् हाताशीं येण्याजोगी असली तर त्या संदर्भग्रंथाचा खरा उपयोग. आधुनिक महाराष्ट्रातल्या प्रसिद्ध पुरुषाची माहिती ज्ञानकोशात आली पाहिजे इतकें तरी आपण कबूल कराल की नाही ? कुंटयासारख्या प्रसिद्ध पुरुषाचे सदर आपल्या ज्ञानकोशात नाही. अशाच किती तरी व्यक्तींसबंधाने माहिती सुलभ रीतीने देता येण्याजोगी असूनही ज्ञानकोशात दिलेली आढळत नाही."

ज्ञानकोशात उल्लेख नसलेल्या अशा आणखी कोणच्या व्यक्तींची नावें मी त्या वेळीं सांगितलीं हे आता आठवत नाही, परंतु कुंटयाचे नाव ऐकून डॉक्टरसाहेब थोडे स्तिमित झाल्यासारखे झाले, यात शंका नाही. तथापि त्यामुळे मुळीच ओशाळून न जाता एकप्रकारच्या प्राजळपणाने व सरावलेल्या मालखपण्याच्या चिकाटीने ते म्हणाले, "अशा ज्या काही उणिवा ज्ञानकोशात राहून गेल्या असतील त्या आम्हाला जरूर कळवा. कोणकोणत्या आणि किती उणिवा राहून गेल्या आहेत हें पाहण्याकरिता तरी आमच्या ज्ञानकोशाची एक प्रत तुम्हाला जरूर घ्याव-

यास पाहिजे. ज्ञानकोशांत राहून गेलेलीं व्यंगे भरून काढण्यासाठी आम्ही पुरवणी खंड काढणार आहो, ते काढण्याचा काल शक्य तितका जवळ आणण्यास ज्ञानकोशाच्या शिल्लक प्रती विकत घेऊन पडीत मालाचा उठाव करण्यास हातभार लावणे हाच परिणामकारक उपाय आहे."

परंतु यानतर डॉक्टरसाहेबाना जास्त युक्तिवाद करण्याची मी जरुरी मी ठेवली नाही, ग्राहक होण्याचे मी मान्य केले. पुढे बराच वेळपर्यंत निरनिराळ्या विषयावर आमचे मोकळेपणाने संभाषण झाले. त्याच वेळेस त्यानी आपल्या घरी पाळलेल्या बापट बधूसबधाने हकीगत सागितली. त्या मुलाच्या सबधाने होत असलेल्या भुताटकीच्या प्रकाराचे वर्णन अनेकवार खुल्या दिलाने करताना त्याना मी ऐकले आहे.

## ३. अंतरंग-परिचय

पुढे योग्य समयीं ज्ञानकोशाचे सर्व खंड मजकडे आले व त्याचें विशेष लक्षपूर्वक अवलोकन माझ्या हातून होऊं लागले. त्यामुळे ज्ञानकोशाविषयीचा माझा प्रतिकूल भाव हळू हळू पालटू लागला. परंतु माझ्या मनाला कलाटणी मिळाली ती मुख्यत्वेकरून " माझे बारा वर्षांचें काम उर्फ ज्ञानकोशमंडळाचा इतिहास " या पुस्तकाच्या वाचनाने. केतकराच्या विद्वत्तेचे, कर्तृत्वाचे व मनाचें मोठेपण जर कोठे एकत्रित रीताने व्यक्त झालेले पाहावयाचें असेल तर तें याच ग्रंथात. या ग्रंथाच्या वाचनाने केतकराचा ज्ञानकोश हे केवढ्या दाडग्या कर्तृत्वाचें फळ आहे हे मनात बिंबलें व अनेक उणिवा असूनही ज्ञानकोश हा एक महान् ग्रंथ कसा झाला आहे, हें मनास पटले. डॉ. केतकराचा परिचयही या प्रसंगानंतर कायम झाला व प्रसंगाप्रसंगाने तो उत्तरोत्तर दृढच होत गेला.

× × ×

यानंतरचा प्रसंग १९२८ अगर १९२९ सालातला असावा. नागपूरच्या मॉरिस कॉलेजाने आपल्या वार्षिक स्नेहसंमेलनासाठी प्रमुख वक्ते म्हणून डॉ. केतकरास पाचारण केलें होतें. समारंभाचे अध्यक्ष या

नात्याने डॉक्टरानी केलेल्या भाषणांतील मुद्दे जरी चांगले होते तरी वक्तृत्वगुणांच्या दृष्टीने तें निराशाजनक झालें. त्यात त्यानी दोन गोष्टी मुख्यत्वेंकरून सागितल्या. वऱ्हाड–नागपूर प्रात हा अत्यंत प्राचीन व पुढारलेल्या संस्कृतीचा वारस असून संशोधनाला येथे अतोनात सामग्री उपलब्ध होण्याजोगी आहे. तेव्हा या प्रांतातील होतकरू तरुणानी संशोधनकार्यात पुढे सरसावले पाहिजे व सरकारलाही प्राचीन अवशेषाचें उत्खनन करण्यास भाग पाडले पाहिजे. प्राचीन विदर्भातील कन्या आपल्या स्वतंत्र बाण्याबद्दल प्रसिद्ध असून आपला नवरा पसत करण्याचा हक्क त्या स्वतः बजावीत असत. विदर्भातील स्त्रियाचा तेजस्वीपणा व स्वतंत्र बाणा दमयंती, इंदुमती, रुक्मिणी इत्यादि राजकन्याच्या उदाहरणावरून व्यक्त होत असून तोच बाणा सध्याच्या मुलींनी देखील कायम ठेवला पाहिजे. इ. इ.

या त्याच्या सिद्धान्तावर सायंकालच्या उपाहाराच्या वेळी कॉलेजच्या मुलासमोर त्यानी जे भाष्य केले ते सोवळ्या नीतिवाद्यास रुचण्याजोगे नव्हते. शाळा कॉलेजे ही मुलामुलींनी परस्पराशी प्रेम जुळविण्याचीं ठिकाणे होत; त्यानी तसे करूं पाहिल्यास त्यात गैर असे काही नाही; मात्र या प्रेमाराधनेस योग्य वळण लागावे आणि वंशशास्त्राच्या दृष्टीने अनिष्ट सबध घडून येऊं नयेत यासाठी अध्यापक वर्गाने या बाबतींत मार्गदर्शन केले पाहिजे; असा त्याच्या प्रतिपादनाचा आशय होता. अशा गोष्टी आणि त्या केतकरानी मनमोकळेपणाने खुलवून सागितलेल्या, तेव्हा पुष्कळानी मिटक्या मारीत त्या ऐकून त्यावर चावटपणाचीं भाष्यें केलीं, हे ओघानेच झालें. काही गभीर प्रकृतीच्या लोकाना हा 'चावटपणा' (केतकराचा आवडता शब्द !) मनातून खपला नाही व त्यानी त्याविषयी नापसंती व्यक्त केली. परंतु केतकराचे बोलणे थट्टेच्या सुरातले भासत असले तरी त्यात सामाजिक दृष्ट्या गंभीर व महत्त्वाचा असा एक प्रश्न अतर्भूत झाला होता इकडे कोणाचेच लक्ष गेलें नाही. सहशिक्षणाच्या सध्याच्या कालात उमलत्या वयातील मुलामुलींचे परस्पर सघटन कशा प्रकारचे होत आहे व व्हावयास पाहिजे याचा विचार वस्तुस्थितीकडे

डोळेझाक न करिता समाजनेत्यानी केला पाहिजे. केतकराच्या प्रवचनाचा आशय असाच होता.

× × ×

मॉरिस कॉलेजच्या बोलावण्यावरून डॉक्टरसाहेब नागपूरला आल्याची संधि साधून नागपूरच्या प्रौढ विद्यार्थिवर्गाने, म्हणजे हिस्लॉप व मॉरिस कॉलेजातील मराठी मंडळाच्या सभासदानी डॉ. केतकर याना मानपत्र देण्याचा समारंभ मोठ्या थाटाने साजरा केला. त्या प्रसगीं डॉक्टरानी आपला कालिदासाच्या 'मालविकाग्निमित्रा'वरील निबंध वाचून दाखविला. तो निबंध पुढे 'महाराष्ट्र' पत्रातून प्रसिद्ध झाल्यावर नागपूरचे सुप्रसिद्ध प्राच्यविद्याकोविद प्रो. मिराशी यानी विरुद्ध बाजू घेऊन त्यावर उत्तरपक्ष केला. दोन तुल्यबल पंडितामधील हे वाग्युद्ध चांगलेच रंगले. पुढे डॉक्टराची जेव्हा जेव्हा भेट होई तेव्हा तेव्हा बहुधा ते प्रो. मिराशींच्या संबंधी विचारपूस करीत व उपर्युक्त वादासंबंधीही बरेच बोलत. त्याच्या मनावर या वाग्युद्धाचा फार परिणाम झालेला होता.

× × ×

इ. स. १९३१ साली दक्षिण हैद्राबादला साहित्यसंमेलन झाले. नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे साहित्यपरिषदेविरुद्ध लोक खवळलेले होते. आणि खुद्द परिषदेमध्येही भांडणे होतीच. अनेक कारणामुळे हैद्राबाद येथे या असंतोषाने विशेषच उग्र स्वरूप धारण केले होते हैद्राबादकर मंडळीचाही आवेश कमी नव्हता. या सर्व असंतुष्ट जनतेचे म्होरकेपण केतकरानी पतकरले. एका लहानशा 'कॅबिनेट' मध्ये परिषदेच्या अधिकाऱ्याना निर्वाणीचा संदेश धाडण्याचे ठरले. 'परिषदेच्या अधिकाऱ्यानी परिषदेमधली भांडणे मिटवून संमेलनाच्या ठरावाची अंमलबजावणी व्यवस्थित रीतीने करण्याचे आश्वासन एका दिवसाच्या आंत न दिल्यास संमेलन परिषदेशी असलेला संबंध तोडून टाकील.' अशा आशयाचा हा निर्वाणीचा संदेश होता. हा संदेश पाठविण्याची कल्पना केतकरांचीच होती. संमेलनाच्या विषयनियामक मंडळांत या

विषयावर संतापाचीं भाषणें होत होतीं. दरम्यान खुद्द परिषदेच्या सभामध्येही खूप धामधूम होऊन पानावर पान ठेवून एकप्रकारची पुनर्घटना करण्यात आली होती. परंतु संमेलनवाल्यांचें तेवढ्याने समाधान न होऊन त्यानी आपल्या ठरावाची अंमलबजावणी करण्याकरिता एक स्वतंत्र कार्यकारी मंडळ नेमलेच. या मंडळाचे डॉ. केतकर अध्यक्ष होते व मी त्यात एक सभासद होतों. साधनाच्या अभावीं हे मंडळ फारसें काही काम करू शकले नाही. तथापि मंडळाचें अस्तित्व संधि सापडताच केतकरानी चांगले गाजविण्यास मात्र सोडले नाही. हैद्राबादला दिलेले सांगलीचे पुढील संमेलनाचे आमंत्रण फिसकटल्यानंतर कोल्हापुराकडून आमंत्रण मिळवून तेथे संमेलन भरविण्यास मान्यता देण्याचा जो उपक्रम परिषदेच्या मंडळीकडून झाला, त्याला कायदेशीर मुद्द्यावर विरोध करण्यास अध्यक्ष या नात्याने डॉ. केतकर हे उभे ठाकले! त्यांच्या मागे अनुयायिवर्ग नसल्यामुळे त्यांचे म्हणणें टिकूं शकले नाही, तथापि परिषत्-प्रमुखास गदगदा हलवून त्यानी बेचैन करून सोडले यात शंका नाही. केवळ न्यायतः पाहिले तर त्यांची बाजू बळकट नव्हती असेही नाही. परंतु केतकर हे एकाडे! केतकरांनी अनेक अचाट गोष्टी करून दाखविल्या, परंतु सबंध जन्मात एक गोष्ट त्यास साध्य करून दाखविता आली नाही. लोकसंग्रह करून लोकांच्या पाठिंब्याच्या जोरावर एखादी चळवळ अगर एखादी सार्वजनिक संस्था उभारणे व चालून दाखविणे हे त्यास साधलें नाही. ते साहित्यविषयक संघटनेत पडले, राजकारणी खडाटोपही त्यानी अनेक केले. परंतु या दोन्ही बाबतीत ‘ विक्षिप्त ’ ठरून अपयशाचे मात्र धनी झाले. लोकांच्या भावना जागृत करून त्यांच्या मनाची पकड घेण्याची समाजनेत्यास अवश्य असलेली कला जन्मतःच त्यास साध्य नव्हती.

## ४. निरपेक्ष हितकर्ता व प्रांजळ सल्लागार

नवभारत ग्रंथमालेच्या सुरवातीस (१९३१ साल) अनेक विद्वानांना व साहित्याचार्यांना मी भेटलों होतों व सर्वांनी आपआपल्या परीने मालेच्या उपक्रमाबद्दल चालकाचें अभिनंदनही केलें होतें. परंतु

डॉ. केतकरांशीं या बाबतींत केलेला विचारविनिमय जितका उपयुक्त, मर्मस्पर्शी व बोधप्रद झाला तितका इतर कोणाशींही केलेला झाला नाही मालेच्या सुरवातीच्या सुमारास मी त्याना एकवार भेटलों, तेव्हा व्यावहारिक बाबतींत त्यानी आपणहून बराच मूल्यवान् सल्ला दिला.

"हे पहा, तुम्ही असे करा. एक खासगी मर्यादित जबाबदारीची मंडळी (प्रायव्हेट लिमिटेड कंपनी) काढा. मिस्टर बनहट्टी, मिसेस बनहट्टी व तुमची मुले हे त्या कंपनीचे भागीदार! तुम्ही स्वतः त्या कंपनीचे डायरेक्टर. प्रकाशनाच्या धंद्याला मर्यादित जबाबदारीच्या मंडळीची योजना फार चांगली. दुसरे, छपाईची योजना तुम्ही काय करणार आहात? पुण्यामुंबईहून पुस्तके छापवून नेणे तुम्हास सोईचें पडणार नाही. थोडासा टाइप स्वतः ठेवून तुम्ही मजकूर कंपोज करीत चला व एखाद्या नागपूरच्या छापखान्याशीं ठराव करून त्याजकडून छपाई करून घेत जा. स्वतंत्र छापखान्याच्या अभावी त्यांतल्या त्यात ही व्यवस्था तुम्हास सोईस्कर पडेल."

याप्रमाणे त्याच्या एकंदर सल्ल्याचा सारांश होता. नवभारत ग्रंथमालेची कल्पना जरी माझी असली तरी तिचे चालक निराळेच आहेत, मी एक फुकटचा सल्लागार आहे, इत्यादि परिस्थिति मी डॉक्टरसाहेबाना समजावून सांगितली व त्यानी दिलेला सल्ला मालेच्या चालकांना निवेदन करण्याचे मी आश्वासन दिले. मालेच्या चालकाना हा सल्ला काही काळ अनुकरणीय वाटला नाही. परंतु पुढे काही वर्षांनी ते प्रायव्हेट लिमिटेड कंपनीच्या मार्गास अनुसरले.

त्याच सुमारास झालेली आणखी एक भेट मला विशेष संस्मरणीय वाटते. दोनप्रहरीं तीन वाजण्याच्या सुमारास मी 'आशास्थाना'त गेलों. कागदाच्या, मुद्रित पत्राच्या, पुस्तकाच्या पसाऱ्यामध्ये एका विस्तीर्ण टेबलाशीं डॉ. केतकर खुर्चीवर विराजमान झाले होते. निदान दोन अडीच तास तरी डॉक्टरसाहेबाच्या सहवासात मी त्या वेळीं घालविले असतील. नवभारत ग्रंथमालेची योजना ऐकून त्यानी व्यावहारिक दृष्टीने ती यशस्वी होणार नाही असा अभिप्राय प्रकट केला. ते म्हणाले, "अल्प

किमतीचीं लहान लहान पुस्तकें प्रसिद्ध करीत बसणें धंदा या नात्याने परवडणार नाही. तुमचा हा उद्योग नेहमी तोट्यात राहील. कारण अशा पुस्तकाच्या विक्रीसाठी प्रचारकास भरपूर कमिशन देणे तुम्हांस शक्य होणार नाही. त्यामुळे चागला प्रचारक तुम्हास ठेवता येणार नाही व पुस्तकाचा खप होणार नाही. शिवाय मिळकतीच्या मानाने संपादकीय व व्यवस्थापकीय खर्च प्रमाणतः जास्ती होईल. त्यामुळेही हा उद्योग फायदेशीर होणार नाही. आमच्या ज्ञानकोशाला एक ग्राहक मिळविला तरी प्रचारकास जे कमिशन सुटेल ते तुमच्या मालेला पंधरा ग्राहक मिळविल्याने सुटणार नाही. परतु तुमच्या मालेला पधरा ग्राहक जेवढ्या वेळात मिळतील तेवढ्यात तोच प्रचारक ज्ञानकोशास निदान चार पाच तरी ग्राहक खास मिळवील."

मी त्यावर प्रश्न केला, "पण मग पाश्चात्त्य देशात अशा तऱ्हेच्या ग्रंथमालांना भरपूर ग्राहक कसे मिळतात? त्याच्याकडे अशा तऱ्हेच्या माला पिढ्यानपिढ्या चालतात व नवीनही एकसारख्या निघतच असतात. यावरून त्याची चागलीच चलती असली पाहिजे असे दिसतें."

"पाश्चात्यामध्ये जे शक्य आहे तेच इकडेही शक्य होईल असे नाही. त्याच्याकडे शिक्षणाचा व ज्ञानाचा प्रसार इतका झाला आहे व वाचनाभिरुचि इतकी अधिक आहे की सामान्यतः चागल्या पुस्तकास पुरेसें गिऱ्हाईक मिळण्यास अडचण पडत नाही."

"आपल्याकडेही तशी स्थिति लवकरच येणार नाही काय? तशी स्थिति येण्यासाठी आमचा प्रयत्न काही थोडासा तरी उपयोगी पडेल की नाही?"

"परंतु हा प्रयत्न करता करताच तुम्ही गारद व्हाल याची वाट काय?"

"एक तर आम्ही केवळ धंदेवाईक दृष्टीने हा उद्योग सुरू केलेला नाही. यात काम करणारी मंडळी हौसेखातर निर्वेतन काम करणारी आहेत. तेव्हा व्यवस्थापकीय सपादकीय खर्चाचा बोजा निदान प्रथमचीं काही वर्षे तरी यावर पडणार नाही. शिवाय चिकाटीने प्रयत्न

केल्यास पुरेसे ग्राहक मिळणें अशक्य होणार नाही अशी आशा आम्ही बाळगून आहो. आमचा अनुभव या बाबतींत सर्वस्वी निराशाजनक आहे असे नाही." असे म्हणून मालेच्या चालकाना प्रसाराच्या कामी आलेला काही अनुभव मी डॉक्टरास निवेदन केला.

"चालकाना आलेला अनुभव सध्या जरी थोडासा उत्साहजनक वाटत असला, तरी तो तसाच किती काळ कायम टिकेल याची शंका आहे. तथापि तुमचा आशावाद जबरा आहे. तुम्ही जरूर आपले कार्य चालू ठेवा. मी तुम्हाला यश चिंतितो. खरे म्हणाल तर ललितेतर व ज्ञानप्रद अशा फुटकळ वाङ्मयाच्या प्रकाशनाचा मला स्वतःला अनुभव नाही. कदाचित् तुमचे साहस यशस्वी ठरेलही. अशा बाबतींत मनुष्याने प्रत्यक्षानुसारी ( inductive ) पद्धतीनेच विचार केला पाहिजे."

"आम्हीही फार मोठया आशाचे मनोरे उभारले आहेत असे नाही." मी डॉक्टरसाहेबाना उत्तरादाखल म्हणालो. "परंतु काम करणारी मंडळी वेतन न घेता काम करणारी आहेत ही गोष्ट लक्षात घेतली तर मर्यादित प्रमाणात आम्ही यशस्वी होऊ अशी आशा वाटते."

"ठीक आहे. माझा अनुभव या बाबतीत मर्यादित आहे. तेव्हा मी तुमच्या यशापयशाबद्दल काही सांगू शकत नाही. माझी कल्पना अशी की एक तर ज्ञानकोशासारखी मोठी योजना तरी व्यावहारिक दृष्टया यशस्वी होईल किंवा अगदीच लहान, म्हणजे चारचार आण्याची पुस्तके काढलीं तर त्याचाही खप कदाचित् भरपूर होईल. पोस्टकार्डाच्या आकाराचीं व ६० ते ८० पानांचीं लहान लहान पुस्तके काढावीं. प्रत्येकी चार सहा आणे किंमत ठेवावी व त्याच्या हजारों प्रती काढून खपवाव्या."

"पण इतक्या लहानशा मर्यादेत एखाद्या विषयाचे सांगोपांग व आकर्षक रीतीने विवेचन करणारे लेखक आपल्यात आहेत कोठे? नवभारत ग्रंथमालेकरिता योग्य मर्यादेत पुस्तके लिहून घेण्यासच आम्हास फार प्रयास पडतात."

"खरे आहे. अगदी ढोबळ व प्रसिद्ध विषयांवर देखील योग्य रीतीने योग्य मर्यादेंत मजकूर लिहून देणारे अभिज्ञ लेखक आपल्याकडे मिळणे हे अत्यंत कठीण जाते."

यानंतर निरनिराळ्या विषयांवर आमचे संभाषण झाले. प्राचीन महाराष्ट्रासंबंधींचे सर्व शिलालेख, ताम्रपट व इतर चिरंजीव लिखाणें व त्यांचें मराठी भाषांतर इतक्याचाच एक खंड प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासाचा एक भाग म्हणून काढण्याचा आपला बेत असल्याचे त्यानी सांगितले. (हा बेत पुढे त्यानी सोडून दिला.) "शिलालेख, ताम्रपट व इतर पुष्कळ साधने इंग्लंडात आहेत, त्याचा उपयोग करून घेण्यासाठी इंग्लंडात जाण्याचा विचार आहे." असेही ते म्हणाले.

संभाषण चालू असता एक मौज झाली. त्यांच्या बबर्जीने योग्य वेळीं चहाचा कप पुढे आणून ठेवला. त्यानी मजकरिता आणखी एक कप आणावयास सांगितला. त्या वेळी बोलण्याच्या भरात माझे तिकडे लक्ष गेले नाही. तो कप आला व मला घेण्याबद्दल डॉक्टरानी सांगितले, तेव्हा मी चहा घेत नसल्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करून नकार दर्शविला. डाक्टरानीं सॅकरिनचे कण टाकून आपला कप तर घेतलाच, परंतु बोलण्याच्या भरात मजकरिता आणलेला कपहि तोंडास लावला. घोट घेताच चूक त्यांच्या लक्षात आली. परंतु त्यांचे चहाप्रेम दांडगे असल्याने तो कप साध्या साखरेचा होता तरी पिऊन टाकण्यास त्यानी मागेपुढे पाहिले नाही.

## ५. ग्रंथकार या नात्याने संबंध

पुढे ग्रंथकार या नात्याने डॉक्टरांचा व नवभारत ग्रंथमालेचा संबंध आला व त्यामुळे आमचे प्रेमाचे व सलोख्याचे संबंध अधिकच दृढ झाले. त्यानंतर त्यांची भेट घेण्याचे प्रसंग अनेकवार आले. पुण्यातील अनेक प्रसिद्ध अप्रसिद्ध व्यक्तींसंबंधाने त्यानी अगदी मोकळ्या मनाने अनेक गोष्टी मजजवळ सांगाव्या आणि मीही उत्सुक परंतु निर्विकार मनाने त्या ऐकाव्या असें वारंवार चाले. त्यांच्या राजकीय प्रयत्नांच्या व आपण स्वतः स्टेट सेक्रेटरीवर दावा करून स्वराज्य मिळविले असल्याच्या प्रौढीच्या गोष्टी तर त्यानी कितीदा तरी सांगाव्यात. या बाबतींत बोलणें अलीकडे त्यांस फार आवडे व श्रोता कितीही सांशंक अगर चेष्टेच्या भावनेने प्रेरित झालेला असो, ते अत्यंत मनःपूर्वक रीतीने व

आवेशाने स्वतः कोर्टातील दाव्याने मिळविलेल्या (!) स्वराज्याचा वृत्तात त्याच्या मनात ठसविण्याचा प्रयत्न करीत असत.

हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रातांतील वाङ्मयाचा व विचार-प्रवाहाचा परस्परास परिचय व्हावा या उद्देशाने परप्रातीय भाषा शिकण्याची प्रवृत्ति वाढविली पाहिजे व परभाषाभाषी सर्व ठिकठिकाणी काढून परप्रातीय भाषा जाणणाऱ्यानी परस्परात विचारविनिमय करण्याचा उपक्रम सुरू केला पाहिजे, असे दोन वर्षांपूर्वी नागपूर येथे झालेल्या एका भेटींत ते मजजवळ म्हणाले होते. याच गोष्टीचा त्यानी आपल्या 'विद्यासेवका'तही त्या सुमारास उल्लेख केला असल्याचे स्मरते. त्याच वेळीं चर्चेच्या कक्षेत असलेल्या 'भारतीय साहित्य परिषदे'ची कल्पना त्याच्या कल्पनेशीं जुळणारी असल्याने थोरांचीं मनं एका वेळेस एकाच दिशेने कशीं चालू लागतात, याचा प्रत्यय येऊन मला मोठा आनंद वाटला.

त्याची माझी शेवटची भेट १९३६ च्या मे महिन्यात झाली. त्यांनी सुचविलेल्या वेळीं त्यांच्या 'आशास्थाना'त मी दोनतीनदा गेलों, तरी त्याची भेट झाली नाही. मी तेथे चिठी ठेवल्यावरून ते माझ्या बिऱ्हाडाचा शोध करीत एके दिवशीं सकाळी आले. परतु त्याना माझ्या बिऱ्हाडाचा पत्ता लागला नाही. डॉ. केतकरासारखा महापडित माझ्या भेटीसाठी वणवण हिंडून गेला हे समजताच अनेक साहित्यिक म्हणविल्या जाणाऱ्या व्यक्तींविषयी आलेले अनुभव माझ्या डोळ्यापुढे झरकन सरकून गेले. त्याचा लब्धप्रतिष्ठितपणा, मोठेपणाचा आव घालणारे त्याचे कोते मनोव्यापार, याचा अनुभव घेऊन तप्त झालेलीं मने ज्याच्या परिचयात शीतल व शात व्हावीत असेच निर्भीड वृत्तीचे वैं मोकळ्या मनाचे डॉक्टर केतकर होते. नतर दोन तीन दिवसानी मी त्यांच्या 'आशास्थानां'त काम करणारे श्री. बापट याच्याबरोबर कॅपांतील काहून रोडवर असलेल्या त्यांच्या घरीं त्याना भेटावयास गेलो. त्या वेळींही गप्पागोष्टी पुष्कळच झाल्या. ज्ञानकोशाची माहिती आजतागायत आणून ठेवण्याकरितां जी पुरवणी ते अनेकाच्या साहाय्याने तयार करीत होते तिचें काम आटपत आल्याचे त्यानी सागितले. इतका सर्व पसारा

झेपत नसल्याच्या चितेची छाया त्याच्या मनावर पडलेली असावी काय असा मला त्या वेळी भास झाला. "दरमहाचा खर्च माझा जवळजवळ हजार रुपयाचा असतो" असे ते म्हणाले. यात अतिशयोक्ति कितपत असेल, हे सागता येत नाही. तथापि "हे सर्व भागते कसे ?" असे विचारता "भागते असेच कसे तरी. मागच्या काही बाक्या वसूल होतात तर काही पुस्तके व इतर लिखाण याचे पैसे मिळतात. काही नवीन ग्राहक मिळतात. अशींच काही उत्पन्नाचीं लहान लहान सदरे मिळून कसें तरी गाडे पुढे ढकललें जाते." असे ते म्हणाले. 'विचक्षणा' कादंबरीचा सोदा त्या वेळीं नुकताच झाला होता, त्याची हकीकत त्यानी मला सागितली; व 'भटक्या' नावाच्या आपल्या अप्रसिद्ध कादंबरीची हकीकत व तिचे कथानक सागून "तुमचे प्रकाशन मंडळ ती कादंबरी प्रकाशनाकरिता घेत असल्यास पहा," असे त्यानी सुचविले. कादंबरीचे हस्तलिखित त्या वेळीं त्याजजवळ नव्हते. मागाहून त्यानी ते सुविचार प्रकाशन मंडळाचा सल्लागार या नात्याने मजकडे पाठविले. पण प्रकाशनाचा योग जमून आला नाही. नवभारत ग्रथमालेमध्ये भारतीय समाजशास्त्राच्या घटनात्मक विभागावर त्यानी जो ग्रंथ लिहिला त्याच्या प्रस्तावनेत धारणात्मक समाजशास्त्रावर ग्रंथ लिहिण्याची कल्पना त्यांनी व्यक्त केली आहे. तो ग्रंथ त्यानी लवकर लिहून द्यावा अशी मी त्याना याच वेळीं विनंती केली. तो ग्रंथ सध्याच्या ग्रंथापेक्षाही अपूर्व व अमूल्य झाला असता. पण—

याच बैठकींत त्यानी शीलवतीबाईशीं माझी ओळख करून दिली. ओळख करून देऊन पुढे, "यांचे वडील जुन्या संस्कृत शास्त्र-विद्येचें शिक्षण विद्यार्थ्यांना अद्याप अगदी जुन्या पद्धतीने देत असतात. इंग्रजी शिक्षण घेतलेल्यामध्ये असे उदाहरण अगदी विरळा आढळते." —अशी माझ्या वडिलांच्या कामगिरीचें कौतुक करणारी पुस्ती त्यानी जोडली. भारतीय संस्कृतीच्या रक्षणावर त्यांचा फार कटाक्ष होता व तो दिवसेदिवस वाढत चालला होता. जुनी शास्त्रविद्या जुन्या तऱ्हेने पढल्यानेच आपल्या संस्कृतिरक्षणाच्या कामीं तिचा उपयोग होऊं

शकेल, आधुनिक चिकित्सक पद्धतीने शिकून तिचा काही उपयोग होणार नाही, असे त्याचें मत होतें व यासंबधाने त्याचा फार कटाक्ष होता. शास्त्रविद्या विद्यार्थ्यांस पढविण्याचें कार्य माझ्या वडिलांनी चालविले असल्याचे प्रत्यक्ष दृश्य त्यानी पाहिलें होतें व तत्संबंधी लोकप्रसिद्धिही ऐकली होती. त्यामुळे ते अलीकडे जेथे जेथे भेटत तेथे तेथे वडिलाच्या कार्याबद्दल प्रशंसात्मक उद्गार काढून शेजारी जे लोक असतील त्याना त्याबद्दल आवर्जून सागितल्याखेरीज राहत नसत. जळगाव संमेलनाच्या वेळीं ते आणि मी दोन वेळा शेजारींच जेवावयास बसलो होतो. तेथेही एकवार वडिलाच्या कामगिरीचा प्रशसात्मक उल्लेख झालाच. जळगाव संमेलनाच्या वेळीं ( नोवेंबर १९३६ ) झालेली त्याची शेवटचीच दृष्टादृष्ट. त्यानतर त्याचे स्मरण हेंच काय ते आमच्याजवळ उरलं

## ६. तऱ्हेवाईक परंतु धारिष्टवान शास्त्रज्ञ

डॉ. केतकराच्या तऱ्हेवाईक प्रतिभेचा विचार करू लागलं म्हणजे आग्ल वाङ्मयातील सॅम्युएल बटलरची आठवण होते. दोघामध्ये फरक पाहू गेलं तर पुष्कळच आढळेल. ज्ञानकोशासारखी प्रचड योजना कल्पून ती पार पाडण्याचे व्यावहारिक सघटनाकौशल्य किंवा स्वदेश, स्वभाषा व स्वसस्कृति याविषयीची तीव्र अभिमानाची भावना बटलरमध्ये मुळीच नव्हती. तथापि केतकराच्या मनाला ही भावनाची बैठक असूनहि त्याच्या लिहिण्याबोलण्यात एक प्रकारची निर्विकारता व आदरशून्य चिकित्सक वृत्ति दिसत असे, तिचे स्वरूप सॅम्युएल बटलरच्या वृत्तीसारखे फार वाटते. विशेषतः त्याच्या 'वऱ्यावाईट आठवणी'तील त्यानी स्वतः आपली माता व इतर नातेवाईक याच्यासंबंधाची केलेलीं वर्णनें वाचली तेव्हा बटलरच्या The Way of All Flesh या कादंबरीची आठवण बरीच झाली. बटलरचा खुनशीपणा किंवा चीड डॉ. केतकरामध्ये मुळीच नव्हती व तशी उत्पन्न होण्याचे कारणही नव्हतें. पण एक विशिष्ट प्रकारचा फटिंगपणा, कौटुंबिक वातावरणाविषयी बेफिकिरी, भावनाशून्य रीतीने मानसिक हेतूंचे व अवस्थांचे

पृथक्करण व आविष्कार करण्याची पद्धति, इत्यादि ज्या विशेषामुळे डॉ. केतकराचे लिखाण आपणास अपूर्व असे वाटतें ते बटलरच्या लिखाणामध्येही आपणास प्रतीत होतात. रूढ समजाची पर्वा न करिता, लोकास विक्षिप्त किवा अतिरेकी वाटणारे विचार व्यक्त करण्याचें धारिष्ट्य बटलर व केतकर याच्यामध्ये सारखेच होते. त्यामुळेच बटलरच्या आयुष्यात बटलरची चहा मुळीच झाली नाही व इकडे डॉक्टर केतकरावरही थोडया निराळया सबधात, परंतु "मी जे काय लिहिले आहे त्याची उत्तम प्रकारे जाणीव होण्याइतका ज्ञानविकास भोवतालच्या जनतेत नाही. त्यामुळे लोकाच्या स्तुतिनिदेचीही मला फारशी फिकीर वाटत नाही." असे उद्गार काढण्याची पाळी आली. बटलरने कादंबरी लिहिली ती बव्हशीं आत्मचरित्रात्मकच आहे; डॉक्टरसाहेबानी कादंबऱ्या लिहिल्या त्यात स्वत:च्या अनुभवाचे व आपल्या विविध आयुष्यात आढळलेल्या निरनिराळया प्रकारच्या व्यक्तींचेच बव्हशीं चित्रण आहे. बटलर हा स्वतत्र विचार करून नवे सिद्धान्त बाधणारा, रूढ विचाराचा द्वेष्टा, असा शास्त्रज्ञ होता; तर डॉ केतकरही तसेच होते.

## ७. युगप्रवर्तक केतकर

परतु इतक्या लाब जाऊन आपल्या लोकास न समजणाऱ्या तुलना करीत बसण्यापेक्षा स्वतत्र प्रज्ञेच्या बाबतीत आपल्याकडील एका पुरुपाचे उदाहरण सहज सुचण्याजोगे आहे. हा पुरुप म्हणजे सशोधकाग्रणी राजवाडे होत हे वाचकाच्या सहज लक्षात येईल. राजवाडे आणि केतकर ! दोघाचे जीवितकार्य निराळे, त्याच्या आयुष्यक्रमाची तऱ्हाही परस्पराहून अगदी भिन्न. एकेका जीर्ण कपटयाची भीक मागत एक सर्वत्र हिडले, तर दुसऱ्यास एकेका ग्राहकाची भीक मागत भिरीभिरी भटकावे लागले. एकजण आहारविहारात अगदी व्यापक व नि:संकोची वृत्तीचा, तर दुसरा जणू प्रति कार्तिकस्वामीच ! असे असूनही केतकराशीं तुलना करण्यासाठी राजवाडे याचेच नाव सुचते याचे कारण त्या दोघाची सर्वगामी बुद्धिमत्ता व स्वतंत्र प्रज्ञा हे होय. स्वत:विषयीचा अहंभाव व इतरांविषयीची–विशेषत: प्रतिपक्षाविषयी–तुच्छता, यां

गुणांमध्ये दोघे एका माळेचेच मणी असले तरी केतकरांपेक्षा राजवाडे या बाबतीत वरचढ ठरतील. समंजसपणा, गुणग्राहकता, मनाचे औदार्य व मोकळेपणा या गुणांचें लेणें केतकरास लाभलें होते तर राजवाडे यांच्या वृत्तीस तुसडेपणाखेरीज दुसरें नाव देणे कठीण पडेल. दोघेही पट्टीचे इतिहासज्ञ व समाजशास्त्री, तथापि राजवाडे याचे लिहिणे शास्त्रीय कल्पनाच्या विद्युत्‌भारानी कितीही भारलेले असले तरी एकंदरीत भरमसाट, तर केतकराचे लिहिणे कितीही विचित्र कल्पनानी युक्त असले तरी एकंदरीने शास्त्रपूत असे. अमेरिकेमध्ये पाच वर्षे त्यानी पद्धतशीर रीतीने समाजविषयक आणि तत्संबंधी शास्त्राचा जो दाडगा व्यासंग केला त्यामुळे शास्त्रीय दृष्टि त्याच्या ठिकाणीं कोरीव लेखाप्रमाणे ठसली. त्याच्या विचाराची व लेखनाची शास्त्रीय बैठक कधी सुटली नाही. राजवाड्यानी अनेक शास्त्रात ढवळाढवळ केली, परंतु केतकरानी शास्त्रशुद्ध रीतीने अभ्यासलेल्या व करतलामलकवत् करून घेतलेल्या 'भारतीयाची समाजस्थिति व सामाजिक इतिहास' या समाजशास्त्रांतर्गत विषयाच्या बाहेर मौलिक लिखाण फारसे केलेले नाही.

परंतु सर्वात मोठा फरक अद्याप सागावयाचाच आहे. राजवाड्यांच्या कर्तृत्वास व्यावहारिक बाजू नव्हती तर केतकराच्या कर्तृत्वास ती फार मोठया प्रमाणात होती. सरकारचा वगैरे आश्रय न घेता, केवळ लोकाश्रयावर प्रचंड प्रमाणात वाङ्मयनिर्मिति करण्याची कल्पना मराठी साहित्यक्षेत्रात त्यानी प्रथम आणली, अशा वाङ्मयनिर्मितीला जरूर ती साधनसामग्री कशी मिळवावी हे त्यानी शिकविले, सघटना कशी करावी हे त्यानी स्वतःच्या उदाहरणाने दाखवून दिले आणि ही सर्व संघटना कार्यसिद्धीच्या पैलतीरापर्यंत नेऊन पोचविण्यास जरूर ती चिकाटीही त्यानी दाखविली. वाङ्मयकार्यात वावरून त्यावर जगणारा असा वर्ग समाजांत निर्माण करण्यास केतकराचें कर्तृत्व फार मोठया प्रमाणांत कारणीभूत झालेले आहे.

तेव्हा डॉ. केतकर यास दोन बाबतींत युगप्रवर्तकत्वाचा मान महाराष्ट्रीयाची आधुनिक पिढी खास देईल. महाराष्ट्रांत समाजशास्त्रीय

अभ्यासाचें नवें युग त्यांनी सुरू केलें आणि वाङ्मयव्यवहाराच्या नवीन दिशेचे मंत्रद्रष्टे ते स्वतः झाले. या दोन्ही बाबतींत त्यांनी स्वतः केलेल्या अतुलनीय कामगिरीचा व त्यानी स्वतः उत्पन्न केलेल्या प्रेरणेचा विचार करता त्याच्या कर्तृत्वाच्या कालखंडास म्हणजे १९१७–१९३७ या वीस वर्षांच्या अवकाशास, वाङ्मयक्षेत्रातील **केतकरी युग** म्हणून कोणी संबोधिलें तर ते अगदींच अनाठायीं होईल असें नाही. असे म्हणण्यांत इतर कोणाही कार्यकर्त्यास कमी लेखण्याचा उद्देश नाही. तथापि उपर्युक्त कालखंडात महाराष्ट्रीयाच्या बुद्धीवर व कार्यशक्तीवर वाङ्मयक्षेत्रात केतकराच्या इतका प्रभाव इतर थोडयाच व्यक्तींनी गाजविला असेल.

नानातऱ्हेच्या कल्पनांच्या चिचुंद्र्या जरी ते मधूनमधून सोडण्यास कमी करीत नसत, तरी ‘संस्कृतिरक्षण’ व ‘स्वराज्य मिळविण्याची कारवाई’ हे त्याचे राखीव बाण असत व ते वारंवार सोडण्यास ते कमी करीत नसत व्रात्यस्तोमाच्या अद्भुत कल्पनेच्या आधाराने हिंदूकरण करून युरोपीय स्त्रीशीं विवाह लावणाऱ्या आणि ‘वत्सतरी मडमडायते’ अशा कोटीत पडणाऱ्या या आधुनिक ऋषीकडून संस्कृतीचें रक्षण करून घेण्याची कल्पना आणि कोर्टातील दाव्याने स्वराज्य मिळविण्याची योजना समाजास कितपत पटली होती हे येथे सांगण्याची आवश्यकता नाही. आतषबाजीच्या हौसेने हवेत बाण उडविणाऱ्याचे येणारे जाणारे मौजेखातर महज कौतुक करतील यापेक्षा अधिक फलप्राप्तीची आशा त्यापासून कोणी करणार नाही. ज्ञानकोश मंडळाच्या महानसात स्वतःच्या बुद्धिमत्तेच्या अग्नीने ज्ञानकोशाचें महापक्वान्न कढविणारे केतकर हे महाराष्ट्राचे युगप्रवर्तक केतकर होत. त्याच्या मौलिक संशोधनाने व त्याच्या बुद्धिविकासकारी समाजशास्त्रीय लिखाणाने महाराष्ट्राच्या संस्कृतीचें खरें संवर्धन झालें आहे आणि वाङ्मयक्षेत्रातील त्याच्या स्वावलंबी दीर्घोद्योगाने स्वराज्य खरोखरी जवळ आणलें आहे.

---

७

# बंकिमचन्द्र चट्टोपाध्याय

[ 'विहंगम' जुलै १९३८ ]



# १

बंकिमविषयी चरित्रपर असं काय लिहावे? नेपोलियनसारख्या कृतिवीराविषयी किती लिहावे असा प्रश्न पडतो तर बंकिमसारख्या वाग्वीराविषयी काय लिहावें असा प्रश्न मनापुढे उभा राहतो. कवींचीं, लेखकाचीं, ग्रंथकाराचीं देखील चरित्रें, आणि तींही चागलीं जाडीं जाडीं, लिहिलीं जातात, हें खरें. परंतु त्यात त्याच्या वैयक्तिक जीवनक्रमाची माहिती थोडीशीच असते. साहित्यसेवकाचे बाह्य जीवन एक तर छंदी फंदी असावयाचें; किंवा तसें नसेल तर ते शुष्क, वैचित्र्यरहित आणि मामुली स्वरूपाचे असण्याचाच संभव फार. खरें महत्त्व त्याच्या आतारिक जीवनाला असते. आणि ते आतरिक जीवन त्याच्या लेखनामधून, ग्रंथसभारामधून व्यक्त झालेले असते. साहित्यकार हा आपल्या बाह्य व्यावहारिक जीवनापासून अलिप्त असं एक मनोमय जीवन कंठीत असतो. या जीवनाचें अस्तित्व केवळ कल्पनासृष्टींत व विचारप्रातातच असते. कल्पनासृष्टीतील आदर्शांच्या उच्चतेला ज्याने आपले व्यावहारिक जीवनही नेऊन भिडविले आहे, तो योगीच म्हणावा लागेल. परंतु साहित्यकारामध्ये असे गीतेत सांगितलेल्या कसोटीस उतरणारे योगस्थ पुरुष आजपर्यंत फारच थोडे निपजले आहेत. कोणी चोरी करणारा, तर कोणी लाच खाणारा, कोणी नाचरगात दंग होणारा तर कोणी अनंगरगात रगणारा, कोणी दारू पिऊन गटारात लोळणारा तर कोणी अफूच्या तारेत बरळणारा, अशा नाना ढगाच्या प्राण्यानी सरस्वतीच्या मंदिरातील दालनें सजविलीं आहेत. ज्याची वृत्ति इतकी अवखळ नसते ते बिचारे कोठे तरी इतर लक्षावधि जीवाप्रमाणे खर्डेघाशी करीत, पोरें हाकीत अगर कोर्टाच्या येरझाऱ्या करीत आपलें जीवन कंठीत असतात. आता पाश्चात्त्य देशात लेखन हा एक निर्वाह्याचा प्रतिष्ठित व्यवसाय बनला असल्याकारणाने यशस्वी लेखकाला आपल्या लेखणीवर साधारणपणें गुजराण करता येते, हें खरें. तथापि

असें झाले तरी काय? इतर चार मुखवस्तु गृहस्थांप्रमाणे तो मामुली तऱ्हेनेच आपले जीवन कंठतो. त्याच्या बाह्य जीवनक्रमात काही विशेष चमक किंवा ध्येयानुशीलन दिसून येईल अशी अपेक्षा करण्यात मतलब नसतो.

कवीचे अगर ग्रंथकाराचे आन्तरिक जीवनच खरें कुतूहलजनक असते. त्याचे कल्पनावैभव, त्याची विचारसाधना वाङ्मयातच व्यक्त होते. त्याच्या मानससरावर उठणाऱ्या लहरी तेथेच प्रतिबिम्बित होतात. हेंच त्याचे मनोमय जीवन असतें. डोळ्याना दिसणाऱ्या वास्तव सृष्टींत या जीवनाची चिन्हे उमटत नसली तरी ते व्यर्थ व खोटे असते असे म्हणता येणार नाही. या जगात शरीराइतके तरी निदान मन हें सत्य आहे, वस्तूइतकेंच विचाराला महत्त्व आहे. मानस सृष्टि ही वास्तव सृष्टीवर परिणाम करते, म्हणूनच ती महत्त्वाची आहे असें नव्हे; विचार हे व्यवहाराला वळवितात, म्हणूनच केवळ त्याच्याविषयी आस्था बाळगावयाची असे नव्हे; मानसिक भावाना. विचाराना स्वयंभू असेही महत्त्व आहे, त्याना एक प्रकारचें स्वतंत्र अस्तित्व आहे, त्या अस्तित्वात गुरफटून जाण्यात एक प्रकारचा आनंद आहे; आनंद आहे, इतकेंच नव्हे तर या वास्तवसृष्टीत लाभणाऱ्या लौकिक आनंदापेक्षा फारच निराळा व अलौकिक असा तो आनंद आहे. या विचारभावाची शृंखला किंवा त्याचे सातत्य म्हणजेच व्यक्तीचें मनोमय जीवन होय. हे जीवन त्या व्यक्तीच्या देहिक जीवनावर परिणाम करील वा न करील; त्याचे स्वयंभू अस्तित्व व त्याची आस्वाद्यता हीं कायमच असतात, तीं कशाही परिस्थितींत नाहीशीं होत नाहीत. ज्याने आपले व्यावहारिक जीवन मनोमय जीवनाशी एकतान केले, ज्याचे ध्येय हें आचाररूपात अवतीर्ण होऊं लागले व आचार हा ध्येयात्मक बनूं लागला, तो महात्मा. त्याचा आत्मा इतका महान् झाला की त्याचा देह आणि त्या देहाचा व्यवहार त्या आत्मरूपात विरून गेला. असे महात्मे सामान्याना अधृष्य व अनभिगम्य होत. त्याच्या जीवनाची विराट भव्यता, ज्याच्या जीवनाची ध्येयधारा वास्तव धारेहून वेगळी अशी वाहत असते, अशांच्या जीवनामध्ये नसेल. परंतु अशा व्यक्तीच्या जीवनामध्येही एक प्रकारचें

सौंदर्य असतें. ज्याला तें अनुभवण्याची कला अवगत झाली आहे त्याला तें अत्यंत गोड आणि लोभसवाणे वाटतें.

या निरुपम सौंदर्याकरिताच बंकिम काय, आपटे काय, अशा साहित्यकाराच्या जीवनाकडे दृष्टिक्षेप करावयाचा. एरवी त्याच्या बाह्य जीवनामध्ये विशेष कुतूहलजनक, अद्भुत अथवा भावनोद्दीपक असा भाग तो काय असणार ? बंकिमचंद्राच्याही व्यावहारिक जीवनांत सांगण्याजोगें, चटकदार, चमकदार, असें काही नाही. त्याने जन्मभर मोठ्या पगाराची सरकारी नोकरी केली, रायबहादूर, सी. आय. ई. या पदव्या मिळवून सरकारदरबारीं आपली मान्यता सिद्ध केली, यात विशेष तें काय आहे ! हा त्याच्या बाह्यजीवनाचा सागाडा त्याच्या ग्रंथावरून जें त्याचें आंतरिक जीवन प्रत्ययास येतें, त्याच्याशीं विसंगत, किंबहुना विरोधी असाही असलेला कदाचित आढळून येईल. परंतु त्यातही राग किंवा विषाद मानण्याजोगें काही नाही. सहृदय निरीक्षकास त्याच्यातच एक प्रकारची रचना व गोडी अनुभवास येईल.

*

बंकिमचंद्राचा जन्म कलकत्त्यापासून सुमारे ८० मैल उत्तरेस असलेल्या कॉटालपाडा नावाच्या गावीं ता. २७ जून इ. स. १८३८ सालीं झाला. १८३८ हें साल वंगदेश व वंगभाषा याच्या दृष्टीने अत्यंत चिरस्मरणीय असें वर्ष म्हटलें पाहिजे. विख्यात कवि हेमचंद्र बन्दोपाध्याय, प्रख्यात राजकीय पुढारी कृष्णदास (क्रिस्तोदास) पाल, दिगन्तकीर्ति वक्ता व धर्मधुरीण ब्रह्मानंद केशवचंद्र सेन आणि अमर कथाकार बंकिमचंद्र या सुपुत्रांना वंगभूमीनें याच वर्षी जन्म दिला. अर्थात् या सर्वांचीच नसली, तरी बंकिमप्रमाणेच ब्रह्मानंद केशवचंद्र सेन यांची शताब्दी या वर्षी साजरी करण्याची खटपट चालू असून तो समारंभ लवकरच आक्टोबरमध्ये साजरा होणार आहे.

बंकिमचे पिताजी यादवचंद्र चट्टोपाध्याय हेही सरकारी नोकर असून डेप्युटी म्याजिस्ट्रेटच्या पदापर्यंत चढले होते. बंगाल्यांतील डेप्युटी

म्याजिस्ट्रेट म्हणजे मुंबई इलाख्यातील डेप्युटी किंवा असिस्टंट कलेक्टर आणि मध्यप्रांतातील इ. ए. सी. (एक्स्ट्रा असिस्टंट कमिशनर) होत. सामान्य मनुष्याच्या दृष्टीने राजसेवेच्या सोपानातील हे अत्युच्च स्थान असून या अधिकारावर असलेल्या व्यक्तीची समाजात चांगलीच मान-मान्यता असते. अशा पित्याच्या पोटीं आल्याकारणाने त्या काळीं उपलब्ध असलेले सर्वांत उच्च व पुढारलेलें शिक्षण घेण्याची संधि बंकिमला आयतीच मिळाली. यादवचंद्र चतर्जी हे बंकिमच्या लहानपणी मेदिनीपूर येथे डेप्युटी मॅजिस्ट्रेट होते. तेथील इंग्रजी शाळेत बंकिमच्या शिक्षणास आरंभ झाला. शाळेच्या हेडमास्तरानी बंकिमची तैलबुद्धि पाहून त्याज-कडून एका वर्षांत दोन यत्ता करून घेण्याचा बेत केला, परंतु त्याचा बंकिमच्या प्रकृतीवर अनिष्ट परिणाम होऊं लागल्यामुळे यादवचंद्रानी ती गोष्ट मान्य केली नाही. बंकिमला तेरावें वर्ष असतां यादवचंद्राची बदली मेदिनीपुराहून चोवीस परगण्यांत झाली. बंकिमचंद्रप्रभृति मुलें कांही काळ कॉंटालपाडा येथे होतीं. तेथें बंकिमनें घरीच एका शास्त्री-बोवाजवळ संस्कृताचें, व विशेषेंकरून ज्योतिषाचें, चांगलें अध्ययन केलें. पुढे कलकत्त्याच्या सुप्रसिद्ध हुगळी कालेजांत बंकिमला पाठविण्यांत आलें. १८५८ सालीं कलकत्ता विद्यापीठ स्थापन झालें व त्याच वर्षी पहिली बी. ए. ची परीक्षा झाली. तिला एकंदर दहा विद्यार्थी बसले, त्यांतून बंकिमचंद्र चट्टोपाध्याय व यदुनाथ बसु हे दोघेच उत्तीर्ण झाले. अवघ्या बंगाल्यांत फक्त हे दोन पदवीधर! त्या वेळच्या लोकांस ती केवढी अपूर्वाई वाटली असेल! ही अपूर्वाई त्याना तात्काळ मोठी नोकरी मिळण्यासही कारणीभूत झाली. परीक्षा झाल्याबरोबर छोटे लाट (बंगालचे लेफ्टनंट गव्हर्नर) हॅलिडे साहेब यानी बंकिमला तावडतोब डेप्युटी मॅजिस्ट्रेटची नोकरी दिली.

कांही काळ यशोहर (जेसोर) येथे काम केल्यावर बंकिमची बदली खुलना येथे झाली. त्याची पहिली कादंबरी 'दुर्गेशनन्दिनी' ते खुलन्यास असतानाच १८६४ सालीं प्रसिद्ध झाली. ते खुलना येथे असतानाच निळीच्या मळेवाल्यासंबंधीं कटकट उपस्थित होऊन मरेल व हिला या दोन मळेवाल्या साहेबावर बंकिमचंद्रांनी वारंट काढलीं. ते

आसामात पळून गेले असता तेथून त्यास पकडून आणून शिक्षा देण्यात आली. आणखी एक लोकोपयोगी कार्य या ठिकाणी बंकिमच्या हातून घडलें. खुलना ज्या भागात आहे त्या भागात त्या काळीं चोर, डाकू यांचा उपद्रव फार असे. बंकिमच्या दक्षतेमुळे पुष्कळ टोळ्या धरल्या जाऊन त्याना चांगल्या शिक्षा ठोठावल्या गेल्या.

खुलन्याहून बंकिम बारुईपूर येथे बदलून गेले. तेथे असतांना, १८६७ सालीं 'कपालकुण्डला' ही त्याची दुसरी कादंबरी प्रसिद्ध झाली. लगेच पुढच्या वर्षी त्यानी 'मृणालिनी' ही कादंबरी लिहिली व १८६९ मार्चीं ती प्रकाशित केली. अशा रीतीने चारपाच वर्षांत एकामागून एक तीन कादंबऱ्या, आणि त्याही इतक्या उच्च दर्जाच्या, लिहून प्रसिद्ध करणारा लेखक त्या काळीं तरी अपूर्वच होता. अर्थात् वाङ्मयप्रांगणात बंकिमने प्रवेश केला तोच अधिपति किंवा सम्राट म्हणून केला, असे म्हणण्यास हरकत नाही. बंकिमच्या साहित्यसेवेचा प्रारंभकाळ आणि हरिभाऊ आपट्याच्या लेखनाचा प्रारंभकाळ यांत सुमारें २० वर्षांचे अंतर आहे. बंकिमच्या काळीं आधुनिक वंगवाङ्मय अगदीच बाल्यावस्थेत होतें. आधुनिक वंगवाङ्मयाचा पाया राजा राममोहन रायाने घातला. परंतु त्यानंतर मानवी जीवनाचें स्वाभाविक निदर्शन करणाऱ्या आधुनिक तऱ्हेच्या ग्रंथाची निपज होण्यास लवकर सुरवात झाली नाही. पौराणिक कथा अगर जुन्या संस्कृत वाङ्मयांतून घेतलेले विषय यास धरूनच ग्रंथनिष्पत्ति होऊं लागली. बंकिमपूर्वकालात संस्कृत विद्येंत निष्णात झालेल्या पंडित मंडळीने ग्रंथरचनेचें काम हातीं घेतले होतें. ईश्वरचंद्र विद्यासागर हे या युगाचे सर्वश्रेष्ठ प्रतिनिधि गणता येतील. विद्यासागरांच्या 'शकुन्तला', 'सीतावनवास' या ग्रंथाना अद्यापिही वंगसाहित्यात मानाचें स्थान आहे.

अशा रीतीने ज्याप्रमाणे महाराष्ट्रांत, त्याचप्रमाणे बंगाल्यांतही, संस्कृत पंडितांचें युग विषय व शैली या दोन्ही बाबतींत कृत्रिमतेचेंच गेले. प्राचीन पौराणिक अथवा अद्भुत विषय आणि संस्कृतप्रचुर, कृत्रिम भाषाशैली या दोहोंची कास पंडित मंडळीने पक्की धरली होती. मात्र

पंडित मंडळीची सद्दी संपल्याचीं चिन्हें बंकिमचंद्रापूर्वीच दिसून येऊं लागलीं होतीं. भूदेव मुखोपाध्याय याचा 'ऐतिहासिक उपन्यास' हा इतिहासातल्या गोष्टींनी भरलेला द्विभागात्मक ग्रंथ आणि टेकचंदांची 'आलालेर घरेर दुलाल' (१८५७) ही कादंबरी यानी नवयुगाचें आगमन सूचित केलें होतं. या नवयुगाचा पूर्ण अवतार बंकिमच्या रूपानें झाला. मानवजीवनाचें नैसर्गिक, स्वभावसुंदर निदर्शन करणारें आणि स्वतंत्र कल्पनेने स्फुरलेलें असे वाङ्मय बंकिमचंद्र निर्मू लागला, तेव्हा सुरवातीसच वंगीय जनतेच्या मनाची त्याने पकड घेतली. आधुनिक युगास साजेसा असा हा एक नवा वाङ्मयप्रभु अवतरला आहे हें जनतेने तात्काळ ताडलें. 'दुर्गेशनन्दिनी' प्रसिद्ध होताच अतिशय लोकप्रिय झाली. पहिल्या पांच वर्षांत तिच्या तीन आवृत्त्या निघाल्या. 'कपालकुण्डले'ने तर लोकांना थक्कच करून सोडलें. लगेच तत्कालीन साहित्यसेवकांत बंकिमची सर्वांत प्रमुख स्थानीं गणना होऊं लागली.

'दुर्गेशनन्दिनी' ही ऐतिहासिक पायावर आधारलेली एक रम्य व अद्भुत प्रणयकथा आहे. ती फार लोकप्रिय झाली, परंतु तिने जनतेला चकित केलें नाही. 'कपालकुण्डले'तील स्त्रीचरित्रचित्रण पाहून लोक थक्क झाले; लेखकाच्या असामान्यतेची त्याना तात्काळ खात्री पटली. कपालकुण्डला हें नाव भवभूतीच्या 'मालतीमाधव' नाटकातील मालतीला पळवून नेणाऱ्या अघोरघंट नावाच्या कापालिकाच्या शिष्यिणीचें होय, हें संस्कृतज्ञ वाचकास सहज स्मरेल. बंकिमने आपल्या या कादंबरींत एकाकी अवस्थेत एका कापालिकाने लहानपणापासून पाळलेल्या, मनुष्यसमाजाशीं पूर्ण अपरिचित अशा एका कन्यकेचें चरित्रचित्रण केलें आहे. कापालिकाच्या संबंधानें 'मालतीमाधवा'तील नांवाचें स्मरण होऊन तें त्यानी आपल्या नायिकेला सहजगत्या दिलेलें दिसतें, दुसरा कोणताही हेतु त्यांत संभवत नाही. कारण, बंकिमची कपालकुण्डला ही एक सोज्वळ, दयाशील साध्वी आहे, तर भवभूतीची कपालकुण्डला ही दुष्ट, अघोरी, कपटपटु अशी आहे. बंकिमची कपालकुण्डला ही देवीला नरबलि देणाऱ्या कापालिकानें लहानपणापासून पाळलेली व मनुष्यसमाजाचा सम्पर्क नसलेली अशी

अद्वितीय रूपवती कन्यका आहे. तिचा नवकुमार नामक युवकाशीं संबंध येऊन व त्याच्याशीं विवाह होऊन जेव्हा ती समाजाच्या संपर्कात येते तेव्हा तिचें जे चित्रण बंकिमने केलें आहे तें बहारीचें आहे. आणि कादंबरींतील मुख्य लक्षणीय गोष्ट हीच आहे. करुणेची, सहानुभूतीची भावना तिच्या मनात जागृत होते, आत्मसन्मान व तेजस्विता याची ती मूर्तीच बनते, असें लेखकाने दाखविलें आहे. प्रणयाची भावना मात्र तिच्यामध्ये जागृत होत नाही. तिच्या स्वतंत्र वागणुकीमुळे निजविषयीं तिच्या नवऱ्याच्या मनात संशय उत्पन्न होऊन सरतेशेवटीं त्याच्या हातून तिचा वध होतो असें दाखविलें आहे. 'कपालकुण्डला' कादंबरीची काव्यात्मकता, तिजमध्ये ग्रथित झालेलें एका अलौकिक कन्यकेचें लोकविलक्षण चरित्र, कथानकाचा रेखीव सुसंघटितपणा, इत्यादि अनेक गुणांमुळे ही कादंबरी बंकिमच्या सर्वोत्कृष्ट कादंबऱ्यात सर्वानुमतें गणली जाते.

इ. स. १८६९ सालीं बंकिमची बदली अलीपूरहून बहरमपूर येथे झाली. तेथेच स्व० अक्षयचंद्र सरकार याच्याशीं बंकिमची ओळख होण्याचा योग आला. अक्षयचंद्राच्या व इतर अनेक सुप्रसिद्ध लेखकाच्या सहकार्याने एक मासिक सुरू करण्याची बंकिमने योजना तयार केली आणि वंगशक १२७९ च्या वैशाख महिन्यापासून (इ. स. १८७२) '**वंगदर्शन**' हें विख्यात मासिक प्रसिद्ध होऊं लागलें. खुद्द बंकिमचंद्राचें नाव संपादक म्हणून जाहीर केलें होतें व मासिकाच्या लेखकवर्गांत श्री. दीनबन्धु मित्र (नाटककार), हेमचंद्र बंदोपाध्याय (कवि), श्री. अक्षयचंद्र सरकार इत्यादि नामांकित साहित्यसेवकाचीं नावें झळकत होतीं.

'वंगदर्शना'ने बंगाली वाङ्मयात क्रान्ति घडवून आणली, असें म्हणण्यात मुळीच अतिशयोक्ति नाही. कादंबऱ्या, गोष्टी, कविता, सामाजिक प्रश्नावर टीकात्मक लेख, साहित्यसमालोचन, इत्यादि विविध सामग्रीने प्रत्येक अंक नटलेला असे. बंगालमधील सर्वश्रेष्ठ लेखकांचें साहाय्य त्याला लाभलेलें होतें. तुलना करण्यात फारसें तात्पर्य नाही, तरी पण आमच्याकडे १८६७ सालीं निघालेल्या 'विविधज्ञानविस्तार' मासिकापेक्षा १८७२ सालीं निघालेलें बंकिमचें 'वंगदर्शन' अनेक

पटीने श्रेष्ठ होते असे म्हटल्याखेरीज राहवत नाही. 'वंगदर्शना'ने वंगीय जनतेमध्ये वाङ्मयाभिरुचि निर्माण केली व उच्च वाङ्मय-निर्मितीचा मार्ग सुलभ केला.

'वंगदर्शना'च्या अनुकरणाने लवकरच 'बान्धव' आणि 'आर्य-दर्शन' या नावाचीं दोन मासिके निघालीं. ज्या उद्देशाकरिता हे मासिक सुरू केले, ते उद्देश बऱ्याच अंशीं सफळ झाले असे जाणून चार वर्षां-नंतर बंकिमने 'वंगदर्शन' बंद केलें. मासिकाचें सर्व काम बंकिमलाच करावे लागत होते. त्या यातायातीचा बंकिमला कंटाळा आला असेल. शिवाय काही लेखक आपल्या लेखाबद्दल मोबदला मागूं लागले, परंतु मासिकासाठी पैसे देऊन लेख विकत घेणे बंकिमला पसंत पडेना, असेही कारण 'वंगदर्शन' बंद करण्यास घडलें असल्याचे कित्येकानी सांगितलें आहे. चमत्कार असा की बंकिमने 'वंगदर्शन' बंद केल्यानंतर एका वर्षाने त्याचे बंधु संजीवचन्द्र याच्या संपादकत्वाखाली त्याचे पुनरुज्जीवन करण्यात आले! संजीवबाबू हेही चागल्यापैकी लेखक होते. त्याच्या संपादकत्वाखाली कित्येक वर्षे चालून पुढे तें बंद पडले. त्याच्या संपादकत्वा-खाली असतानाही लेखनाचा बहुतेक भार बंकिमवरतीच पडत असे.

बंकिमबाबू संपादक असताना, 'वंगदर्शना'च्या पहिल्या चार वर्षांमध्ये (इ. स. १८७२-१८७६) त्याच्या एकंदर सहा कादंबऱ्या या मासिकात क्रमशः प्रसिद्ध झाल्या–'विषवृक्ष', 'इन्दिरा', 'युगलाङ्गुरीय', 'चन्द्रशेखर', 'राधाराणी' आणि 'रजनी'. बंकिमच्या कर्तृत्वाचा हा मध्यान्हकाल होय. त्याच्या लेखनाचा हा दुसरा कालखंड पहिल्या कालखंडा-पेक्षाही अधिक फलदायी झाला. उपर्युक्त सहा कादंबऱ्याखेरीज 'वंगदर्शना'-तील इतर अनेक लेख, समालोचना, इत्यादींचें लेखन आणि 'वंगदर्श-ना'चे संपादकीय काम बंकिमला करावे लागत होते; आणि हें सर्व सरकारी नोकरीचें जबाबदारीचे काम संभाळून ते करीत होते! बंकिमचें वय.या वेळीं पसतिशीच्या सुमाराचें असून ते आपल्या कार्यशक्तीच्या भरात होते. तथापि कितीशा ऐन पस्तिशींतल्या तरुणानी एवढी जबरदस्त उद्योगशीलता आपल्या आचरणात प्रकट केली असेल!

उपर्युक्त सहा कथापैकी 'इन्दिरा', 'युगलाङ्गुरीय' व 'राधाराणी' याना कादंबऱ्या म्हणण्यापेक्षा जरा लांबलेल्या लघुकथाच म्हणणें शोभेल. 'विषवृक्ष'; 'चंद्रशेखर' आणि 'रजनी' या मात्र कादंबऱ्या म्हणून गणण्यास लायक असून यातील पहिल्या दोन तर बंकिमच्या सर्व कादंबऱ्यांमध्ये अत्युत्कृष्ट गणल्या गेल्या आहेत. या कालखंडातील बंकिमच्या रचनेचा विशेष म्हणजे ती समकालीन सामाजिक वातावरणास धरून लिहिलेली आहे, हा होय. या दृष्टीने पाहता या सहाही कादबऱ्यास सामाजिक कादंबऱ्या म्हणण्यास हरकत नाही. परंतु याची तऱ्हा हरिभाऊ आपट्याच्या सामाजिक कादंबऱ्याहून भिन्न आहे, हे मात्र लक्षात ठेवले पाहिजे. हरिभाऊंच्या कादंबऱ्यामध्ये जो सामाजिक भाव आहे, जे सामाजिक प्रश्नाचे उद्घाटन आहे, रूढीचे स्वरूपाविष्करण आहे, विचारसरणीचा उपन्यास आहे, ध्येयाचे प्रतिपादन आहे—ते बंकिमच्या कादंबऱ्यामध्ये आपणास आढळणार नाही. प्रथम कालखडातील कादबऱ्याप्रमाणे याही कादंबऱ्यामध्ये काव्यात्मता व सौंदर्यदृष्टि हीच प्रधान आहे. ही सौंदर्यदृष्टि सामाजिक कथानकाच्या द्वारा व्यक्त झाली आहे, एवढेच. वामनराव जोशाच्या कादबऱ्याशीं बंकिमच्या कादबऱ्याची एका दृष्टीने तुलना होऊ शकेल. हरिभाऊंच्या कादंबऱ्या ज्या अर्थाने सामाजिक आहेत त्या अर्थाने वामनरावांच्याही कादबऱ्याना सामाजिक म्हणता येणार नाही. सामाजिक कथानकाच्या द्वारा काही मानसिक किंवा आध्यात्मिक तत्त्व प्रतिपादन करण्याचा त्याचा खटाटोप त्याच्या कादंबऱ्यात दिसून येतो. तर बंकिम हा सामाजिक कथेच्या द्वारा सुंदर, रेखीव, सुसंघटित असे काव्य निर्माण करतो. दोघाचेही मुख्य लक्ष्य व्यक्तीवर केंद्रित झाले आहे, समाजावर नाही. या दोघाच्या कादंबऱ्यामध्ये व्यक्तिचित्रणाकरिता, आणि त्याच्या अनुषगाने सामाजिक वातावरणाचा प्रादुर्भाव होतो, तर आपट्याच्या (बऱ्याचशा) कादंबऱ्यामध्ये समाजस्वरूपाविष्करणाकरिता भूमिकाची योजना आणि त्यांचें चित्रण केले जाते.

'विषवृक्ष' ही कादंबरी अनेकवार मराठींत अनुवादित झाली असून तिचे कथानक पुष्कळाच्या परिचयाचे असेल. कुन्दनन्दिनी नामक एका मुग्ध बालविधवेकडे नगेंद्रनाथ नावाच्या ऐश्वर्यसंपन्न

तरुण जमीदाराचें लक्ष जाऊन तो तिच्यासाठीं वेडा होतो; अखेरीस तो तिच्याशीं लग्न करितो; त्याची पतिव्रता पत्नी सूर्यमुखी घरांतून निघून जाते. पुढे कुन्दनन्दिनी आणि नगेन्द्र यांचा विवाह सुखास कारण न होता दोघांच्याही दारुण दुःखास कारण होतो व कुन्दनन्दिनी विष खाऊन आत्महत्त्या करते. सूर्यमुखी मेली असें मध्यंतरींच्या काळात सर्वांस वाटत असतें, परंतु ती जिवंत असून अखेरीस नगेंद्राकडे येते व त्यांचें पुनर्मीलन होतें. कथानकाच्या या त्रोटक साराशावरून विधवाविवाहाच्या सामाजिक प्रश्नाचें उद्घाटन करण्याकरिता ही कादंबरी लिहिली आहे असें वाटण्याचा संभव आहे; परंतु वस्तुस्थिति तशी नाही. कुन्दनन्दिनी हें एक निरागस, सुकोमल, अर्धस्फुट पुष्प आहे; काही अशीं योगायोगामुळे व काही अंशीं दुष्ट व्यक्तींच्या कारवायांमुळे नगेंद्राच्या असंयमी मनाच्या आकर्षणांत ती सापडते व तिचा चुराडा होतो. यात व्यक्तिचित्रणाची रम्यता ओतप्रोत भरलेली असून सामाजिक प्रश्नाच्या उद्घाटनाचा संबंध सुद्धा नाही. 'चंद्रशेखर' कादंबरीमध्ये दोन स्वतंत्र प्रेमकहाण्या एक-मेकांशीं समांतर रीतीने वर्णून त्यांपैकी एकीची शुभ्रता आणि दुसरीची कलंकितता स्पष्टपणें निदर्शित केली आहे. भिन्न भिन्न व्यक्तिचरित्रांचें समांतर रीतीनें रेखाटन करण्याची ही पद्धति काही अंशीं थॅकरेच्या 'Vanity Fair' सारखी आहे. 'रजनी'मध्येही भिन्न भिन्न परिस्थितींत पडलेल्या व्यक्तींच्या अनुरागबन्धनाची वैचित्र्यपूर्ण कथा निवेदन केली आहे. रजनी ही एक आंधळी फुलवाली. शचीन्द्र नावाच्या तरुणाशीं तिचा परिचय होऊन तिचें त्याच्यावर प्रेम बसतें. पुढे अमरनाथ नावाचा त्यागी, परोपकारी, थोर मनाचा गृहस्थ तिला दारिद्र्यामुळे प्राप्त झालेल्या महासंकटातून सोडवितो. हा अमरनाथ गृहसुखविहीन असल्यामुळे त्याच्या मनांत रजनीविषयीं अनुराग उत्पन्न होतो. रजनीशीं विवाहाची गोष्ट काढताच तिला मोठें संकट पडतें. त्यातून मनाचा हिय्या करून ती आपलें शचीन्द्राविषयींचें प्रेम प्रकट करते. तेव्हा आपल्या थोर मनास उचित अशा रीतीनें अमरनाथ स्वतः प्रयत्न करून तिचें शचीन्द्राशीं लग्न लावून देतो. पुढे एका योग्याच्या मंत्रतंत्रसामर्थ्याने तिचा आंधळेपणा जाऊन तिला दृष्टि प्राप्त होते व पुत्रप्राप्ति होऊन ती पूर्ण सुखात मग्न होते.

कथानकांचे जे सारांश वर दिले आहेत, ते जरी अत्यंत त्रोटक असले तरी भावनिदर्शन व मनोव्यापारांचे सुंदर आविष्करण करण्यास त्यांत जागोजाग केवढी संधि सापडण्याजोगी आहे हें मार्मिक वाचकांच्या सहज लक्षात येण्याजोगें आहे. बंकिमसारख्या प्रतिभावान्, कुशल व रसिक लेखकाने त्या संधीचा प्रत्येक ठिकाणीं परिपूर्ण उपयोग करून घेतला असेल हे काही निराळे सांगावयास नको. व्यक्तिचित्रणात व स्वभावपरिपोषाच्या कलेतही त्याचा तितकाच हातखंडा आहे. त्याचें व्यक्तिचित्रण आपणास जरी क्वचित अतिरंजित वाटले, तरी भावप्रधान बंगाली लोकांच्या समाजात ते स्वभावमुद्र असेंच गणले जातें; आणि बंगाल्याची दृष्टिच या बाबतींत सर्वतोपरि प्रमाण होय, हे इतरास मान्य केलेच पाहिजे.

संजीवबाबूंच्या संपादकत्वाखाली १८७७ सालीं 'वंगदर्शन' हे पुनः सुरू झाले ते १८८४ पर्यंत चालले. या अवकाशात 'वंगदर्शना'-मध्ये 'कृष्णकान्ताचें मृत्युपत्र', 'कमलाकान्ताचीं पत्रे', 'राजसिंह', 'मुचिराम गुडेर जीवन चरित', 'आनन्दमठ' आणि 'देवी चौधुराणी'चा काही भाग इतका बंकिमचा वाङ्मयसंभार क्रमाक्रमाने प्रसिद्ध झाला. बंकिमच्या लेखनाचा हा तिसरा कालखंड होय. या कालात बंकिमची दृष्टि अधिक व्यापक, अधिक पारदर्शी व भविष्यसूचक बनलेली दिसून येते. 'कृष्णकान्ताचें मृत्युपत्र' ही कादंबरी पूर्वकालातील कादंबऱ्याप्रमाणेच सामाजिक आहे. 'वंगदर्शना'च्या पूर्वावतारामध्येच ती अंशतः प्रसिद्ध झाली होती व तिचे स्वरूप पाहता पूर्वीच्या प्रवृत्तीचाच तो एक अवशेष आहे, हे सहज प्रत्ययास येते. 'राजसिंह' ही ऐतिहासिक कादंबरी मेवाड-च्या उत्तरकालीन इतिहासात चमकलेल्या महाराणा राजसिंह याच्या वृत्तांतावर टॉड प्रभृति इतिहासकाराच्या आधाराने रचली आहे. हरिभाऊ आपट्यांची 'रूपनगरची राजकन्या' ही कादंबरी साधारणपणे त्याच ऐतिहासिक वृत्तान्तावर रचली आहे, हें बहुश्रुत वाचकाच्या लक्षात येईल. 'मुचिराम गुडेर जीवनचरित' हा एक विडम्बनात्मक विनोदी प्रबन्ध आहे. सरकारी नोकरींत लटपटया, लागूलचालक अशा व्यक्तींची कशी चलती होते व योग्य परंतु निःस्पृह व्यक्तींची कशी पीछेहाट होते, हें मुचिराम,

घटिराम नावाच्या व्यक्ति निर्माण करुन त्यांच्या द्वारा बंकिमने दाखविलें आहे आणि त्याच्या विडम्बनाने प्रचुर हास्यरस निर्माण केला आहे.

तथापि या काळातील बंकिमच्या प्रमुख कृति 'आनंदमठ' व 'देवी चौधुराणी' या होत. देशोद्धार, समाजसेवा, आत्मत्याग इत्यादि उदात्त तत्त्वानी व्यापिलेले बंकिमचे अंतःकरण या कादंबऱ्यांमध्ये परिस्फुट झाले आहे. 'वंदेमातरम्' या गीतामुळेच केवळ नव्हे, तर इंग्रजाच्या अन्यायी अमलाच्या तेजस्वी प्रतिकाराचें चित्र म्हणूनही 'आनन्दमठ' ही कादंबरी सर्वत्र विख्यात आहे. तिजविषयी आणि 'देवी चौधुराणी'विषयी याच अंकात आरंभीं दिलेल्या श्री. काकासाहेब कालेलकराच्या लेखात बरेचसे विवेचन आले असल्यामुळे येथे त्याज-विषयी अधिक काही लिहिण्याची जरुरी नाही.

इ. स. १८८४ च्या प्रारंभीं 'वंगदर्शना'च्या द्वितीय अवताराचीही अखेर झाली. परतु त्याच वर्षी बंकिमचंद्राच्या जावयाच्या संपादकत्वा-खाली 'प्रचार' नावाचे मासिक सुरू झाले. 'प्रचारा'च्या प्रथमांका-पासूनच त्यात बंकिमची 'सीताराम' ही कादंबरी येऊं लागली व त्याच सुमारास 'नवजीवन' नामक पत्रामध्ये 'धर्मतत्त्व' हा प्रबन्ध क्रमशः प्रकाशित होऊं लागला. यानंतर रजा घेऊन कलकत्त्यास राहत असता त्याचे 'कृष्णचरित्र' प्रसिद्ध झाले (१८८६). देशोद्धार, समाजसेवा वगैरे संबंधींच्या विचारातून उत्क्रांत होऊन त्याचे चित्त या सुमारास धर्मविचारामध्ये सुप्रतिष्ठित झाले, असा देखावा आपणास दिसतो.

'प्रचार' व 'नवजीवन' यामध्ये बंकिमने मुख्यतया धर्मासंबंधाने लेखन केलें. धर्मासंबंधात बंकिमच्या मनोवृत्तींत झालेले परिवर्तन लक्षात घेण्याजोगे आहे. तरुणपणीं बंकिमचे मन नास्तिकवादाकडे झुकलेले होते. धर्माविषयी त्याच्या मनात मुळीच आदर नव्हता. परंतु पुढे वाचन, मनन व निदिध्यास याच्या योगाने त्याचे मन पालटले व अखेरीअखेरीस आस्तिकतेचा, हिंदुधर्माचा, श्रीकृष्णभक्तीचा तो महान पुरस्कर्ता बनला. इतका, की मिशनरी प्रभृति हिंदुधर्माच्या प्रतिपक्षीयांविरुद्ध वाद करण्याचे वीरकंकणही काही काळ त्याने

हातामध्ये बांधलें होते. आधुनिक समाजशास्त्र, मानसशास्त्र व नीतिशास्त्र यांच्या तत्त्वानुसार हिन्दुधर्माचें सूक्ष्म निरीक्षण केलें तर तो सर्वांत श्रेष्ठ, उज्ज्वल व उदार धर्म कसा ठरतो याचें विवेचन त्याने आपल्या धर्मविषयक प्रबन्धांमधून केलें आहे. त्याच्या अखेरच्या अखेरच्या कादंबऱ्यांमधूनही देशोद्धाराचा प्रयत्न धर्मभावनेवर व धर्मश्रद्धेवर आधारलेला असला पाहिजे, हेंच तत्त्व सूचित केलें आहे. ‘कृष्णचरित्रा’ मध्ये, परमेश्वराने मनुष्यरूपाने घेतलेला अवतार, या दृष्टीने श्रीकृष्णाच्या चरित्राचें तत्त्वरहस्य विशद केलें आहे. श्रीकृष्ण ही व्यक्ति खरोखरी होऊन गेलेली, पूर्णपणे ऐतिहासिक असून भागवतादि पुराणांत वर्णिलेल्या श्रीकृष्णलीला या मात्र भगवान व त्याचे भक्त यांच्या संबंधावर केलेलीं रूपकें आहेत, असें त्याचें मत होतें.

स्थूलमानाने १८८० ते १८९० हा काळ बंगाल्यांत धर्मविषयक खळबळीचा व धार्मिक पुनरुज्जीवनाचा होता. श्रीरामकृष्ण परमहंस हे याच काळांत आपल्या उपदेशामृताने बंगाली तरुणांची धर्मभावना पुनरुज्जीवित करीत होते. पूर्वीच्या काळांतील धर्मविषयक उदासीनता व नास्तिकता लोप पावली होती व जुन्या धर्माचें नव्या पद्धतीनें समर्थन करण्यास केवळ जुन्या पिढीचे पंडितच नव्हेत तर आंग्लविद्याविभूषित विद्वानही पुढें येऊं लागले होते. या भरतीच्या मार्गावर असलेल्या धर्माभिमानमूलक आंदोलनाचें लेखक या नात्याचें पुढारीपण साहजिकच बंकिमच्या गळ्यांत पडल्याप्रमाणें झालें होतें.

या धर्मविषयक चळवळीच्या प्रसंगानेच बंकिम व रवीन्द्र या दोघां प्रवीण–नवीनांची एकवार झटापट झाली, ती मोठी कुतूहलोत्पादक असल्यामुळें तिचा येथें उल्लेख केला पाहिजे. ‘प्रचार’च्या पहिल्या अंकांत बंकिमचा ‘हिंदुधर्म’ या मथळ्याचा एक लेख प्रसिद्ध झाला त्यावर सुमारें चार महिन्यांनी रवीन्द्रनाथांनी ‘एकटि पुरातन कथा’ नावाचा एक टीकात्मक निबन्ध लिहून तो एका सभेत वाचला व आपल्या ‘भारती’ नावाच्या मासिकांत प्रसिद्ध केला. त्यांत तारुण्यसुलभ अवखळपणास अनुसरून (रवीन्द्रांचें वय या वेळीं केवळ १८ वर्षांचें होतें)

बंकिमच्या प्रतिपादनाचा खरा अर्थही लक्षांत न घेता गैरवाजवी टीकेचं बरीच झोड उठविली होती. बंकिमवर आदिब्रह्म समाजाच्यातर्फे यापूर्व अशीच आणखीही टीका करण्यात आली होती. हे सर्व लक्षात घेऊन या खेपेस बंकिमने रवीन्द्रास उत्तर दिले. त्यास प्रत्युत्तरादाखल रवीन्द्रानं ‘भारती’मध्ये आपली एक लाबलचक ‘कैफियत’ सादर केली. त्यात त्यानं असे म्हटले की “बंकिमबाबूंनी लिहिलेल्या कित्येक गोष्टींचा अर्थ मं केला तसा नव्हता ही मोठी आनंदाची गोष्ट आहे; तथापि मी केला तस अर्थ करण्यात माझा काही दोष नव्हता. इ० इ०.” ही कैफियत विनीत भावाने लिहिली असून तींत बंकिमविषयी यथेच्छ आदर प्रकट केलेल होता. अशा रीतीने हे प्रकरण मिटले. या प्रकरणास अनुलक्षून रवीन्द्रानं आपल्या ‘जीवनस्मृती’मध्येही मोठा गोड उल्लेख केला आहे.

३

सरकारी नोकरीमध्ये बंकिमचंद्रांना यथाक्रम उत्कर्ष होत गेला त्याची लेखणी त्याच्या कोठे आड आली नाही. राज्यकर्त्यांस न आवड णाऱ्या अशा अनेक विषयावर निःस्पृहपणाने त्यांनी आपली लेखणं चालविली होती व खुद्द सरकारी कामाच्या संबंधातही त्याचे वर्तन कमं तेजस्वी व बाणेदारपणाचे नव्हते. सरकारी नोकरीमध्ये स्वतःच्य वरिष्ठाशी म्हणजे डिस्ट्रिक्ट म्याजिस्ट्रेटशी, निरनिराळ्या कारणावरून बंकिमचन्द्राचे खटके उडाल्याचे कित्येक प्रसंग त्याच्या चरित्रात वर्णन आहेत. असे झाले तरी त्याच्या बढतीत कधी कमीपणा आला नाही किंवा सरकारची त्याजवरची मर्जी कमी झाल्याचे चिन्ह कधीही दिसून आले नाही. बंगाल सरकारच्या सेक्रेटरिएटमध्ये फिनान्स खात्याच्य सहकारी सेक्रेटरीच्या जागेवर काही काल त्याची नेमणूक झाली होती यावरून सरकारच्या पूर्ण विश्वासास पात्र झालेले असे ते एक अमलदा होते, हें उघड दिसते. काँग्रेसच्या पूर्वीचा तो काळ होता; सरकार धोरण तेव्हा पुष्कळच उदार व सवलतीचे होतें.

डेप्युटी म्याजिस्ट्रेट या नात्याने बंगाल्यांतील अनेक तालुक्याच्य व जिल्ह्याच्या ठिकाणीं बंकिमबाबूंनी काम केले. १८८५-८६ च्य

सुमारास रजेवर असतां त्यानी कलकत्त्यास एक घर विकत घेतलें होतें. पुढे १८९१ सालीं, ३३ वर्षें सरकारची इमानेइतबारें नोकरी केल्यावर, ते सेवानिवृत्त झाले व कलकत्त्यास स्वतःच्या घरीं त्यानी आपले कायमचे वास्तव्य केले. त्यानी केलेल्या राजसेवेस व जनसेवेस शोभेसा त्याचा मानसन्मानही या उत्तर वयात सरकारकडून व लोकाकडून करण्यात येऊं लागला. सरकारने त्यास रायबहादुर व सी. आय. ई. या पदव्या देऊन गौरविले. लोकानी असे काही विशिष्ट गौरवाचे स्थान बहाल करून त्यांचा गौरव केला नाही. कारण लोकगौरवाचीं द्योतक अशीं संस्थाचीं, परिषदाचीं व संमेलनाचीं अध्यक्षपदे त्या वेळीं नव्हतीं. अशा तऱ्हेच्या संस्था–परिषदा निघण्याच्या पूर्वीचा तो काळ होता. तथापि अखिल वंगराष्ट्र त्यास साहित्याचे राजराजेश्वर म्हणून मान देऊं लागलें होते. त्याचे घर म्हणजे बंगालच्या वाङ्मयविषयक आंदोलनाचे केंद्र बनले होते: आणि त्याचा शब्द सर्वत्र ऋषिवाक्याप्रमाणे झेलला जात होता.

तथापि हा आरामाचा व मानसन्मानाचा काळ त्यास फार दिवस लाभावा असा योगायोग नव्हता. कित्येक वर्षे त्यास बहुमूत्राच्या व्याधीने पछाडले होते. ती व्याधि प्रबळ होऊन १८९४ सालीं ते कालवश झाले. मरणसमयीं त्याचे वय केवळ ५६ वर्षांचें होते.

४

खरें पाहिले तर हा केवळ योगायोग होता, असे म्हणता येत नाही. पसतीस वर्षें केलेल्या अविश्रांत परिश्रमानी त्याचें शरीर जर्जर झालें असले पाहिजे. बैठा व्यवसाय आणि व्यायामाचा अभाव यानी त्याचें शरीर पोखरण्यास मदत केली असली पाहिजे. पूर्ण सत्य सागावयाचें म्हटले तर त्याच्या आचारदोषाचाही येथे उल्लेख केला पाहिजे. बंकिम-च्या तारुण्यावस्थेचा, म्हणजे १८६० च्या सुमाराचा, काळ नवशिक्षिता-च्या अनिर्बंध वागणुकीचा होता. केवळ बंगाल्यांतच ही स्थिति होती असे नाही. आपल्याकडे मुंबई इलाख्यात व मद्रासेकडेही ही स्थिति

होती. अव्यवस्थितपणा, बेछूटपणा, बाहेरख्याली, मद्यासक्ति, इत्यादि आचारदोष त्या वेळच्या शिक्षितात मोठ्या प्रमाणात बोकाळले होते. परंपरागत धर्म, समाजव्यवस्था, आचारनिर्बंध यांच्याविषयीचा आदर नाहीसा झाला होता व पाश्चात्त्यांच्या दुर्गुणासच सद्गुण समजून त्यांचें बाह्य अनुकरण करण्याचा प्रयोग धडाक्याने सुरू होता. त्या काळात बंगाल्यात असे फारच थोडे प्रसिद्ध पुरुष होऊन गेले असतील की जे मद्यसेवनापासून पूर्णपणे अलिप्त होते. राजा राममोहन राय, महर्षि देवेन्द्रनाथ, राजनारायण बसु प्रभृति थोर थोर पुरुष सुद्धा आयुष्याच्या कोणत्या ना कोणत्या तरी काळात मद्यपानाच्या अधीन झाले होते, असे आपणास वाचावयास सापडते. मग बिचारा बंकिमच त्या व्यसनाच्या पकडीतून सहीसलामत सुटणे कसे शक्य होते ?

असे म्हणतात, की बंकिमला नोकरी लागल्यानंतर प्रथमच तो जेसोर येथे गेला, तेथे त्या वेळी सुप्रसिद्ध नाटककार दीनबन्धु मित्र हेही अमलदार होते समवयस्क व समानशील म्हणून त्यांची व बंकिमची मैत्री जमली व त्यांच्या संगतीनें बंकिमला मद्यपानाचें व्यसन लागलें. इतर काही प्रकारचा उच्छृंखलपणाही तारुण्यामध्ये बंकिमच्या हातून घडला असेल. परंतु तो व्यसनात परिणत झाला होता असें दिसत नाही. मद्यासक्तीने मात्र कायमचें ठाणें दिलें.

तथापि बंकिमच्या थोरवीची खूण ही की मद्यपान करणें व इतर कोणत्याही प्रकारचें नैतिक स्खलन होणें मोठें प्रशसनीय, निदानपक्षीं त्यात विशेष वाईट काही नाही, असा भ्रम त्याने कधीही करून घेतला नाही. मद्यपानाने बुद्धि तीव्र व तरल होते, शरीरशक्ति वाढते, बाहेरख्याली हे पौरुषाचे द्योतक आहे, इत्यादि मूर्खपणाच्या समजुती खरोखरीच त्या वेळच्या प्रतिष्ठित शिक्षित लोकामध्ये प्रचलित होत्या. बंकिमने अशा घातक भ्रमानी आपलें मन विटाळू दिलें नाही. त्याच्या कादंबऱ्यामधील वातावरण नीतिदृष्ट्या सर्वथैव शुद्ध व अकलंकित आहे. त्याने आपल्या कादंबऱ्यामध्ये मद्यपी, व्यसनी व शिथिलाचरणी व्यक्तींचीं अनेक चित्रे रंगविली आहेत व तीं

बहारीचींही वटलीं आहेत. परंतु त्याच्याविषयीचा आपला तिरस्कार त्याने कोठेही लपवून ठेवलेला नाही. या सर्व गोष्टी वाईट व निंद्य म्हणूनच त्याने लोकांच्या दृष्टीस विषय केल्या आहेत; चुकून सुद्धा त्याच्याविषयी वाचकाचा अनुकूल भाव होईल अशी रचना त्याने केलेली नाही. आपाततः कितीही चागलें दिसले तरी जे जे अनीतिकर ते वाईटच, त्याचा परिणाम वाईटच होणार, हे स्पष्टपणे सूचित करण्यास तो कधीही विसरला नाही. या नैतिक कटाक्षाच्या आड त्याने आपली काव्यात्मता व सौंदर्यासक्ति हीही येऊं दिली नाही. बहुतेक कादंबऱ्यामध्ये प्रणयरसामध्ये सरळ अगर वाकड्या रीतीने पोहणाऱ्या अनेक भूमिकाची चित्रे त्याने अत्यंत बहारीचीं वठविलीं असूनही सर्व ठिकाणी एकंदर वातावरण व कथानकाचा रोख नैतिक दृष्ट्या अत्यंत शुद्ध व निष्कलंक राखण्याबद्दल त्याने मोठा कटाक्ष बाळगलेला आहे. त्याच्या सर्व कादबऱ्याच्या कथानकाचा ओघ उदात्ततर, उन्नततर जीवनाकडे वाहत आहे आणि प्रत्येक कादंबरीचा शेवट विशुद्ध जीवनास पोपक अशाच रीतीने करण्याची खबरदारी त्याने घेतली आहे. या बाबतीत बंकिमची तुलना हरिभाऊ आपट्याशीच करणे शोभेल. त्यातही बकिमबाबूंची पुष्कळशी कथानके प्रणयाच्या खेळाची क्रीडांगणेच असल्याने त्यात अशी विशुद्धता राखणे विशेषच कठीण होते. असे असताही त्याने आपला नैतिक कटाक्ष कायम ठेवला. अशुद्धाचरणाचे, अनैतिक भावनाचे नाना तऱ्हेची सामाजिक कारणे दाखवून युक्तिप्रयुक्त्यानी समर्थन करीत तो बसला नाही, यातच त्याची थोरवी आहे.

आणि म्हणूनच आम्ही म्हणतो की बकिमबाबूंचे बाह्य जीवन कसेही असले तरी त्याचे आतरिक जीवन फार उदात्त होते. तो एक प्रसन्नात्मा, विशुद्धात्मा आणि उदारात्मा होता. त्याच्या कादंबऱ्यात कला नाही असे कलेवरून काया कुरवंडी करून टाकणारे महाभागही म्हणण्यास धजणार नाहीत. कलेला आपली दासी करून वाटेल तसे राबविणारा तो राजराजेश्वर होता, कलेच्या पायात घोटाळणारे कुलंगे कुत्रे नव्हता. जन्मभर सरकारी नोकरी करीत असूनही त्याचे अंतःकरण उज्ज्वल

देशभक्तीने दीप्तिमान झालेलें होते; शरीर व्यसनासक्त असूनही मन निरंतर विशुद्ध, उन्नत विचारात वावरत होतें. त्या मनाचा विकासही त्यागाच्या व धार्मिकतेच्या दिशेनेच होत होता. अखेरअखेर मद्यपानाच्या व्यसनातून त्याने आपली सुटका करून घेतली होती व मत्स्यमासाचा त्याग करून नुसत्या हविष्यान्नावर काही काळ तो राहत होता, असे त्याचे चरित्रकार म्हणतात. त्याची प्रतिभा विलक्षण होती, रसिकता अनुपम होती, बुद्धिवैभव अचाट होते आणि या सर्वांचा देशकार्यार्थ व्यय करण्याची उदारता त्याच्या ठायीं वसत होती. या सर्व गुणाचे रसायन त्याच्या निरुपम सुन्दर व उदात्त वाङ्मयात उतरले आहे. त्या वाङ्मयात व्यक्त झालेल्या त्याच्या उदात्त आतरिक जीवनाची साक्ष ज्याला पटलेली आहे, तो देशोद्धारक महात्म्याच्या मालिकेत त्याचे नाव गोवल्याशिवाय कधीही राहणार नाही.

[ प्रस्तुत लेख लिहिताना विशेषकरून पुढील दोन ग्रंथाचा उपयोग झाला आहे.— १ बंकिमचंद्र (जीवन, युग ओ ग्रंथावली सम्बन्धे आलोचन ). ले० अक्षयकुमार दत्तगुप्त कविरत्न एम्. ए. ( १९२० ); २ वंग साहित्ये बंकिम. ले० रायसाहेब श्री. हाराणचन्द्र रक्षित ( १९१० ). लेखातील विचार व अभिप्राय अर्थात् लेखकाचे स्वतःचे आहेत ]

# ८

# स्वर्गवासी पं. महावीरप्रसाद द्विवेदी

[ 'विहंगम' आक्टोबर १९३८ ]



गेलीं तीन वर्षे हिंदी भाषेला मोठीं अशुभ व खडतर गेलीं. तीन वर्षांपूर्वी भारतीय साहित्य परिषदेची स्थापना करण्यात आली; राष्ट्रभाषा या नात्याने अखिल भारतवर्षभर हिंदीचा प्रचार करण्यासाठी योजना आखण्यात येऊन तदनुसार जारीने कार्यही सुरू झालें;—आणि गेल्या अडीच तीन वर्षांतच हिंदीचे धुरंधर साहित्यिक एकामागून एक कालवश होत गेले, हिंदीचें साहित्य त्यांच्या गमनाने पोरके, दीनवाणें बनून गेलें. पहिला व सर्वांत जबर घाव प्रेमचंदजीच्या मृत्यूचा बसला; त्यानंतर मुनशी अजमेरी, बाबू जयशंकर 'प्रसाद', त्यानतर पं० रामदासजी गौड आणि आता आचार्य महावीरप्रसाद द्विवेदी याचा घास काळाने घेतला आहे. यद्यपि महावीरप्रसादजी आज कित्येक वर्षे साहित्यकारणातून निवृत्त झालेले होते, तरी त्यांच्या अस्तित्वाचा अप्रत्यक्ष आधार हिंदी साहित्यसेवकाना दिलासा देण्यास पुरेसा होता. ते गेल्या-मुळे पित्याची पाखर मुलाच्या संसारावरून नष्ट व्हावी तशी हिंदी साहित्याची अवस्था झाली आहे.

महावीरप्रसादजीना आधुनिक हिंदी गद्याचे, खडी बोलीतील काव्यरचनेचे, आणखी पुष्कळ पुष्कळ गोष्टींचे जनक मानण्यात येते. परंतु त्यांच्या साहित्यविषयक कर्तबगारीचा काळ पाहिला तर तो विसाव्या शतकाच्या प्रारंभापासूनचाच पडतो. म्हणजे आमच्याकडच्या तात्यासाहेब केळकरांपेक्षा काही त्यांची साहित्यसेवा फारशी जुनी नाही. तरी देखील ते हिंदी गद्याचे व खडी बोलींतील काव्याचे जनक मानले जातात; यांतील तात्पर्य इतकेंच की हिन्दी साहित्य मराठीच्या मानाने तरणें आहे. सध्या तें जोमाने फोफावत असलें तरी त्याचा रोपटा जरा अलीकडचा आहे; असे होण्याचें कारणही मोठें गूढ आहे असें नाही. हिन्दी भाषेच्या प्रदेशांत इंग्रजी शिक्षणाचा प्रसार बंगाल व महाराष्ट्र याच्या थोडासा मागून झाला हें एक कारण वाङ्मयाची वाढ उशिराने होण्यास सांगता येईल. परंतु हें काही तितकेंसें मोठें किंवा तितकेंसें खरें

कारण नव्हे. खरें व मूलभूत कारण म्हणजे वाङ्मयनिर्मितीसाठी वापरण्यास योग्य अशी भाषाच या सर्व अफाट प्रदेशातील जनतेपुढे तयार नव्हती. महाराष्ट्रात मराठी भाषा पाचशें वर्षांच्या वापराने वाङ्मयीन उपयोगासाठी पूर्णपणे घटलेली अशी तयार होती. बंगाल्यात बंगाली त्याचप्रमाणे. त्यामुळे महाराष्ट्रात काय किंवा बंगाल्यात काय, इंग्रजी शिक्षणाचा सूत्रपात झाल्यानंतर सुशिक्षितांच्या मनांत स्वभाषेत वाङ्मय रचण्याची ऊर्मि उत्पन्न झाल्याबरोबर स्वभाषेचा उपयोग अगदी सहज रीतीने त्यांनी सुरू केला; त्यांत काही अडचण अशी त्यांस भासलीच नाही. मराठीसंबंधाने पाहिले तर चिपळूणकरांना आम्ही आधुनिक मराठी गद्याचे पहिले प्रभु मानतों; परंतु ह्या गद्यसम्राटाचे लिखाण १८७० च्या सुमारास सुरू झाले त्याच्या पूर्वीच्या तीस चाळीस वर्षांत मराठी गद्याचे पाईक व नाईक, सरदार व दरकदार किती तरी होऊन गेलेले आहेत. हिन्दीच्या पूर्वपीठिकेत असा सहज व एकेरी प्रवाह दिसून येत नाही. पश्चिमेस सतलज नदीपासून पूर्वेस गण्डकी नदीपर्यन्त आणि उत्तरेस हिमालयापासून दक्षिणेस सातपुड्यापर्यंत पसरलेल्या अफाट प्रदेशातील प्रचंड लोकवस्तीला वाङ्मयनिर्मितीसाठी वापरता येईल अशी तयार लोकभाषा कोणतीही नव्हती. राजस्थानी,–किंबहुना तिचे पोटभेद मारवाडी, मेवाडी, जयपुरी इ०–माळवी, नेमाडी, बुन्देलखंडी, छत्तिसगढी इत्यादि बोली संयुक्तप्रांताच्या बाहेरच्या प्रदेशामध्ये चालू होत्या, –व आहेत–त्यांचा वाङ्मयासाठी पूर्वीच्या काळीं म्हणण्यासारखा कधीच उपयोग केला गेला नव्हता. शिवाय त्यांपैकी प्रत्येकीचा प्रचार फारच लहान क्षेत्रांत, आणि त्यांचे लोकही त्या मानाने मागासलेले; अतएव आधुनिक वाङ्मयनिष्पत्तीसाठी या बोलींचा उपयोग करण्याचा प्रश्नच उद्भवत नव्हता. खुद्द संयुक्तप्रांतांतही केवळ ग्रामीण जनतेच्या तोंडींच ज्यांचे अस्तित्व अशा बोली पुष्कळ आहेत; परंतु त्याखेरीज साहित्यसंस्कार झालेल्या भाषाही काही अस्तित्वात होत्या. मलिक मुहम्मद जायसी, गोस्वामी तुलसीदासजी प्रभृतींच्या रचनेने योग्यतेस चढलेली **अवधी**, सूरदास, केशवदास प्रभृतींच्या कवनांनी पावन झालेली **व्रजभाषा**

आणि कबीर, नानक, दादू प्रभृतींनी वापरून पुनीत केलेली **खडी बोली** या तीन, भाषा या नात्याने सुशिक्षितांस आपल्या विचाराची अभिव्यक्ति करण्याकरितां उपलब्ध होत्या. यापैकी खडी बोलीचेच एक स्वरूप मुसलमानी कवींनी आत्मसात् करून सतराव्या शतकापासून वाङ्मय-निर्मितीसाठी उपयोगांत आणलें होते. या भाषेला 'हिंदी' असेच म्हणण्यात येत असे, परंतु त्यात फारसी आरबी शब्दाचे प्रमाण अतिशय असल्यामुळे इंग्रजी अमलांत उदयास येत असलेल्या हिन्दु सुशिक्षित समाजास ती भाषा रुचण्याजोगी व पेलण्याजोगी नव्हती. अशा स्थितींत वाङ्मयनिर्मितीच्याही अगोदर भाषानिर्मितीचा व भाषानिश्चितीचा प्रश्न सुशिक्षित समाजास सोडवावयाचा होता.

× × ×

हा प्रश्न सोडविण्याचे काम एकोणिसाव्या शतकभर काहींसे मण्डूकप्लुतीच्या गतीने चालले होते. हेच महनीय कार्य विसाव्या शतकाच्या प्रारंभीं अत्यंत निष्ठेने, दृढतेने व करड्या निग्रहाने महावीर-प्रसादजी द्विवेदी यानी तडीस नेले व वर उल्लेखिलेल्या अफाट प्रदेशा-साठी भाषेचा प्रश्न अगदी निखालसपणे सोडवून टाकला. या सर्व प्रातातील सुशिक्षित समाजास व तद्द्वारा एकंदर सर्व जनतेस आपले विचार विकार प्रकट करण्यास सुयोग्य व प्रभावशाली असे साधन त्यानी कायमचे मिळवून दिले. महावीरजींनी जीं अनेक कार्ये केलीं त्यातले सर्वांत मुख्य हे होय आणि यासाठीच अखिल हिंदीभाषी जनता त्याची निरंतर ऋणी राहील.

वास्तविक हा भाषेचा प्रश्न सोडविण्यास वर सांगितल्याप्रमाणे एकोणिसाव्या शतकांतच सुरवात झाली होती. कलकत्त्याच्या फोर्ट विल्यम कालेजाचे प्रमुख जॉन गिलक्राइस्ट यांच्या प्रोत्साहनाने फारसी-मिश्र उर्दू व संस्कृतमिश्र हिंदी या दोन्ही भाषांमधील ग्रंथनिर्मितीस मोठी चालना मिळाली. गिलक्राइस्टच्या आश्रयाने लल्लूलाल व सादल मिश्र यांनी आधुनिक हिंदीचें पूर्वस्वरूप म्हणून जिला म्हणता येईल अशा सुसंस्कृत **खडी बोली**मध्ये रचना करण्यास सुरवात केली.

मुसलमानानी खडी बोली घेऊन तिला फारशी आरबी शब्दांनी मढविलें, तिलाच उर्दू हे नाव मिळून ती मुसलमानी लिपीमध्ये सर्वत्र प्रचलित झाली. लल्लूजीलालसारख्या हिंदूंनी तीच खडी बोली घेऊन तिच्यात जरूर तेथे संस्कृत व संस्कृतोत्पन्न शब्द भरून साहित्याची भाषा या नात्याने तिजमध्ये ग्रंथरचना केली. अशा रीतीने आधुनिक हिंदी वाङ्मयाचा पाया घातला गेला. यात कोणाचीही परकी शब्दाना जाणून बुजून बहिष्कृत करण्याची बुद्धि नव्हती. परंपरेच्या संप्रदायाच्या भिन्नतेचा तो साहजिक परिणाम होता. याची उत्कृष्ट खूण हीच की उर्दू म्हणून म्हटली जाणारी भाषा मुसलमानापुरतीच मर्यादित कधीही नव्हती व अजूनही नाही. मुसलमानी लिपींत लिहिल्या जाणाऱ्या फारसीशब्दप्रचुर खडी बोलीचे ( उर्दूचें ) अध्ययन युक्तप्रांतातील हिंदू सररास करीत होते व अजूनही करितात. युक्तप्रांतीय कायस्थानी उर्दूमध्ये पुष्कळच उच्च दर्जाचे वाङ्मय लिहिले आहे. याच्या उलट काही थोडे मुसलमानही हिंदीचे (संस्कृतप्रचुर खडी बोलीचे) अध्ययन करून हिंदींत वाङ्मय निर्मिति करणारे झाले आहेत.

मुसलमानाना काय व हिंदूना काय, व्रज भाषा, अवधी व खडी बोली यापैकी खडी बोली हीच वाङ्मयनिर्मितीसाठी उपयुक्त वाटली याचे कारण खडी बोलीमध्ये तसेच विशिष्ट गुण होते हे होय. खडी बोली ही मूळ दिल्ली व दिल्लीच्या आसपासच्या प्रदेशाची लोकभाषा. मोगल साम्राज्याच्या प्रभावामुळे तिचा या संकुचित प्रदेशाच्या बाहेर मोठ्या प्रमाणांत प्रसार झाला; सर्व हिंदुस्थानातील मुसलमानानी तिला आपलीशी केली, कायस्थांनी व इतर चाकरमान्या शिक्षित वर्गाने तिच्यात प्रावीण्य मिळविलें आणि एकंदर हिंदुस्थानची ती सर्वप्रचलित बाजारू भाषा बनली. इतर प्रांतातले व इतरत्र भाषामधले शब्दप्रयोग आत्मसात करून घेण्याचा एक मोठा गुण तिच्यामध्ये आहे. त्याचप्रमाणे या खडी बोलीचें व्याकरण अगदी सुलभ आहे. साहित्याचे संस्कारही या भाषेस पूर्वीपासूनच झाले होते. कबीर, दादू इत्यादि संतकवींनी आपल्या स्फुट उद्गारासाठी खडी बोलीचा उपयोग केला होता व अमीर खुसरु

पासून किंवा निदान सतराव्या शतकापासून तरी मुसलमानांनी तिलाच मुसलमानी पेहराव देऊन व 'हिंदी' हे नाव देऊन तिच्यात प्रचुर व सुन्दर काव्यनिर्मिति केली होती. तेव्हा एकोणिसाव्या शतकात जेव्हा नवीन तऱ्हेच्या वाङ्मयनिर्मितीचा प्रश्न आला, तेव्हा व्रज, अवधी वगैरे भाषास मागे सारून खडी बोली हीच वाङ्मयाची—निदान गद्याची—भाषा म्हणून पुढे आली, यात नवल नाही.

परंतु एकोणिसाव्या शतकाच्या प्रारभीं कलकत्त्यास ईस्ट इंडिया कंपनीच्या आश्रयाने लल्लूलाल प्रभृतींकडून संस्कृतनिष्ठ खडी बोलीची रूपनिश्चिति करून तिच्यात वाङ्मयनिर्मिति करण्याचा जो प्रयत्न झाला तो कृत्रिम व अपुरा होता. जनसमाजाची प्रेरणा व स्फूर्ति त्याच्या मागे नव्हती. खुद्द युक्तप्रातातील जनता भिन्नभिन्न बोलींच्या बुजबुजाटात आणि व्रज भाषेतील कृत्रिम, पाचट व परिस्थितिविमुख काव्याडबरात गुरफटलेली होती. बदललेल्या काळास अनुरूप असे नवविचारानी प्रेरिलेले वाङ्मय निर्माण करण्याची वृत्ति जागृत झाली नव्हती.

कालातराने कलकत्त्याचे लोण बाकीपूर, पटणा व बनारस येथपर्यंत येऊन पोचले आणि स्वयंभू प्रेरणेने बाबू 'भारतेदु' हरिचन्द्र, राजा शिवप्रसाद सितारेहिंद, पं० गोविंद नारायण मिश्र इत्यादिकानी आधुनिक हिंदी वाङ्मयाचा खरा पाया घातला. यापैकी **'भारतेंदु' हरिश्चंद्र** हा खरा प्रतिभाशाली पुरुष होय. ब्रह्मदेवाला जसे 'सर्वलोकपितामह' म्हणतात त्याप्रमाणे यास आधुनिक हिंदी वाङ्मयाचा पितामह म्हणण्यास हरकत नाही. याच्या व विष्णुशास्त्री चिपळूणकराच्या चरित्रांत काही बाबतीत विलक्षण साम्य आहे. दोघेही १८५० साली जन्मले व अत्यत अल्प वयात निधन पावले. चिपळूणकराच्या 'निबन्धमाले'प्रमाणे भारतेन्दु बाबूंनी 'हरिश्चन्द्रिका' नांवाचे मासिक चालविले. फरक इतकाच की चिपळूणकरानी फक्त गद्याचेच प्रणयन केले तर भारतेन्दूने गद्य व पद्य या दोन्हींमध्ये आपली लेखणी चालविली. भारतेन्दूने गद्याकरितां खडी बोलीचा स्वीकार करून तिचे स्वरूप प्रौढ व सर्व प्रकारचे अभिनव विचार पेलण्यास समर्थ करण्याचा यत्न केला. तथापि पद्याकरिता बिहारी व केशवदास याच्यापासून परंपरेने

ालत आलेली, कृत्रिम, अलंकारप्रचुर व श्रवणमधुर शैलीने नटलेली अशी जभाषाच त्याने पसंत केली. अशा रीतीने, नववाङ्मयनिर्मितीसाठी ाषेचा जो प्रश्न नडत होता तो त्याने एकापरीने सोडविला व एथ-ासून हिंदी वाङ्मयाचा प्रवाह सतत गतीने वाहूं लागला.

परंतु एवढयाने सर्व अडचणींचे निराकरण झाले नव्हते. यानंतर ावशिष्ट राहिलेले अंतराय व अडथळे निवारण करून हिंदी वाङ्मयाच्या वाहाला अप्रतिहत गतीने वाहण्यास समर्थ करून त्याला महत्त्व, गांभीर्य वैपुल्य प्राप्त करून देण्याचे श्रेय **महावीरप्रसादजीं**कडे जाते. हें श्रेय ानी कोणत्या साधनेने मिळविले याचा विचार करणे बोधप्रद होईल.

× × ×

अयोध्या प्रातात लखनौच्या दक्षिणेस रायबरेली जिल्हा आहे. ात भागीरथीच्या काठी दौलतपूर म्हणून खेडेगाव आहे. तेथे एका ान्यकुब्ज ब्राह्मणाच्या कुळात संवत १९२१ मध्ये वैशाख महिन्यात इ. सन १८६४) महावीरप्रसादचा जन्म झाला. स्वतःच्या लहानपणचा त्तान्त महावीरप्रसादांनीच एके ठिकाणीं वर्णन केला आहे. त्यावरून ाच्या परिस्थितीची जाणीव वाचकास उत्कृष्ट रीतीने होईल.—

"मी एका १० रु. दरमहा मिळविणाऱ्या खेडुताचा मुलगा ाहे. गावच्या खेडवळ शाळेमध्ये थोडेसे उर्दू व घरी थोडेसे संस्कृत शिकून वयाच्या तेराव्या वर्षी रायबरेली शहरी जिल्हा हायस्कूलमध्ये ग्रजी शिकण्याकरिता गेलो. रायबरेली आमच्या गावापासून ३६ मैल ाब होती. घरून कणीक व डाळ पाठीवर बांधून घेऊन जात असे. रमहा दोन आणे फी देत होतो. डाळीमध्येच कणकेचे मुटके करून ाकून मी क्षुधा भागवीत असे, कारण मला तेव्हा पोळी करता येत ासे. एक वर्ष तेथे कसे तरी काढलें. पुढे पुरवा, फत्तेपूर व उन्नाव ाथील शाळांमधून चार वर्षे काढलीं. कुटुम्बाची स्थिति वाईट असल्या-ळे माझे शिक्षण येथेच समाप्त झाले.

"एक वर्ष अजमेरमध्ये दरमहा १५ रु. वर नोकरी करून ाबईस माझे वडील होते त्यांजकडे गेलों. तेथे तारेचे काम शिकून

जी. आय. पी. रेल्वेमध्ये २० रुपये पगारावर तारमास्तर बनलों...... तारमास्तर झाल्यावर रेलवेच्या इतर खात्यातली कामेही शिकून घेतलीं. त्याचा परिणाम चागलाच झाला. माझी बढती होत गेली. बढतीकरिता मला अर्जविनंत्या करण्याची जरुरी पडली नाही."

मुंबईस असताना महावीरजींनी मराठी व गुजराती शिकून घेतले. विशेषतः मराठी वाङ्मयाचा प्रभाव त्याजवर बराच पडला. मराठी गद्याची सरसता व ओजस्विता, त्याचा रेखीवपणा व व्याकरणशुद्धता, इत्यादि गुणांचा त्यांच्या मनावर परिणाम होऊन त्या गुणाचा परिपोष हिंदी गद्यामध्ये करण्याची दृढ इच्छा त्याच्या मनामध्ये जागृत झाली असल्यास त्यांत काहीच नवल नाही.

महावीर बाबू तारमास्तर या नात्याने हरदा, खंडवा, होशंगाबाद, इटारसी इत्यादि अनेक ठिकाणी राहिले. नोकरींत त्याची बढती होत होत ते टेलिग्राफ इन्स्पेक्टर होऊन त्या वेळच्या इंडियन मिडलंड रेलवेचे मुख्य ठिकाण झाशी येथे बदलून गेले. इटारसी ते कानपूर व आगरा ते माणिकपूर या सर्व रेलवे मार्गावरील तारायन्त्राच्या देखरेखीचे काम त्याजकडे होते. परतु इतक्या उच्च पदावर चढूनही नोकरींत त्याचे खरे मन नव्हते. आणि स्वाभिमान जाज्वल्य होता. एक दिवस इग्लडहून नव्या आलेल्या डी. टी. एस्. ने काही अपमान केल्याचे निमित्त होऊन द्विवेदीजींनी आपल्या नोकरीचा राजीनामा दिला. ही गोष्ट इ. स. १९०१ मध्ये घडली.

एकदोन वर्षे महावीरजी काही उद्योगाशिवाय स्वस्थ होते. १९०३ सालीं त्याना 'सरस्वती' मासिकाचे संपादक होण्यासाठी विनंती करण्यांत आली व ती त्यांनी स्वीकारली. अठरा वर्षे त्यांनी संपादकाचें काम केलें व पुढे वृद्धपणामुळे व प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे ते निवृत्त झाले. या अठरा वर्षांत 'सरस्वती' मासिकाचे संपादक या नात्याने त्यानी जें कार्य केलें त्याचा इतका अद्भुत प्रभाव हिंदी साहित्यावर पडला की हिंदी साहित्यामध्ये नवचैतन्याचा संचार होऊन ते अनेक तरारणाऱ्या शाखांनी प्रफुल्लित होऊन गेलें. आधुनिक हिंदी वाङ्मयाचे

सर्वश्रेष्ठ प्रेरक, नियामक व संशोधक म्हणून त्यांचे नाव अजरामर झाले आहे. पंडितजींच्या संपादनकार्याविषयी स्वर्गवासी पंडित रामदास गौड यानी म्हटले आहे, "पंडितजींच्या संपादनामुळे 'सरस्वती'ने खरोखरी आपल्या नावाचें सार्थक केले. हिंदीच्या क्षेत्रात एखाद्या प्रौढ व समुन्नत विश्वविद्यालयाने जितके काम केले असतें तितके महावीरसंपादित 'सरस्वती' ने केले आहे."

विद्वान्, प्रतिभाशाली व कर्तव्यनिष्ठ संपादक केवळ आपल्या मासिकासाठीच नव्हे तर आपल्या भाषेच्या वाङ्मयासाठी काय करूं शकतो, याचें पं. महावीरप्रसाद हे मूर्धाभिषिक्त उदाहरण आहे. ते थातुर मातुर संपादक नव्हते; जाहिरातबाजीने लोकांची नजरबंदी करून आपला लग्गा साधणारी संपादकगिरीही त्यांच्या अंगीं नव्हती. 'सरस्वती'चे संपादक होण्यापूर्वी एक विद्वान लेखक, समालोचक व कवि या नात्याने त्यानी चांगली कीर्ति संपादन केली होती. भाषेच्या शुद्धतेविषयी व शैलीच्या समुचिततेविषयी त्यांच्या कल्पना बनलेल्या होत्या. अशा परिपक्व अवस्थेत ते संपादक झाल्यामुळे त्यांच्या प्रज्ञेचा व संकलित अनुभवाचा फायदा त्वरित व मोठ्या प्रमाणात 'सरस्वती'ला व 'सरस्वती'च्या द्वारा हिंदी भाषेला मिळाला.

हिन्दी भाषेची स्थिति त्या वेळीं, म्हणजे पंडितजींनी संपादनकार्य हातीं घेतले त्या समयास, फार हलाखीची होती. एवढ्या अफाट हिंदी-भाषी जनतेसाठी दैनिक काय तें एक निघत होते; साप्ताहिकें नांव घेण्याजोगीं अशीं सहा होतीं, परंतु त्यापैकी तीन कलकत्त्यास व एक मुंबईस निघत होते ! एकदोन बऱ्यापैकी मासिकें निघून बंद झालीं होतीं व एकदोन चालू होतीं, तीं सामान्यच होती. हिन्दी भाषेच्या त्या वेळच्या स्थितीसंबंधाने रामदासजी गौड लिहितात, "त्या दिवसात उर्दू पुस्तकें पुष्कळ छापलीं जात व खपत, हिन्दीचीं फार कमी. सुप्रसिद्ध सुधारक व प्राच्यविद्वान रा. ब. लाला वैजनाथ यांना मी त्या सुमारास एकदा विचारलें, 'आपण हिंदीमध्ये उत्कृष्ट लिहूं शकत असूनही उर्दूमध्येच का लिहितां?' त्यांनी उत्तर दिलें, 'हिंदी पुस्तकांना कोणी विचारीत नाही. विधवा-

विवाहावर मी लिहिलेल्या हिंदी पुस्तकाच्या प्रती आजतागायत तशाच पडल्या आहेत; आणि उर्दू पुस्तकाची दुसरी आवृत्ति निघाली आहे.' "

अशा स्थितींत सन १९०० ( अथवा १९०१ ) सालीं 'सरस्वती' मासिक काशीच्या नागरी प्रचारिणी सभेच्या पुरस्काराने सुरू करण्यात आले. पहिलीं तीन वर्षें त्याचे संपादकत्व नागरीप्रचारिणी सभेचे संचालक बाबू श्यामसुन्दर दास यानीच सभाळले होते. परंतु मासिकाची प्रगति विशेष होत नव्हती. पंडित द्विवेदी चौथ्या वर्षापासून संपादक नियुक्त झाले, त्या वर्षी तर ग्राहकसंख्या फारच खालावली होती. पंडितजींनी संपादकत्व स्वीकारले त्या वर्षाच्या सर्व अंकात मिळून बाहेरच्या एका लेखकाच्या लेखाखेरीज बाकी सर्व लेख पंडितजीचे होते. हे का ? बाहेरचे कोणाचे लेख आले नव्हते म्हणून नव्हे–तर लोकाचे आलेले लेख पसंत नव्हते व जे थोडेबहुत पसंत होते, त्यात इतकी दुरुस्ती करण्याची जरुरी होती की त्यापेक्षा नवे लेख लिहिणेच अधिक सोयीचे होते म्हणून !

पंडितजीनी घोर परिश्रम करून आपल्या मासिकाला व हिंदी भाषेला या स्थितीतून बाहेर काढले. कोणचाही लेख संपूर्ण काळजीपूर्वक वाचल्याखेरीज ते पसत–नापसत ठरवीत नसत. लेख साधारणपणे पसत झाला तरी त्यात दुरुस्ती करून तो आपल्या मनाजोगा उतरल्याखेरीज ते छापावयास देत नसत. भाषेची शुद्धता, नीटनेटकेपणा, संप्रदायानुसारिता, स्पष्टार्थता इत्यादि गुणाविषयी द्विवेदीजींचा भारी कटाक्ष असे. यासंबंधाने मोठमोठ्या लेखकाच्या देखील कशा चुका होतात, हे दर्शविणारा 'भाषा और व्याकरण' नावाचा लेख त्यानी आपल्या संपादकीय कारकीर्दीच्या तिसऱ्याच वर्षी लिहिला. त्या लेखाने सर्वत्र खूपच खळबळ माजवून दिली. उत्तरेप्रत्युत्तरे, गालिप्रदान व टवाळीही बरीच झाली. तथापि लेखाचा परिणाम मात्र चागलाच झाला. लेखक व्यवस्थित, नीटनेटकी व स्पष्टार्थक भाषा लिहूं लागले.

द्विवेदीजीच्या पूर्वी **खडी बोली** ही हिंदी गद्याकरिता सर्वाकडून स्वीकारली गेली असली तरी लेखकाच्या लिहिण्यात शिथिलता व अव्यवस्थितपणा बराच असे. कित्येक रूपांचीही निश्चिति झालेली नव्हती.

द्विवेदीजींनी ही स्थिति पार बदलून टाकली. द्विवेदीजी स्वतः आपल्या लेखामधून उज्ज्वल भाषाशैलीचा आदर्श लोकांपुढे ठेवीत असतच. परंतु याशिवाय 'सरस्वती'कडे येणाऱ्या प्रत्येक लेखाच्या भाषेत ते भाषाशुद्धीच्या स्वतःच्या कल्पनानुसार दुरुस्ती व बदल करीत असत. त्यामुळे 'सरस्वती'तील लेखाची भाषा एकजात एका साच्यातून ओतून काढली आहे की काय असे भासत असे. अर्थात् या एकजात एकसारख्या उज्ज्वल भाषाशैलीचा परिणाम वाचकावर व लेखकावर जादूसारखा होऊ लागला. आणि बहुतेक सगळे प्रसिद्ध वा अप्रसिद्ध लेखक द्विवेदी शैलीचे अनुयायी बनले. आजकालच्या लेखकांपैकी तरुण लेखक वगळले तर बाकीचे बहुतेक सर्व प्रथितयश लेखक अशा रीतीने द्विवेदीजींच्या तालमीत तयार झालेले किंवा निदान त्यांच्या शैलीने प्रभावित झालेले आहेत असे आढळून येईल.

अशा रीतीने सरल, शुद्ध, स्पष्टार्थक व नियमबद्ध अशा गद्य-शैलीचा प्रकार द्विवेदीजींनी सर्वत्र रूढ केला. परंतु इतक्यावरच त्यांची कामगिरीही थांबली नाही. जे लेखनप्रवृत्त होते, त्यांचे लेखन तर सुधारलेच; परंतु जे लिहीत नव्हते त्यांना लिहायला लावले, ही त्यांची कामगिरीही फार मोठी झाली आहे. नवीन लेखकांची एक सेनाची सेना त्यांनी निर्माण केली. महत्त्वाच्या व उद्बोधक विषयावर चांगले लिखाण लिहू शकेल असा कोणी मनुष्य त्यांच्या लक्षात आला रे आला की त्याला धरल्याशिवाय ते सोडीत नसत. यासंबंधाने एक मजेदार गोष्ट रामदास गौडजींनी सांगितली आहे. रायसाहेब छोटेलालजी (बार्हस्पत्य) यांनी 'हिंदुस्थान रिव्ह्यू' या इंग्लिश मासिकांत वेदांग ज्योतिषावर अत्यंत महत्त्वपूर्ण लेख लिहिले होते. द्विवेदीजींच्या नजरेस ते पडताच त्यांना फार धन्यता वाटली. त्यांनी एक आशीर्वादपर सुन्दर कविता संस्कृतमध्ये रचून ती 'बार्हस्पत्यां'कडे पाठवून दिली. त्या कवितेने बार्हस्पत्यांवर नेमका पाहिजे तोच परिणाम केला. त्यांचे सुन्दर संशोधनात्मक लिखाण लगेच 'सरस्वती'मध्ये यावयास सुरवात झाली. अशा उदाहरणांचा या लेखात अधिक उल्लेख करणेही शक्य नाही.

कारण द्विवेदींजीनी निर्माण केलेल्या, पुढे आणलेल्या अगर प्रोत्साहित केलेल्या लेखकाचा उल्लेख करावयाचा म्हटल्यास आधुनिक हिंदींतील बहुतेक सर्व प्रसिद्ध लेखकाची नामावळी गाण्याचा प्रसंग येईल.

हिंदीचा गौरव वाढवून आणणारी एक कामगिरी द्विवेदीजींनी केली. अनेक चागले चागले लेखक पूर्वी उर्दूतून आपले लेखन करीत असत. त्याना हिंदींत लिहिण्यास त्यांनी प्रवृत्त केले. कित्येक लेखकाच्या अशा क्षेत्रपालटामुळे हिन्दी वाङ्मयाला केवढा लाभ झाला आहे, हें एका प्रेमचंदजीच्या उदाहरणावरून चटकन् ध्यानात येईल. मुनशी धनपतराय उर्फ प्रेमचदजी हे प्रथम उर्दूतच लिहीत असत पुढे हिंदीचा गौरव 'सरस्वती' मासिकाने वाढविल्यानतर 'सरस्वती' मध्येच ते आपल्या हिदी भाषेतील लघुकथा लिहू लागले ही गोष्ट प्रसिद्ध आहे

द्विवेदीजीचे सपादनकार्य इतके प्रभावशाली होतें की त्याच्या हाताखाली संपादनकार्य शिकून अनेक उत्कृष्ट संपादक तयार झाले. कानपूरच्या विख्यात 'प्रताप' साप्ताहिकाचे संपादक हुतात्मे गणेश शकर विद्यार्थी, पण्डित हरिभाऊ उपाध्याय, पण्डित देवीदत्त शुक्ल, श्री पदुमलाल पन्नालाल बक्षी इत्यादि अनेक यशस्वी संपादक द्विवेदीजींच्या तालमींत तयार झालेले होत.

द्विवेदीजी श्रेष्ठ दर्जाचे समालोचक व टीकाकार होते. त्यांनी 'सरस्वती' हातीं घेतल्यानंतर त्यांतील ग्रंथसमालोचनाचे सदर अत्यंत प्रभावशाली बनलें. त्याच्या टीकेंत गुळमुळीत कांही नसायचें. निर्भय वृत्तीने गुणांबरोबरच दोष दाखविण्यास ते कधी कमी करीत नसल्यामुळे आशाळभूत लेखकाचीं हृदयें त्याच्या टीकानी धडधडू लागत. त्याच्या समालोचनात भाषेचा व व्याकरणाचा बारकावा फार पाहिला जात असे. त्याच्या अशा समालोचनाच्या पद्धतीचा हिंदी वाङ्मयास फार फायदा झाला. लेखकांची शैली व विचार व्यक्त करण्याची पद्धति यात फार सुधारणा झाली.

आतापर्यंत उल्लेखिलेली कामगिरी साधारणपणें गद्य लिखाणासंबंधींची होय. काव्यासंबंधांतही त्याची कर्तबगारी तितकीच किंबहुना अधिकच महनीय ठरली आहे. द्विवेदीजी स्वतः कवि होते. 'सरस्वती'-

मध्ये येण्यापूर्वीही त्यांनी कांही कविता रचिली होती; कालिदासाच्या कुमारसंभवाच्या पहिल्या पाच सर्गांचे 'कुमारसंभवसार' म्हणून काव्यात्मक रूपातरही त्यानी केले होतें. 'सरस्वती'मध्ये आल्यानंतरही त्यानी कविता लिहिली. परंतु त्यानी स्वतः कविता लिहिली या गोष्टीस इतके महत्त्व नाही, तर त्यानी इतर कवींकडून कविता लिहविली व कवितेचें नवे प्रभावशाली युग हिंदीमध्ये निर्माण केलें ही गोष्ट त्यापेक्षा किती तरी महत्त्वाची आहे. त्यानी निर्माण केलेल्या नवीन युगाचें लक्षण म्हणजे खडी बोलीचा गद्याप्रमाणेच कविता लिहिण्यात उपयोग होऊं लागला हें होय. भारतेन्दु हरिश्चन्द्रानी खडीबोली गद्यामध्ये प्रतिष्ठापित केली व तीच परंपरा महावीरप्रसादजींनी पुढे चालवून खडी बोलींतील गद्य अधिक भरदार, नियमबद्ध व समर्थ बनविलें. परंतु कविता व्रजभाषेमध्ये लिहिण्याची परिपाटी पूर्वीपासून चालत आली होती, तीच भारतेन्दूने मान्य केली होती. त्यानंतरचे एक कवि पं० श्रीधर पाठक यानी हा रिवाज मोडून आपली काव्यरचना खडी बोलीमध्ये केली. द्विवेदीजींनी पाठकजींच्या कवितेवर मुद्दाम लेख लिहून त्याचें अभिनंदन केले; कारण गद्याप्रमाणेच काव्य देखील खडीबोलींतच लिहिलें पाहिजे असा त्याचा आग्रह होता. गद्य एका भाषेत तर काव्य दुसऱ्याच भाषेत हा प्रकारच मुळात कृत्रिम, त्यातून व्रजभाषा व तींतील काव्यरचनेची परंपरा तर फारच कृत्रिम व जीवनविमुख बनली होती. व्रजभाषा ही अगोदर लोकव्यवहारातून नष्ट झालेली भाषा, तींतील काव्याची परंपरा म्हणजे साहित्यशास्त्रोक्त नायिकांचे भेद, त्याच्या अवस्था, त्याची अलंकारयुक्त कल्पनाच्या कसरतींनी भरलेलीं वर्णनें—अशा तऱ्हेची. कालाच्या गतीचें लक्षण ओळखणारा, देशोन्नतीच्या दिशेने वाङ्मयाचें सुकाणूं वळविणारा द्विवेदीजींसारखा जीवनाभिमुख महापुरुष या असल्या काव्यपरंपरेला त्याज्य समजूं लागला तर त्यात नवल काय? अगदी प्रारंभींचे अल्प अपवाद सोडून त्यांनी आपली सर्व कविता खडीबोलींत लिहिली, इतकेंच नव्हे, तर खडीबोलींत काव्य

लिहिणारा अव्वल दर्जाचा कविसमुदाय निर्माण केला. दिगन्तविख्यात कवि श्री. मैथिलीशरण गुप्त याना द्विवेदीजींनी निर्माण केले असें म्हणण्यात येते, यापरती द्विवेदीजींच्या लोकोत्तर कामगिरीची साक्ष दुसरी कोणती पाहिजे? पं० रामचरित उपाध्याय, पं० लोचनप्रसाद पांडेय, प० लक्ष्मीधर वाजपेयी, ठाकुर गोपालशरणसिह, पं० रामचद्र शुक्ल, पं० नाथूराम शंकर शर्मा, मैथिलीशरणाचे धाकटे बधु श्री. सियारामशरणजी इत्यादि अनेक खडीबोलींत रचना करणारे सुविख्यात कवि या द्विवेदी युगात उदयास आले. याची स्वतत्र प्रतिभा व स्वयंभू तेज कोणीही नाकारू शकत नाही. परंतु द्विवेदीजींचे साहाय्य व प्रोत्साहन नसते तर यापैकी किती कवि उदयास आले असते याविषयी शंका आहे. द्विवेदीजी स्वतः अव्वल दर्जाचे कवि नसतील, परतु अनेक अव्वल दर्जाच्या कवीचे निर्माते व सस्कारकर्ते म्हणून त्याचे स्थान अतुलनीय आहे.

द्विवेदीजींच्या काव्यरचनेचा वर उल्लेख केलाच आहे. त्याचें गद्य लिखाण बहुतेक लहान मोठया निबन्धाच्या स्वरूपाचे आहे. 'हिंदी भाषा और साहित्य', 'भाषा और व्याकरण', 'हिदी भाषा की उत्पत्ति', 'कालिदास की निरंकुशता' 'मिश्रबंधु का हिदी नवरत्न' इत्यादि त्याचे निबन्ध विशुद्ध लेखनशैलीचे व सखोल, मार्मिक विचाराचे उत्कृष्ट नमुने म्हणून दाखविता येण्याजोगे आहेत. खेरीज त्यानी इंग्रजी व सस्कृत ग्रंथाचे अनुवादही केले आहेत. परंतु त्याचें स्वत.चे लिखाण ही काही हिंदी वाङ्मयाला त्यानी दिलेली सर्वांत मोठी देणगी नव्हे. संपादक या नात्याने त्यानी हिंदी साहित्याचें जे नियमन, संशोधन व उज्जीवन केलें ते त्याचें खरे कार्य होय व त्याबद्दलच हिंदी-भाषी जग त्याचें ऋणगान करीत आहे.

द्विवेदीजी संपादक या नात्याने जितके स्नेहाळू व कष्टाळू होते तितकेच ते निर्भीड, निःस्पृह व स्पष्टवक्तेही होते. ते आदर्शवादी संपादक होते. आपल्या तत्त्वांपुढे व मतांपुढे ते कोणाचाही मुलाहिजा ठेवीत नसत. 'सरस्वती'च्या पहिल्या काळांत, ज्या वेळीं एखाद्या बी. ए. चा लेख मिळणे म्हणजे संपादकाना मोठी सुदैवाची गोष्ट वाटतं

असे, अशा काळात एका पीएच्. डी. ने आपला लेख द्विवेदीजींकडे पाठवून दिला व सोबत लिहिलें की, 'या लेखाचे सशोधन करिताना कृपा करून कोणताही उर्दू शब्द घालूं नये.' द्विवेदीजींनी ताबडतोब लेख परत पाठविला व सोबत लिहिले की 'संपादकीय कार्यांत मी कोणाचीही कोणचीही शर्त मान्य करू शकत नाही.' द्विवेदीजींची तेजस्विता प्रत्ययास येण्याचा एक मोठा प्रसंग त्यानी संपादनकार्य हाती घेतल्यानंतर लौकरच आला होता. 'सरस्वती' मासिक काशीच्या नागरी प्रचारिणी सभेच्या पुरस्काराने सुरू झाले होते. त्याच्या प्रकाशनाची जबाबदारी व मालकी मात्र अलाहबादच्या इंडियन प्रेसचे मालक श्री. चितामणि घोष याज-कडे होती. सभेमार्फत जुन्या हस्तलिखिताचा शोध व संग्रह होत असे व त्या कार्याचा अहवालही सभा (इंग्रजींत!) छापून प्रसिद्ध करीत असे. १९०१ च्या कार्याचा अहवाल इंग्रजी व इतर भाषातील पत्राकडे पाठविला गेला, परंतु 'सरस्वती'कडे आला नाही. तेव्हा द्विवेदीजींनी तो स्वखर्चाने मागवून त्याचे समालोचन 'सरस्वती'मध्ये केले. अर्थात् समा-लोचन नेहमीप्रमाणे स्पष्टोक्तिपूर्ण असून त्यात काही चुकाही दाखविल्या होत्या. त्याबरोबर सभेच्या चालकानी रुष्ट होऊन त्या समालोचनाचे खडन करणारे पत्र श्री. चितामणि घोष याना लिहिलें. त्यावर द्विवेदी-जींनी 'सभा और सरस्वती' या मथळ्याखाली एक सणसणीत लेख लिहिला. तेव्हा सभेच्या अधिकाऱ्यामध्ये मोठी खळबळ माजली व कार्यकारी मंडळाची बैठक होऊन त्यात सभेचा पुरस्कार मासिकावरून काढून घेण्याचे ठरले. त्याप्रमाणे घोष बाबूंना कळविण्यात येताच त्यानी त्या अंकाचे छापलेले मुखपृष्ठ रद्द करून 'नागरी प्रचारिणी सभा के अनुमो-दन से संस्थित' हा त्यावरील मजकूर गाळून दुसरे मुखपृष्ठ छापवून अंक प्रसिद्ध केला. ह्या दुःखदायक घटनेवर द्विवेदीजींनी 'अनुमोदन का अंत' नावाचा एक हृदयस्पर्शी लेख लिहिला. तथापि आपला सपादकीय अधि-कार बजावण्याच्या तत्त्वापासून ते रतिमात्र ढळले नाहीत.

अर्थात या प्रसंगामुळे पुढे द्विवेदीजी व नागरी प्रचारिणी सभा यांच्यामध्ये काहीशी तेढ उत्पन्न झाली. परंतु ज्या सभेशीं त्यांचा इतका

विरोध आला होता, त्याच नागरी प्रचारिणी सभेने १९३२ साली त्यांना मानपत्र देऊन त्याचा सन्मान केला, इतकेच नव्हे तर १९३३ साली त्याना सत्तरावें वर्ष लागणार, त्या समयास अनुलक्षून एक अभिनदन ग्रंथ तयार करून तो त्याना अर्पण करावा अशीही योजना केली. त्या योजनेस अनुसरून बाबू श्यामसुंदर दास व राय कृष्णदास याच्या सपादकत्वाखाली एक भव्य व अतर्बाह्य सुंदर ग्रंथ तयार करण्यात येऊन तो समारभाने त्यास अर्पण करण्यात आला.

ज्या सभेने पूर्वीचा विग्रह विसरून त्याच्याबद्दल ही गुणग्राहकता दर्शविली त्या सभेलाही द्विवेदीजींनी अनेक रीतींनी उपकृत केलें आहे. आपला मोठा ग्रंथसंग्रह त्यानी सभेला बहाल केला असून शिवाय बरीच मोठी देणगीही दिली आहे. याखेरीज साहित्यिक महत्त्वाचा एक अमूल्य संग्रह त्यानी सभेला दान केला आहे. तो म्हणजे त्यानी सरस्वतीमध्ये छापलेल्या अनेक लेखकाच्या हस्तलिखिताचा होय. या हस्तलिखितामध्ये द्विवेदीजींनी आपल्या हाताने केलेल्या दुरुस्त्या व घातलेले शोध विद्यमान असल्यामुळे त्याना एक प्रकारचे अपूर्व महत्त्व आहे, हे उघड आहे. सभा व द्विवेदीजी याच्यातल्या परस्पर संबंधाचे हें पर्यवसान पाहिले म्हणजे हिंदी साहित्य आज कोणत्या गुणाच्या बळावर द्रुत गतीने पुढे धावत आहे, याचा उलगडा होतो. गुणग्राहकता, उदारता, निष्कपटपणा व प्रेम या गुणाच्या जोरावरच हिंदी भाषा व हिंदी साहित्य भारताला व्यापीत चाललें आहे, हा ठसा हिंदी साहित्याच्या क्षेत्राकडे लक्ष पुरविल्यास आपल्या मनात ठसल्याखेरीज राहणार नाही.

द्विवेदीजींना इतर मानसन्मान देण्यातही हिंदीभाषी जगाने कसूर केलेली नाही. १९३४ सालीं प्रयागला 'द्विवेदी मेळा' या नांवाने एक साहित्यिकाचें संमेलन भरविण्यांत आले होते. हिंदी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद तर कित्येक वर्षं त्याना देऊं करण्यांत येत असे; परंतु प्रकृतीच्या अस्वास्थ्यास्तव (कांही अंशीं विनयानेही असेल) त्यानी तें अखेरपर्यंत नाकारलें. आपल्या आयुष्याचे अखेरचे दिवस ते आपल्या दौलतपुर गावीं वडिलोपार्जित शेतीच्या सान्निध्यांत घालवीत होते. गंगेच्या अगदी

काठावर त्याच्या स्वतःच्या आंबराया असून त्या रायातील झाडाची निगा राखण्यात व त्याच्या मधुर फलांचें सेवन करण्यात त्यास मोठे समाधान वाटे. त्याची पत्नी त्याच्या ४६ व्या वर्षी वारली तेव्हापासून ते वानप्रस्थ अवस्थेचा उपभोग घेत होते. त्याना स्वतःचे सतान नव्हतें, तथापि आपल्या बहिणीचीं मुले त्यांनी स्वतःचीं म्हणून पाळून त्याचे संगोपन केलें. त्याचे औदार्य मोठें होतें. आप्तस्वकीयास योग्य वेळीं मदत करण्यात तर तें दिसून येत असेच. शिवाय सार्वजनिक संस्थास मदत करण्यातही त्याचा हात सढळ होता. नागरी प्रचारिणी सभेला दिलेल्या अमूल्य धनाचा उल्लेख तर वर केला आहेच. शिवाय बनारसच्या हिंदु विद्यापीठालाही कित्येक हजार रुपये—आपल्या संचित धनापैकी बृहदंश—त्यानी दिले. असा हा महापुरुष २१ डिसेंबर १९३८ रोजीं, मूळचीच ढासळलेली प्रकृति विकोपास जाऊन, स्वर्गवासी झाला. त्याच्या मृत्यूमुळे हिंदीभाषी जग पितृनिधनाचे दुःख अनुभवीत आहे.

---

# टीपा

[ ‘एकावळी’ची पहिली आवृत्ति प्रसिद्ध झाल्यानंतर गेल्या दहा वर्षांत त्यातील विषयासंबंधाने अधिक माहिती जी उपलब्ध झाली अगर चर्चेची जीं स्थळे निर्माण झालीं असे श्री. बनहट्टी याच्या लक्षात आले, त्याच्या संबंधाने त्यानी लिहिलेलीं टिपणे वाचकास येथे सादर करण्यात येत आहेत. ]

## १ ज्योतीपंत महाभागवत

पान २, ओळ १४. **मुकुंदबुवा महाभागवत**—ज्योतीपताचे हे साक्षात् वंशज, पुढे (पान ३ ओळ ५ वर) उल्लेखिलेल्या रघुनाथबुवाचे चिरंजीव. ज्येष्ठ वंशज या नात्याने चिंचणेर येथील महाभागवताच्या मठाचे हे चालक होते हे व याचे बंधु रवळनाथबुवा कीर्तनार्थ सचार करीत. याच्या संचाराचे क्षेत्र दक्षिणेकडे होते. दक्षिण कोकण, सावंतवाडी संस्थान, गोवे प्रात हा याच्या संचाराचा टापू नेहमीचा असे. ज्योतीपंताच्या संबंधीं माहिती व सामग्री मिळविण्याकरिता मी चिंचणेर येथे गेलो, तेथे मुकुंदबुवाचा परिचय होऊन त्याचा प्रेमळ व आनंदी स्वभाव, रसाळ वाणी व सुंदर निरूपणाची पद्धत याचा अनुभव घडला. बुवाना श्रीमद्भागवत जवळजवळ मुखोद्गत होते, तसेच ज्योतीपंताचे भागवतावरील अभग आणि ओव्या ते पटापट म्हणत. तुकारामादि इतर संताच्या वाङ्मयाची उपस्थितिहि त्यास चागली होती. आवाज पहाडी पण गोड. या गुणसमुच्चयामुळे त्याचीं कीर्तने रसाळ होत. कीर्तनसंमेलनात उत्कृष्ट कीर्तनाबद्दल पहिला मान त्याचा झाला होता. आमच्या वडिलाशीं त्याचा परिचय होऊन त्याची मैत्री जुळली, तेव्हापासून हे दक्षिणेकडे संचारार्थ जाता येता मिरजेस आमच्या घरीं मुक्काम करीत व दोघांच्या वार्तासंलापांत वाङ्मयानंदाचा रंग भरे. असे हे ‘महाभागवत’ पदवीस

साजेशा अंतरंगाचे सत्पुरुष आषाढ वद्य १४ शके १८५५, ता. २१ जुलै १९३३ रोजीं कालवश झाले. प्रस्तुत मजकूर याच तिथीच्या सुमारास लिहिला जात आहे, हा योगायोग मजेदार आहे.

पा. १५, ओ. १९. **शेंकडो देवळें बांधलीं**—ज्योतीपंतांच्या उत्तरेकडील कामगिरीसबंधांत खुद्द त्याच्या पत्राचा अस्सल ऐतिहासिक आधार जसा सापडला, तसाच त्यानी दक्षिणेत संचार करून देवालय-स्थापनेचे जे कार्य केलें, त्याचे दिग्दर्शन करणारा अस्सल पुरावा सुदैवाने उपलब्ध झाला आहे. मुंबई प्रांताच्या सरकारने पेशवे दप्तरांतून निवडलेल्या कागदाचे खंड प्रसिद्ध केले आहेत, त्यापैकी ४३ व्या खंडातला १२८ वा अंक हे खुद्द ज्योती गोपाळ याचे पेशवे सरकारचे मुख्य न्यायाधिपति रामशास्त्री प्रभुणे याना लिहिलेले पत्र.आहे. त्यात ज्योतीपंतांनी पेठ येवले येथे स्थापिलेल्या श्री पाडुरंगाच्या देवालयाचा दुसऱ्या एकाने उच्छेद चालविला असल्याबद्दल तक्रार केली आहे. पत्रातील मजकूर लक्षणीय व उद्‌बोधक असल्यामुळे तें येथे सपूर्ण उतरिले आहे

श्री

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री शास्त्रीबावा स्वामीचे सेवेसी,

विद्यार्थी जोती गोपाळ माहाभागवत साष्टाग नमस्कार विनंती; येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत असिले पाहिजे. विशेष श्रीपाडुरंगाच्या स्थापना ते प्रांतींहून करीत इकडे हे प्राती आलो. मार्गी पेठ येवले परगणे पाटोदे येथे आलो. तेथील हि गावकरी आनकूल जाले. देवाल्य बांधून दिल्हे. त्यावरून श्रीची स्थापना तेथे केली. येक वर्ष जाले. आम्ही जनस्थानी येऊन राहिलो. आमच्या मागे, राजश्री बापाजी गोसावी पुन्यस्तंबकर पेठ मजकुरी राहतात, त्याचे तेथे संस्थान व्यंकटेशाचे आहे, त्यास त्यानी आमचे संवस्थानाकडे समारंभ विशेष पाहून तेथे आमचा ब्राह्मण होता त्यासी नाना प्रकारे कज्या करून श्रीपाडुरगाच्या मोर्ती स्थापिल्या होत्या त्याचा उछेद्र करून घेऊन गेला. देवाल्य पाडीत होता तें गांवकरी यानी

राहविलें. कोणाचे यैकेनात. तदनंतर आम्ही येथून सिष्य पाठविले त्याच्या स्वाधीन मोर्ती केल्या. पुन्हा स्थापनेचा आरभ करताच मारामारी करून मोर्ती नेल्या. राजश्री सिवाजी विठल विचूरकर याजकडील कमाविसदारानी व राजश्री रामचंद्रपंत आबीकर याजकडील कमाविसदारानी बहुता प्रकारे सागितले परंतु यैकिले नाही. तेथे यज्जूशाकी मंडळी आहेत. सर्वत्र मिळोन मारामारी करितात. आम्ही स्थापना करून त्याचा उछर्ग केला. तो देव सर्वांचा आहे. आम्हास काही अभिमान नाही. परंतु स्थापनेचा उदेग कोण्ही करीत नाही. याकरिता आपणास लिहिले आसे. तर हा मजकूर मनास आणून स्थापना करावी. मशारनिलेस तेथे नेऊन चौकसी करावयाची आसली तर करावी. नाहीतर कमाविसदारास ताकीदपत्रे द्यावी. हरयेक प्रकारे देव स्वस्थानी बसतील यैसे करावे. स्वराज्यात यैसे कोठे जाले नाही. आम्ही येथे पंचवीस ब्राह्मण उपोशण करून श्री रामचंद्रजी सनिध पंचवटीमध्यें स्नानसंध्या करून आहों. स्थापना जाल्यावर पारणे होईल. आपण धर्मकृत्याचे ठाई सादर आहेत. ल्याहावे यैसे नाहीं. सूचनार्थ लिहिले आसे. आपल्यास कर्तव्य तें करावे. श्रीचा प्रसाद नारेळ व बुका पाठविला आहे, तो घ्यावा. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

या पत्रात मिति अगर कालदर्शक दुसरा कसलाही उल्लेख नाही, ही मोठीच उणीव आहे. तथापि इतर काही गोष्टी लक्षांत घेण्याजोग्या आहेत. ज्योतीपंतानी स्वतःच आपल्याला 'महाभागवत' म्हटलें आहे, यावरून ही त्यांची पदवी तेवढ्या अल्प कालांतच सर्वमान्य झाली होती, असें दिसतें. 'विद्यार्थी' या पदाने रामशास्त्र्यांसारख्या उच्चपदस्थ महाविद्वानापुढे ज्योतीपंतांनी आपला नम्रभाव प्रकट केला आहे. शास्त्रीबोवाचा त्यांचा पूर्वपरिचय असावा असेंही दिसते. पुढील मजकुरावरून असे दिसतें की ज्योतीपंत हे पुणें प्रांताहून उत्तरेकडे पाडुरंगाचीं देवालयें स्थापन करण्याच्या उद्देशाने संचार करीत चालले होते. कथामतकाराच म्हणणें प्रमाण मानावयाचें तर पुण्याची ही त्यांची

दुसरी खेप असली पाहिजे (पान १४). ज्योतीपंत काशीहून प्रथम पंढरपुरास आले व फलटणावरून पुण्यास जाऊन तेथून त्यानी वाई साताऱ्यावरून दक्षिण प्रांतीं दौरा केला व कोकणांत उतरून उत्तरेकडे वळून मुंबईस जाऊन तेथून ते पुन्हा पुण्यास आले व या दुसऱ्या भेटीनंतर उत्तरेकडे वळून त्यानी नाशिक त्रिंबक येवलें हीं गावे घेतलीं असें कथामृतकार म्हणतो. या पत्रावरून येवलें अगोदर घेऊन नंतर त्यानी नाशिक क्षेत्रीं वर्षभर वस्ती केली असें दिसतें.

देवालय किंवा कोणतीहि धार्मिक (अथवा सार्वजनिक) संस्था मूळ संस्थापकाने कितीहि उदात्त हेतूने स्थापिली तरी तिच्यात पैशाचा संबंध आला की ती निव्वळ स्वार्थाचे साधन बनून तिची कशी नासाडी होते, याचे उत्तम उदाहरण ज्योतीपंताच्या या पत्रात आहे. येवल्याला ज्योतीपंतानी स्थापलेले विठोबाचें देऊळ अधिक लोकप्रिय झालें, त्यामुळे बिचाऱ्या बापाजीचे पूर्वीपासून असलेलें वेंकटेशाचें देवालय ओस पडूं लागून त्याची मिळकत कमी झाली; मग त्याने या नव्या देवळाच्या मूर्ति पळवून नेऊन देऊळ उध्वस्त करण्याचा उद्योग करूं नये, तर काय करावे ? हा आमचा धर्म ! मुसलमान आमचीं देवळें उध्वस्त करितात, म्हणून आम्ही त्यांच्या नावाने बोटे मोडतों आणि आम्ही काय करीत असतो ?

या देवळाच्या भांडणांत दोन वेदांचीही परस्पर असूया दिसते. येवले नाशीक या टापूत यजुर्वेदी ब्राह्मणाची वस्ती पुष्कळ आहे. वेंकटेशाच्या देवालयात त्याचे प्राबल्य पूर्वीपासून असावे, आणि ज्योतीपंतानी उभारलेले पाडुरंगाचें देऊळ ऋग्वेद्याचे आश्रयस्थान बनलें असावें. या भिन्न वेदानुयायाच्या मधील मत्सराने या दोन देवळांच्या निमित्ताने पेट घेतला असावा, असा तर्क या पत्रावरून होतो.

खुद्द ज्योतीपंतांचा हेतु सर्वथैव लोकसेवेचा होता. त्यांनी देवतेची स्थापना करून तिचा उत्सर्ग, म्हणजे जनतेच्या हिताकरितां समर्पण केलें; तिच्याविषयी आपणास अभिमान (ममत्व) नाही, असें ते म्हणतात. पण स्वधर्माचें आचरण स्वराज्यांत निर्वेधपणाने चालूं नये, हें स्वराज्यास

लाछनास्पद होय. "स्वराज्यांत असें कोठे झालें नाही" असें ते बजावतात. स्वतः पूर्ववयात स्वराज्याच्या महत्त्वाच्या कामगिऱ्या करून नंतर जनतेला धर्माचरणाच्या मार्गास लावण्याच्या कामीं आयुष्य वाहणाऱ्या ज्योतीपंताच्या तोंडीं हे उद्गार फार शोभतात यात शंका नाहीं. स्वराज्याचा अभिमान आणि स्वराज्याच्या कर्तव्याची जाणीव हे दोन्ही भाव या उद्गारात एकमिलाफाने व्यक्त झाले आहेत.

'देव स्वस्थानी बसेपर्यंत' 'आम्ही येथे पंचवीस ब्राह्मण उपोषण करून आहों' असे ज्योतीपंत बजावतात. स्वतःच्या मनाविरुद्ध झालें की उपोषण करून स्वतःचें म्हणणे साध्य करून घेण्याचा प्रयत्न करावयाचा हा सत्याग्रही वीरांचा सध्या उफाळलेला मार्ग पूर्वी अगदीच कोणास माहीत नव्हता असे नाही, हे यावरून दिसून येते. एवढे खरें की हा विषय धर्माचा होता. आणि धर्माची बाब नेहमीच आमच्या जिव्हारीं लागून राहते. निवडणुकींत आपल्याला 'तिकीट' मिळाले नाही, म्हणून काही ज्योतीपंतानी हा उपास आरंभलेला नव्हता !

ज्योतीपंताचे हे पत्र श्री. य. न. केळकर यांनी 'केसरीं'त 'एकावळी'चे परीक्षण करताना नजरेस आणून दिलें याबद्दल त्यांचे आभार मानावयास पाहिजेत. पेशवे दप्तराचा हा खंड ज्योतीपंतावरील लेख लिहिल्यानंतर दोन वर्षांनी प्रसिद्ध झाला, त्यामुळे त्यात या पत्राचा उल्लेख येणें शक्य नव्हते.

खुद्द ज्योतीपंताचें पत्र, किंवा त्याचा उल्लेख पेशवे दप्तराच्या खंडामध्ये सापडतो असा एवढाच. आजवर प्रसिद्ध झालेल्या एकंदर ऐतिहासिक पत्रव्यवहाराचे अवगाहन करून त्यांत ज्योतीपंताचे आणखी कोठे उल्लेख सापडतात की काय, हें कोणा साक्षेपी शोधकाने शोधून पाहिल्यास आम्ही त्याचे आभारी होऊं. पेशव्यांच्या ज्या दोन हिशेबनिसांबरोबर ज्योतीपंत उत्तरेकडे गेले असावे असा आम्ही तर्क केला आहे, ते जनार्दन आप्पाजी एरंडे आणि त्रिंबक कृष्ण कानिटकर या दोघांचीं पत्रें व त्यांचे उल्लेख पेशवे दप्तर खंडांमधून पुष्कळ आढळतात. परंतु त्यांचा संबंध ज्योतीपंतांशीं लावतां येईल असा धागा त्यांत गवसत नाही.

कथामृतकाराने ज्योतीपंतांबरोबर उत्तरेकडे गेलेले म्हणून 'राघोराम पागे' याचा उल्लेख केला आहे. पेशवे दप्तर खंड २९ मध्ये राघोबा पागे (ले. १७६, १८०) आणि राघोराम (ले. ९६, २०० व २२९) याचा उल्लेख आढळतो. या पाची लेखांकातील उल्लेखावरून राघोबा पागे व राघोराम ही एकच व्यक्ति होय, असे दिसते. हा गृहस्थ इ. स. १७६५ ते १७६९ या काळात महादजी शिंदे याच्या पदरी बऱ्याच महत्त्वाचा नोकर असावा; पण या पत्रातही ज्योती गोपाळचा संबंध कोठे दिसत नाही.

पा. १७, ओ. ६. **चिंचणेर.** सातान्यापासून सहा मैलावर कृष्णाकाठीं हे खेडे आहे. ज्योतीपंताचा काल येथे झाला व त्याच्या मुलाची सासुरवाडी तिथेच होती. तेव्हा त्याच्या मुलाने तेथेच वस्ती केली व क्रमाक्रमाने तेथे ज्योतीपंताची समाधि, मदिर वगैरे बांधले जाऊन तेथील मठाला आता सुदर स्वरूप प्राप्त झाले आहे. मंदिर विठ्ठलाचे असून मूर्तीच्या समोर ज्योतीपंताच्या पादुका ठेवलेल्या आहेत व तेथेच ज्योतीपंताना काशीस व्यासाकडून प्राप्त झालेली भागवताची पोथी ठेवलेली असते.

## २ अण्णासाहेब किर्लोस्कर

पा. २३ ओ. ५. **महाराष्ट्रांत नाट्यकलेच्या जोपासनेस सुरवात**--महाराष्ट्र रंगभूमीचा प्रारंभ १८४३ सालीं सांगलीस विष्णु अमृत भावे यानी सीतास्वयंवर नाटक करून दाखविले, तेव्हापासून सामान्यपणे मानला जातो. इतिहासाचार्य राजवाडे यानी तंजावरच्या भोसले राजापैकी शहाजीने लिहिलेलें 'लक्ष्मीनारायण कल्याण' नाटक भारत इतिहास संशोधक मंडळामार्फत प्रसिद्ध केलें, त्या वेळीं या रूढ समजुतीस धक्का देऊन "महाराष्ट्रात नाटकें आज सहाशें वर्षे होत आलीं आहेत" असे विधान केले. त्याचें विधान फार अतिव्याप्त व अतिशयोक्त असल्यामुळे तें फारसें कोणी मनावर घेतलें नाही. पुण्याचे डॉ. यशवंत गंगाधर लेले यांनी तंजावरच्या राजानी लिहिलेल्या नाटकांचें संशोधन करून "मराठी रंगभूमीचा इतिहास, खंड १ भाग १;

यक्षगान—भागवत नाटक" या नावाचे लहानसे पुस्तक लिहून १९४३ सालीं प्रसिद्ध केले. या पुस्तकात राजवाडयाच्या अतिशयोक्तीचा पुष्कळ संकोच केला असला तरी "ह्या तंजावरच्या नाटकामुळे मराठी रंगभूमीचा आणि नाटयवाङ्मयाचा इतिहास विष्णुदास भावे ह्याच्या मागे दीडशें वर्षे निश्चितपणे जात" असल्याचे (सदर पृ. १५) विधान डॉ. लेले यानी केलें आहे.

डॉ. लेले याचे संशोधन कौतुकास्पद व प्रशंसनीय आहे; त्यांनी मराठी वाचकास उपलब्ध करून दिलेली माहिती निःसंशय मोलाची आहे. पण तंजावरच्या राजानी तंजावरात लिहिलेल्या नाटकासारख्या भासणाऱ्या कृति म्हणजे महाराष्ट्र रंगभूमीची सुरवात, हे समीकरण मान्य होणे अशक्य आहे उपलब्ध सामग्रीचा सारासार बुद्धीने विचार करता १८४३ सालीं विष्णुदासानी केलेले नाटक हाच महाराष्ट्र रंगभूमीचा व नाटयकलेचा प्रारंभ असें मानणारी रूढ समजूतच खरी आहे असे निष्पन्न होते.

हा सर्व विषय प्रस्तुत लेखकाने अखिल महाराष्ट्र रंगभूमि शतसावत्सरिक उत्सवमंडळातर्फे लिहावयास घेतलेल्या महाराष्ट्र रंगभूमीच्या सर्वांगपूर्ण सोपपत्तिक इतिहासामध्ये तपशीलवार प्रतिपादन केला आहे. प्रस्तुत इतिहास पूर्ण होऊन हा मजकूर प्रकाशात येईल तेव्हा खरें.

## ३ अनंत वामन बरवे

पा. ६४, ओ. १६–१८. **नाटयकलेचें संघटन…प्रयत्न केला**—अनंतराव बरवे याच्या या कामगिरीचें महत्त्व व बिकटपणा प्रत्यक्ष अनुभवाने पटण्याचा योग प्रस्तुत लेखकाच्या जीवनात आला; तेव्हा या लिहिण्यात आत्मप्रत्ययाचा भरीवपणा आहे असे वाचकानी मानण्यास हरकत नाही. भारत नाटयसंमेलन १९४० सालीं नागपुरास भरविण्यांत आलें व तेथे संस्थेच्या नांवात 'महाराष्ट्र नाटयसंमेलन' असा बदल करण्यात येऊन तिच्यासाठी चिरस्थायी घटना बनविण्यांत आली. अशा रीतीने बरवे यांनी सोडल्यापासून खंडित झालेलें व मधून मधून

केवळ वार्षिक संमेलनाच्या रूपाने दृग्गोचर होणारें कार्य संतत ओघाच्या रूपात चालू झालें. लक्षात ठेवण्याजोगी गोष्ट ही की अनंतरावाचे निष्ठावंत सत्पुत्र डॉ. नरहरि अनत बरवे हे या उपक्रमाचे चालक व कार्यवाह होते.

डॉ. नरहरपंताची वडिलाविषयीची भक्ति जितकी अलोट, तितकीच काम करण्याची चिकाटी व हौस दाडगी. महाराष्ट्र नाट्य संमेलनाच्या कार्याची मुख्य मदार त्याच्यावरच होती. त्याच्या सहकार्याने या संस्थेचें कार्याध्यक्षपद प्रस्तुत लेखकाने १९४८ पर्यंत संभाळले होतें. या नऊ वर्षाच्या काळात दरसाल एकसूत्रीपणाने समेलने भरविण्याखेरीज विद्या-पीठामधून नाट्याच्या अभ्यासशाखा सुरू करण्याची खटपट या संस्थेने केली व रंगभूमीच्या हिताच्या इतर कित्येक गोष्टींचे सूत उवाच केलें. पण या सर्वापेक्षा अधिक उल्लेखनीय कामगिरी १९४३ सालीं व पुढील एकदोन सालात मराठी रंगभूमीचा शतसावत्सरिक उत्सव बिकट परि-स्थितींतहि सागली येथे व महाराष्ट्रातल्या प्रत्येक शहरीं घडवून आणण्याची योजना या संस्थेने केली, ही होय.

पित्याची कोणचीहि मिळकत वारसा हक्काने डॉ. नरहरपंतांस मिळाली नाही, पण पित्याच्या सत्कार्याचा वारसा मात्र मनाने मानून तो अत्यंत निष्ठेने व कष्टाळूपणाने त्यानी चालविला हें त्याच्या चारित्र्याचें थोरपण नमूद करण्यासाठी हा मजकूर लिहिला आहे.

डॉ. बरवे १९४६ च्या सुमारास नागपुराहून तळेगावास तेथील रुग्णालयाचे वैद्यकीय अधिकारी म्हणून गेले व आमचें जूग फुटलें. परिस्थितिवशात् आम्ही दोघानी कोल्हापूर येथ १९४९ च्या जानेवारींत नाट्यसमेलनाचे अधिवेशन भरलें तेथे ह्या आस्थेने व आपुलकीने जोपासिलेल्या संस्थेचा राजीनामा देऊन स्वतःची मुक्तता करून घेतली.

## ४. खाडिलकरांची साहित्यक्षेत्रांतील तपश्चर्या

पा. ९४ ओ. २३-२५ **वरील दोन लेखांकांतील.......... पुढे दिला आहे**—चौकोनी कंसातलें हें विधान अक्षरशः खरें नाही. हा विस्मरणाचा प्रताप आहे. प्रसंगानुसार जें लिखाण लिहून होतें, त्या

विषयी प्रस्तुत लेखकास ममत्व बेताचेंच असतें. त्यामुळे स्वतः लिहिलेल्या लेखाची नोंद अगर साठवण करण्याची काळजी त्याने घेतलेली नव्हती ( व अजूनही त्याला ते जमत नाही ). पुढे काही विद्यार्थ्यांच्या व मित्राच्या सूचनेवरून लेखाची नोंद व संग्रह करण्याचे काम सुरू झाले, तेव्हा 'विहगमा'चा जानेवारी १९३४ चा अंक संग्रहीं होता, त्यातील खाडिलकरावरील लेखाची नोंद झाली. फेब्रुवारीचा अंकही होता, पण त्याच्यात लेखाचा पुढचा भाग नसल्यामुळे लेखाचा पुढचा भाग लिहिला गेलाच नसावा, अशा समजुतीने 'एकावळी'च्या पहिल्या आवृत्तीसाठी लेखाचा उत्तरार्ध नव्याने लिहून काढला व त्याच्या शिरोभागीं पुढील सूचना देऊन तो छापण्यात आला.—

"[हा लेख एवढाच लिहून अपुरा पडलेला आढळल्यावरून तो पुरा करून देण्याची आम्ही लेखकास विनती केली. ती मान्य करून लेखकानी जो मजकूर लिहून दिला, तो यापुढे मुद्रित केला आहे.···]"

'विहंगमा'चे जानेवारी, फेब्रुवारीचे अंक संग्रहीं होते, पण पुढचे नव्हते. त्यामुळे आमची ( प्रस्तुत लेखकाची व यादी करणाऱ्याची ) फसगत झाली. प्रस्तुत लेखकास काही आठवेना. 'लेखाचा उत्तरार्ध तुम्ही लिहिला असता तर त्याचा अंक जपून ठेवला असता; तो ज्या अर्थी नाही, त्या अर्थी उत्तरार्ध लिहिलाच नसावा,' असा संपादकानी तर्क करून उत्तरार्ध नव्याने लिहावयास सागितले, तो लिहिला गेला व पहिल्या आवृत्तींत वर दिलेल्या सपादकीय मथळ्यासह छापला गेला.

ही विसराळूपणाची अजब 'करतूत' पाहून 'विहंगमा'चे संपादक प्रा. या. मु. पाठक चमत्कारले. खाडिलकरावरील लेखाचा उत्तरार्ध 'विहंगमा'त आला असल्याचें त्यांनी संपादकास सागितले, संपादकानी प्रस्तुत लेखकास सागितले. हा स्वभावधर्म खुद्द त्याचा असल्यामुळे त्याला याचा काही चमत्कार वाटला नाही.

'एकावळी'ची ही आवृत्ति छापावयास घेताना अशी समस्या उत्पन्न झाली, लेखाचा 'विहंगमा'त प्रसिद्ध झालेला उत्तरार्ध येथे छापावा, की 'एकावळी'च्या पहिल्या आवृत्तींत प्रसिद्ध झालेला उत्तरार्ध

छापावा, की दोन्ही छापावे. येथे मात्र स्वतःच्या लिखाणाविषयींचें ममत्व प्रभावी झालें म्हणून म्हणा, किंवा दोन्ही उत्तरार्ध विवेचनाच्या दृष्टीने उपयुक्त ठरतील अशी अलिप्त बुद्धीने पाहून देखील खात्री पटली म्हणून म्हणा, निर्णय वरच्यापैकी तिसऱ्या विकल्पानुसार घेतला गेला. दोन्ही उत्तरार्ध छापले गेले.

असें करताना दोन उत्तरार्धांमध्ये परस्पर विसंगति अगर विरोध राहूं नये यासाठी अवश्य तेथे बदल केला आहे. पण असा बदल फारच थोडा करावा लागला. बहुधा तो कोणाच्या लक्षात येणार नाही. एका ठिकाणीं मात्र आस्थेवाईक वाचकास परस्पर विसंगतीचा भास होईल. पान १०६ वर 'सवाई माधवरावाचा मृत्यु' या नाटकातला संघर्ष वैयक्तिक स्वरूपाचा आहे असे प्रतिपादन केले आहे, तर पान ८५ वर या नाटकातील संघर्षाचें स्वरूप राष्ट्रीय आहे, राष्ट्राच्या विनाशास राजा कसा कारणीभूत होतो, हे त्यात दार्खविले आहे, असे विवेचन केले आहे.

प्रस्तुत लेखकाच्या मते या विसंगतीचा समन्वय करता येण्याजोगा आहे; आणि तो करण्यास सुलभ जावे म्हणून नंतरच्या लेखात थोडा बदल केला असून त्यात "या नाटकाला देखील सामाजिक अधिष्ठान आहे आणि त्याचे वर्णन पूर्वीच्या लेखाकात केलेलेंच आहे" असें वाक्य अधिक घातले आहे. आता एवढयाने या दोन्ही ठिकाणातील विसंगति (मुळात खरोखरीची असलीच तर) नाहीशी होते की नाही, असा यावर प्रश्न उद्भवेल. पण त्याचे उत्तर विचक्षण वाचकानी द्यावे. 'न खलु तद्वाच्यं स्वयं लेखकेन'!

## ६. युगप्रवर्तक डॉक्टर केतकर

पा. १३६, ओ. १६. **तिचे चालक निराळेच आहेत...**—ही लेखनाची कसरत प्रस्तुत लेखक त्या वेळी सरकारी नोकरीच्या पाशांत असल्यामुळे करावी लागली. बाह्यात्कारीं पाहिले असता हा मजकूर बरोबर होता, हेही खरें. मुळात नवभारत ग्रंथमाला, तिची निष्पत्ति व्यवस्थित व्हावी म्हणून घातलेला छापखाना, त्याचा योगक्षेम नीट चालावा

म्हणून इतर प्रकाशनांची त्याला दिलेली जोडगण, या सर्वांचा कारभार सोइस्कर रीतीने अखंडित चालू राहावा म्हणून या सर्वांस व्यापणाऱ्या खासगी लिमिटेड कंपनीची केलेली स्थापना—या उद्योगपरंपरेत प्रस्तुत लेखक जरी अंतर्यामी होता, किंबहुना सर्व गोष्टींची योजना व अंमल-बजावणी जरी प्रत्यक्षतया त्याच्याकडून होत होती, तरी तींत त्याचे नाव कोठेही नव्हते. कायदेशीर रीत्या तिचे व्यवस्थापक, चालक व मालक निराळेच होते. तेव्हा, त्या वेळीं लिहिलेला हा मजकूर म्हटले तर खरा आहे, म्हटले तर बाह्यात्कारींचा आहे. वाचकानी त्यात बचावणी, बजावणी व बतावणी याचा अंश कितपत व कसकसा आहे हे समजून घेऊन त्याची मौज अनुभवावी म्हणजे झाले.

# परिशिष्ट

## प्रा. बनहट्टी यांचें प्रकाशित वाङ्मय

मयूरकाव्यविवेचन शके १८४८ (१९२६)
ज्ञानोपासना व भारतीयाचें कर्तव्य शके १८५३ (१९३१)
" " (द्वितीयावृत्ति) शके १८६२ (१९४०)
विष्णु कृष्ण चिपळूणकर ( द्विविध दर्शन )
[ उत्तरार्ध प्रा. बनहट्टींचा ] शके १८५६ (१९३४)

## २ प्रबंध ( संग्रह-ग्रंथांतून प्रसिद्ध झालेले )

लोकमान्याची धर्मबुद्धि व धर्मविषयक मते
'लो. टिळकाचीं धर्मविषयक मते' १९२५
चरित्रकार केळकर 'केळकर' ग्रंथ १९३२
ज्ञानेश्वरीचा अभ्यास } 'ज्ञानेश्वरदर्शन' भाग पहिला,
भावार्थदीपिका व यथार्थदीपिका } 'साहित्यखंड' शके १८५६ (१९३४)
चरित्र वाङ्मय 'अर्वाचीन मराठी साहित्य' शके १८५७ (१९३५)
महाराष्ट्राचे केन्द्र 'फुलोर' नोव्हेंबर १९३५
व 'प्रतिभा' " १९३५
इन्दूरच्या साहित्यसंमेलनातील साहित्य विभागाचे
अध्यक्ष या नात्याने केलेले भाषण (२७ डिसेंबर १९३५)
प्रसिद्धिस्थल, 'महाराष्ट्र' जानेवारी-फेब्रुवारी १९३६
व 'इन्दूरच्या २० व्या साहित्यसमेलनाचा वृत्तात.'

* अनंत वामन बरवे 'रंगचर्चा' ( अभिनव-नाट्यमंदिर,
नागपूर, या संस्थेचे प्रकाशन ) डिसेंबर १९३८

The Social and Political Significance
of the Statecraft of Shivaji.
*Proceedings of the Indian History Congress, Calcutta Session* 1939

Fiminine Proper Names in Ancient Mahanubhava Prose Literature
दहाव्या ऑल इंडिया ओरिएण्टल कॉनफरन्समध्ये वाचण्याकरिता पाठविलेला निबंध मार्च १९४०

( मराठी ) नाट्यवाङ्मय व त्याचा विकास
'प्रदक्षिणा' (सार्वजनिक वाचनालय, नाशिक, शतसांवत्सरिक महोत्सव स्मारक ग्रंथ ) जानेवारी १९४१

## ३ निबंध व लेख ( नियतकालिकांमधून प्रसिद्ध झालेले )

[ लहान सहान प्रासंगिक टिपणाचा या यादींत समावेश केला नाही ]

विष्णुशास्त्री चिपळूणकर व त्याचे आधुनिक आक्षेपक 'रत्नाकर' मार्च, एप्रिल, मे, जुलै व आगष्ट १९२५

महाराष्ट्र सरस्वतीच्या महालातील आणखी एक अज्ञात दालन, लेखांक १–४

महाराष्ट्राच्या ज्ञात वाङ्मयाचे काही विशेष 'रत्नाकर' नोव्हेंबर १९२६

ज्ञातावरून अज्ञात वाङ्मयाचा शोध ,, जानेवारी १९२७

माध्ववैष्णवधर्म व महाराष्ट्र वाङ्मय ,, मार्च १९२७

महाराष्ट्र वाङ्मयात वैष्णव ग्रथांचें अस्तित्व ,, एप्रिल १९२७

विष्णुशास्त्री चिपळूणकर व न्या. तेलंग ,, जानेवारी १९२७

अनिष्ट वाङ्मयाच्या उत्पत्तीची कारण–मीमांसा 'रत्नाकर' मार्च १९२७ (व 'विहंगम' जुलै १९३८)

ऋटिका व भावबंधन 'रत्नाकर' नोव्हेंबर १९२८

मराठींतील लेखनव्यवसाय 'मनोरंजन' मे १९२९

मराठी व्याकरणातील संज्ञांसंबंधाने
काही विचार 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' जानेवारी १९३०
आधुनिक मराठी वाङ्मयाची पाठशुद्धि ले. १, २
'लोकशिक्षण' फेब्रु. व मार्च १९३०
पंधरावे महाराष्ट्र साहित्य संमेलन ,, मे १९३०
इंग्रजी नाटककार शेरिडन् (अपूर्ण) 'रत्नाकर' सप्टेंबर १९३०
वर्तनक्रमातील सुवर्णमध्य 'किर्लोस्कर' नोव्हेंबर १९३०
*ज्योतीपंत महाभागवत 'मनोरंजन' फेब्रुवारी १९३२
आधुनिक शिक्षणक्रमातील त्रिमूर्ति 'वऱ्हाड शाळापत्रक' ए. मे १९३२
चालू काळाकडे लक्ष द्या 'विश्ववाणी' नोव्हेंबर १९३२
लेखक-प्रकाशक-संबधात थोडीशी
सत्योक्ति व स्पष्टोक्ति 'प्रतिभा' मे १९३२
* खाडिलकराची साहित्यक्षेत्रातील तपश्चर्या 'विहंगम' जाने. १९३४
,, ,, ,, 'विहगम' एप्रिल १९३४
बुकमन्च्या परकायाप्रवेशावरून
सुचलेले काही विचार 'प्रतिभा' मार्च १९३५
ललित वाङ्मयातील नवे प्रवाहः-नाट्य 'प्रतिभा' एप्रिल १९३५
आपटयाचा 'चंद्रगुप्त' (अपूर्ण) 'विश्ववाणी' डिसेंबर १९३५
इन्दूरचे विसावे साहित्यसमेलन 'प्रतिभा' फेब्रुवारी १९३६
महाराष्ट्राची साहित्यसस्था ,, एप्रिल, मे १९३६
,, ,, (अधिकृत उत्तराचा परामर्श) जुलै १९३६
केन्द्रवाद हा वायफळ काथ्याकूट नव्हे ! ,, आक्टोबर १९३६
वेदवाणीचे पडसाद : १ 'विहंगम' नोव्हेंबर १९३६
जळगाव संमेलनाच्या वाटेवर ,, ,, १९३६
'वाङ्मयसमालोचन' संपादकीय निवेदन ,, ,, ११३६
आमचा साहित्यससार
( जळगावचे साहित्यसंमेलन ) ,, डिसेंबर १९३६
वेदवाणीचे पडसाद : २ ,, फेब्रुवारी १९३७

| | | | |
|---|---|---|---|
| भारतीय साहित्य परिषद् ( मद्रास येथील अधिवेशन ) | 'विहंगम' | एप्रिल | १९३७ |
| राष्ट्रभाषा संमेलनाचें २६ वे अधिवेशन | ,, | ,, | १९३७ |
| *ज्ञानकोशकार श्री. व्यं. केतकर | ,, | ,, | १९३७ |
| वाङ्मयाचे आधारस्तंभ ( प्रकाशनव्यवसायाचा प्रश्न ) | 'प्रतिभा' | ,, | १९३७ |
| जागृत गोमंतक | 'विहंगम' | जून | १९३७ |
| जेम्स मॅथ्यू बॅरी | ,, | ,, | १९३७ |
| विदर्भ साहित्यसंमेलन | ,, | जुलै | १९३७ |
| *युगप्रवर्तक डॉ. केतकर | 'प्रतिभा' | ,, | १९३७ |
| रॉबर्ट लुई स्टीव्हन्सन् | 'डॉ. शरच्चंद्र' व 'विहंगम' | ,, | १९३७ |
| विदर्भ साहित्य संघ परिषदेचे यशस्वी अधिवेशन | ,, | आगस्ट | १९३७ |
| कविवर्य ज. के. उपाध्ये | ,, | सप्टेंबर | १९३७ |
| दोन चिरस्मरणीय साहित्य संमेलनाची स्मृति | ,, | जानेवारी | १९३८ |
| मुंबईचें साहित्यसंमेलन | ,, | एप्रिल | १९३८ |
| इतिहासपर्वणी ( अपूर्ण ) | ,, | जून | १९३८ |
| वऱ्हाडचे पितामह: श्रीमत दादासाहेब खापर्डे | ,, | ,, | १९३८ |
| लोकमान्यांचें वाङ्मयनेतृत्व | ,, | जुलै | १९३८ |
| बंकिम आणि हरिभाऊ | ,, | ,, | १९३८ |
| *बंकिमचंद्र चट्टोपाध्याय | ,, | ,, | १९३८ |
| *स्व. पं. महावीरप्रसाद द्विवेदी | ,, | सप्टेंबर | १९३८ |
| संपादणी व छाननी | 'साहित्यसंग्रह' † | डिसेंबर | १९३८ |
| *अण्णासाहेब किर्लोस्कर | 'प्रकाश' | नोव्हेंबर | १९३८ |
| आमच्या साहित्यरथाचे मार्गक्रमण | 'मालवसाहित्य' | एप्रिल | १९३९ |
| 'महाराष्ट्रा'ची व्यापक दृष्टि व तिचे साहित्यातील कार्य | 'मौज' | ता. २१ जून | १९४० |
| नाटयकलेचा नवोदय ले.१, २, ३ | 'झंकार' | ता. ८, १५ व २२ डिसेंबर | १९४० |

## ४ प्रस्तावना, उपोद्घात, इ०

| | | |
|---|---|---|
| ‘महाभारतभाव’ भाग १, लें० कै० नारायण नरसिंह फडणीस, जळगांव | | १९३३ |
| ‘जानपदसाहित्य’ | ‘विहंगम’ जानेवारी | १९३७ |
| ‘आराधना’ (श्री. वामन नारायण देशपांडे याचा काव्यसंग्रह) | मार्च | १९३८ |
| ‘आमच्या देशाची स्थिति’ (विद्यार्थी आवृत्ति) | | १९३८ |
| ‘विष्णुपदी’ (विष्णु कृष्ण चिपळूणकर याचा प्रातिनिधिक लेखसंग्रह) | | १९३९ |
| ‘नव्या ज्योती’ (श्री. व्यंकटेश शंकर वकील याच्या नाटिकाचा संग्रह) | | १९४० |
| ‘पद्यमीमांसा’ (श्री. वि. ज. सहस्रबुद्धे याच्या छंदःशास्त्रीय लेखांचा संग्रह) | जून | १९४१ |

## ५ परीक्षणें

| | | |
|---|---|---|
| ‘तुकोबाच्या अभंगाची चर्चा’ | ‘महाराष्ट्र’ मार्च | १९२८ |
| ‘मधुसंभार’ | ‘लोकशिक्षण’ जानेवारी | १९२९ |
| ‘शशिमोहन’ | ‘साहित्यसंग्रह’ † डिसेंबर | १९२९ |
| ‘यशोधन’ | ‘लोकशिक्षण’ जानेवारी | १९३० |
| ‘सह्याद्रीच्या पायथ्याशीं’ | ‘यशवंत’ जून | १९३२ |
| ‘अनिरुद्ध प्रवाह’ | ‘विहंगम’ आक्टोबर | १९३७ |
| ‘सह्याद्रि’ समाजवाद विशेषांक | ,, जानेवारी | १९३८ |
| ‘वाङ्मयविलास’ | ,, मार्च | १९३८ |
| ‘आमचा सनातन धर्म’ | ,, ,, | १९३८ |
| ‘काळे पाणी’ | ,, मे | १९३८ |

* ही खूण असलेले लेख प्रस्तुत पुस्तकांत घेतले आहेत.

† नागपूरच्या मॉरिस कॉलेजांत ‘शारदा मंडळ’ या नावाची मराठी साहित्याच्या सेवेस वाहिलेली जी विद्यार्थ्यांची संस्था आहे तिजमार्फत ‘साहित्यसंग्रह’ नावाचें हस्तलिखित वार्षिक निघत असते. डिसेंबर १९३८ चा अंक छापण्यांत आला होता.

**परिशिष्टाची पुरवणी—**

साधारणपणे १९४१ च्या पहिल्या तिमाहीपर्यंत प्रसिद्ध झालेल्या प्रा. बनहट्टींच्या लिखाणाची नोंद 'एकावळी'च्या पहिल्या आवृत्तींत करण्यात आली होती. त्यानतर प्रसिद्ध झालेल्या त्याच्या लेखभाषणादिकाची यादी पुढे दिली आहे. ही यादी परिपूर्ण आहे अशी ग्वाही देता येत नाही. त्याचे साक्षेपी विद्यार्थी व वाचक यानी यादींत नमूद न केलेलें त्याचे काही लिखाण नजरेस आणून दिल्यास आम्ही त्याचे आभारी होऊं

## २ प्रबंध (संग्रह–ग्रंथांतून प्रसिद्ध झालेले) व भाषणें

समर्थकालीन इतिहासाचें एक अलक्षित अग
'सत्कार्योत्तेजक सभा सुवर्णमहोत्सव ग्रंथ', धुळें १९४३

विदर्भ साहित्य संमेलन, नववें अधिवेशन, दर्यापूर,
येथे अध्यक्षपदावरून केलेलें भाषण, स्वतंत्र पुस्तिका २३ डिसेंबर १९४५

मराठी नाटयशताब्द महोत्सव, इंदूर,
उद्घाटनसमयींचे प्रास्ताविक भाषण
आणि मुख्य अध्यक्षीय भाषण फेब्रुवारी १९४५

## ३ निबंध व लेख (नियतकालिकांमधून प्रसिद्ध झालेले)

माझ्या जीवनावर व लेखनावर
परिणाम घडवून आणणारे ग्रंथ 'समीक्षक' एप्रिल १९४१

ल. रा. पागारकर—हरिभक्ति परायण
की साहित्यसेवा परायण 'भवितव्य' १२ डिसेंबर १९४१

वैयक्तिक गुणाचा उच्च आदर्श
(श्री. नारायणराव बाबासाहेब घोरपडे इचलकरंजीकर)
'महा-राष्ट्र' (मासिक) आक्टोबर १९४२

मध्यप्रांत सरकारचा दप्तरखाना
'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' जानेवारी १९४३

श्री. मामासाहेब वरेरकर–

तीन तपांची रंगभूमीची सेवा ‘भवितव्य’ १४ मे १९४३

मौनव्रताचें पारणे ‘समीक्षक’ जानेवारी १९४६

काकाचे एक दर्शन

(श्री. काकासाहेब कालेलकर) ‘चित्रमय जगत्’ फेब्रुवारी १९४६

रंगभूमीची जोपासना आणि

म्युनिसिपल नाटयगृहाची स्थापना ‘मौज’ २४ एप्रिल १९४६

महाराष्ट्राचें पहिले अमृतमधुर प्रेमकाव्य ‘मौज’ दिवाळी अंक १९४६

मराठी रंगभूमीचे गुणविशेष ‘नवभारत’ मासिक नोव्हेंबर १९४७

मराठी रंगभूमीचा उत्कर्ष ‘मौज’ दिवाळी अंक १९४८

रा. स्व. संघासंबंधी विचार ( मुलाखत )

‘रोहिणी’ रा. स्व. संघ विशेषांक, आक्टोबर १९४९

भारतापुढील महान प्रश्न : सांस्कृतिक नियोजन

‘राष्ट्रशक्ति’, विजयादशमी विशेषांक १९५०

## ४ प्रस्तावना, उपोद्घात इ०

‘संतकवि तुकाराम आणि त्यावरील आक्षेप’

ले. दयानंद पोतदार मार्च १९४३

‘भक्तिभाग्य’ कै. डॉ. काशीनाथ रामकृष्ण

उर्फ अण्णासाहेब धर्माधिकारी याचा काव्यसंग्रह १५ मार्च १९५१

× × ×

‘समाधान’ साप्ताहिक प्रा. बनहट्टींनी ता. १४-१-१९४८ रोजीं सुरू केलें व ता. १३ मे १९५१ पर्यंत चालविलें. या अवकाशांत प्रासंगिक व चिरस्थायी महत्त्वाचें असें पुष्कळच लिखाण त्यांनी या साप्ताहिकांत केलें. त्याची नांवनिशी येथे देणें अशक्य असल्यामुळे या यादीला तूर्त येथे अर्धविराम देत आहों.

# सूची

[ फक्त व्यक्तिनामाचा तेवढा निर्देश केला आहे. आडनांवें बहुतेक सर्वत्र प्रथम घेतलीं आहेत. जेथे व्यक्तिनामे अधिक प्रसिद्ध वा महत्त्वाचीं वाटलीं तेथे तीं प्रारंभीं दिलीं आहेत. ]

---

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २६ | ३ | शोधन | शोधून |
| ३७ | ९ | उघडण्याचे | उघडण्याचे |
| ३८ | खालून २ री | अंनतरावानी | अनंतरावानी |
| ३९ | २२ | प्रयोगात | शब्दप्रयोगांत |
| ४४ | १२ | ततसे | तसतसे |
| ५५ | खालून ३ री | प्रस्तत | प्रस्तुत |
| ६७ | २ | आजावर | आजवर |
| ६९ | १६ | कामाकरिता | कामांकरिता |
| ८२ | ११ | आह. | आहे. |
| ९१ | ४ | आजवर | आज जर |
| ९२ | ४ | परिस्थिती | परिस्थिति |
| ११४ | १ | असत | असते |
| ११७ | २ | होता | होता. |
| ,, | ४ | होते. | होते |
| १२५ | खालून ४ थी | निमुक्त | निर्मुक्त |
| १२९ | १५ | १९१४ १५ | १९१४–१५ |
| १४४ | ६ | विद्युत्‌भारानी | विद्युद्‌भारानी |
| १८९ | २२ | परिस्थिति | परिस्थिति |